# अनुक्रमणिका

"अल्लाहच्या नावाने जो असीम दयावंत व परम कृपावंत आहे"

# प्रस्तावना

एकेश्वरत्व आणि पारलौकिक जीवन याव्यतिरिक्त इस्लामची एक मौलिक धारणा आहे, पैगंबरत्व म्हणजे रिसालत किंवा ईशदुतत्व. अल्लाहने या भूतलावर मानवाच्या भौतिक गरजांच्या पूर्ततेची पूर्ण व्यवस्था केली. वर्षा यासाठीच तर होते आणि धरतीच्या पोटातून धान्य मानवाच्या खाद्याच्या पूर्ततेसाठीच तर उगवत असते. अगदी याचप्रमाणे अल्लाहने नेहमी सातत्याने मानवाच्या नैतिक व आध्यात्मिक अपेक्षा पूर्ततेचीही व्यवस्था केली आहे. दुसऱ्या शब्दांत अल्लाहने नेहमी अगदी स्पष्ट स्वरूपात मानवाचे मार्गदर्शन केले व त्याला सांगितले की या सृष्टीत त्याचे स्थान काय आहे! भूतलावर तो कोणत्या कार्यास पाठविण्यात आला आहे? त्याच्या वर्तमान जीवनाचा वास्तविक उद्देश कोणता आहे? जीवन व्यतीत करण्यास त्याने कोणतीकोणत्या नियम व सिद्धांतांचे पालन करावे? याच मूलभूत व मौलिक मार्गदर्शनासाठी अल्लाहने पैगंबरांना या भूतलावर वेळोवेळी पाठविले.

या सर्व पैगंबरांनी आटोकाट प्रयत्न केला की, ईश-निर्देशानुसार जीवन जगून मानवाने सफलता प्राप्त करावी आणि स्वत:ला विनाशापासून सुरक्षित ठेवावे. मानवाला या गोष्टीचे पूर्ण ज्ञान असावे की, अल्लाहने दाखविलेल्या मार्गाचा तिरस्कार करण्याचा परिणाम या जगात व परलोकात किती भयंकर होतो.

याच पैगंबरांच्या शृंखलेची शेवटची कडी पैगंबर मुहम्मद (स.) होय. आपण दिलेल्या ज्ञानानुसार जगात जवळपास १ लक्ष २५ हजार पैगंबर आलेत. या मधील काही विशिष्ट पैगंबरांची संख्या ३१५ आहे. (हदीस : मुसनद अहमद)

पैगंबरत्वाची ही संकल्पना भौतिकवादी दृष्टिकोनानुसार सर्वथा भिन्न आहे. भौतिकवादींच्या विचारानुसार हे जग केवळ प्राकृतिक आणि भौतिक नियमांच्या आधारे चालत आहे. यामागे कोणत्याही ईश्वर अथवा चेतनसत्ता यांची शक्ती क्रियाशील नाही. या सृष्टीत जे काही दिसते ते केवळ पदार्थाचा चमत्कार आहे. परंतु सत्यता या विचाराच्या अगदी विपरीत आहे. या विश्वाची विस्मयकारी व्यवस्था तसेच मानवजीवन या धारणेला असत्य सिद्ध करण्यास पुरेसे आहे. या सृष्टीत आणि मानवजीवनात असे संकेत दृष्टिगोचर होतात जे सांगतात की, जीवन आणि जग यांचे संचालन एखाद्या

सर्वज्ञ आणि शक्तिमान सत्तेशिवाय संभवच नाही. या विस्तृत जगात जी बुद्धीमान आणि दयादृष्टिता प्रलक्षित होते, तसेच मनुष्यात नैतिक चेतनेचा जो आभास आम्हाला होतो त्याचा स्त्रोत निर्जीव पदार्थ कदापिही होऊ शकत नाही.

नैतिकतेची भावना ही अपेक्षा बाळगते की मनुष्यावर नैतिक रहस्य उद्घाटित व्हावे. नैतिक भावनांचे वास्तविक स्त्रोत (उद्गम) काय आहे? नव्हे तर कोण आहे याचे ज्ञान मनुष्याला असावे. जीवनाच्या प्रत्येक क्षेत्रात त्याचे मार्गदर्शन करावे. त्याला सत्य काय आहे आणि असत्य काय आहे? न्याय आणि अन्याय यातील अंतर स्पष्टपणे समजावून सांगावे. मैत्री-भाव काय आहे व कटुता काय आहे? शालीनता (सभ्यता) आणि दुष्टता मानवी जीवनात कोठून दाखल होते? जीवनाचा सरळ आणि सहज मार्ग कोणता? मनुष्याच्या याच स्वाभाविक प्रश्नांचे समुचित उत्तर म्हणजेच पैगंबरत्व होय. दुसऱ्या शब्दांत सांगावयाचे म्हणजे मनुष्यासाठी शुभ काय आहे व अशुभ काय आहे? सफल जीवन म्हणजे काय आणि ते कसे प्राप्त होते? हे आणि यासारखा अन्य प्रश्नांचे उत्तर अल्लाहने ज्या माध्यमाद्वारे मनुष्याला दिले त्याला पैगंबरत्व म्हणतात.

एकेश्वरत्व आणि परलोकत्व या विषयावर अनेक पुस्तके उपलब्ध आहेत. परंतु पैगंबरत्वाविषयी सविस्तर विवेचन करणारे पुस्तक उपलब्ध नाही. आवश्यकता भासत होती की या विषयासंदर्भात त्याच्या प्रत्येक भागाला दृष्टीसमोर ठेवून सविस्तरपणे पैगंबरत्वाची सत्यता व त्याची उपयोगिता अगदी युक्तियुक्तपणे प्रस्तुत करावी. प्रस्तुत पुस्तक याच दिशेने वाटचाल करण्याचा एक प्रयत्न आहे.

या पुस्तकाच्या तयारीत एस. कौसर लईक यांचे बहुमूल्य असे साहाय्य लाभले. त्यांच्या मौलिक अशा मार्गदर्शनाचा आम्ही भरपूर फायदा घेतला. त्यांच्या सहकार्याबद्दल आम्ही त्यांचे आभारी आहोत.

अल्लाहसमक्ष ही प्रार्थना आहे की, आमच्या या कार्याला स्वीकृती प्रदान करो आणि मानवजगतात हे पुस्तक उपयुक्त ठरो.

- विनीत -

**मुहम्मद फारूक खान**

# अनुवादकाचे मनोगत

इस्लामची मूळतत्त्व तीन आहेत, जी अगदी पृथ्वीच्या आणि पहिल्या मानवनिर्मीतीपासून प्रचलित होत राहिली.

१) शुद्ध एकेश्वरत्व, २) पैगंबरत्व, ३) पारलौकिक जीवन

एकेश्वरत्व आणि पारलौकिक जीवन यावर मराठी भाषेतही पुस्तके उपलब्ध आहेत. परंतु पैगंबरत्वावर सविस्तर विवरण समाधानकारक नसल्यामुळे सामान्यत: बहुजनांचा हा गैरसमज झाला की पीर-पैगंबर, संत-महात्में हे सर्व एकाच माळेचे मणी आहेत. याचा समाजावर हा परिणाम झाला की हे सर्व संत आराध्य देवाच्या जागी स्थानापन्न झालेत आणि पैगंबरांचे महत्त्व नगण्य झाले. पैगंबर म्हणजे काय? पैगंबरांची मानवी जीवनात काय आवश्यकता आहे? पैगंबरांशिवाय काय मानवाला ईशमार्ग अथवा त्याच्या इहलोक व परलोकात सफलतेचा मार्ग प्राप्त झाला असता काय? इत्यादी प्रश्नांची अचूक उत्तरे मानवाजवळ नसल्यामुळे तो पैगंबर म्हणजेच सुफी-संत समजतो जे बहुसंख्येत आहेत आणि ही संख्या सतत वाढत राहील, कारण संत म्हणजे सत्कर्मी, पुण्यात्मा देवमाणूस जो पैगंबरी आदेशानुसार आचरण करून बनू शकतो. परंतु कितीही कठीण प्रसंगातून प्रयत्नांची पराकाष्ठा करून अथवा संसाराचा त्याग करून कोणताही मनुष्य पैगंबरपद प्राप्त करू शकत नाही. कारण पैगंबरी कष्टाने व भक्तीने प्राप्त होणारी वस्तू नव्हे तर जगाचा निर्मिक स्वत: त्यांची नियुक्ती करतो. पैगंबरीसाठी निवडलेल्या मनुष्याचे अल्लाह विशिष्ट प्रशिक्षण करतो आणि मग त्यांच्यावर वह्य (दिव्य प्रकटन)चे अवतरण करतो. हे पैगंबर जे सांगतात आणि जे आचरणात आणतात ते केवळ ईशआदेशच असतात. आपल्या मर्जीने ते काहीही सांगत नाही. म्हणजे त्यांची शिकवण ही पर्यायाने ईश-शिकवणच होय. त्यांचे कर्तव्य हेच असते की सर्वसामान्य जनतेपर्यंत ईशआदेश पोहचवून स्वत: त्याच्यावर आचरण करून एका आदर्श समाजाची रचना करावी. समाजातील दुराचार नष्ट करून सदाचारा प्रवाहित करावा आणि स्वातंत्र्य, न्याय, समता, एकता आणि बंधुत्वावर आधारित एक शांतीमय समृद्ध मानवी समाज विकसित करावा.

पैगंबर, रसूल, नबी आणि प्रेषित हे ईश्वर नसतात किंवा ईशसंततीपैकीही नसतात. तसेच ईशअवतार अथवा अल्लाह यांच्या शरीरात प्रवेश सुद्धा करत नाही. ते असतात तर मानवापैकीच जसे आम्ही अल्लाहचे दास आहोत, तसेच तेही असतात.

अंतर हे आहे की त्यांच्यावर अल्लाहकडून वह्य (दिव्य प्रकटन) अवतरित होते. दुराचाराची कोणतीही संभावना त्यांच्या जीवनशैलीत कदापिही होऊ शकत नाही आणि तशी कल्पनाही केली जाऊ शकत नाही. त्यांचे प्रत्येक कृत्य मग ते व्यक्तीगत असो की सामाजिक ईशआदेशाअंतर्गतच असते. मानव असूनही त्यांचा दर्जा यामुळे इतका उंचावतो की अल्लाहच्या निर्मितीत त्यांच्यापेक्षा श्रेष्ठ दुसरे कोणीही नसते. तात्पर्य, अल्लाहनंतर या जगात पैगंबरांशिवाय दुसऱ्या कोणाचेही स्थान नाही. उलट त्यांच्या जागी अथवा त्यांच्या तुल्य कोणाला समजणे हा अल्लाहजवळ दंडात्मक अपराध आहे. म्हणूनच अंतिम पैगंबर मुहम्मद (स.) यांना 'सिराजे मुनीर' म्हटले व त्यांच्या आचरणाला प्रलयापर्यंत येणाऱ्या प्रत्येक मनुष्यासाठी व मानवी समाजाच्या कल्याणासाठी 'नमुना' (प्रात्यक्षिक) म्हणून घोषितच केले नाही तर त्याला पूर्णपणे सुरक्षितही केले.

याच पैगंबरत्वाचे जन-सामान्यांना आकलन व्हावे आणि याला स्वीकारून त्यांना आपले इहलोक व परलोक सफल करण्यास सुलभ व्हावे. तसेच पैगंबर आणि संत यामधील अंतर जाणून घेऊन अनेकेश्वरत्वाच्या विळख्यात नकळत का होईना जाऊ नये, या उद्देशपूर्तीत प्रस्तुत पुस्तक महत्त्वपूर्ण भूमिका वटवू शकते. याच्या याच आवश्यकतेला, महत्त्वाला ध्यानात ठेवून मराठी भाषिकांनाही याचा लाभ व्हावा, म्हणून हिंदी आवृत्तीचे मराठी भाषांतर करण्याचे धाडस करीत आहे. नि:संशय उच्च प्रतीची भाषा मला प्रस्तुत करता आली नाही. परंतु मराठी वाचक बंधुचे इहलोक व परलोक सफल व्हावे की आंतरात्म्याची तगमग मात्र कमतर दर्जाची नव्हे हे निश्चित. अल्लाह माझ्या या प्रयत्नाला स्वीकार करो व वाचकांना स्वर्गप्राप्तीचामार्ग आणि भौतिक सफलतेचा सन्मार्ग प्रशस्त करून त्यांना सद्बुद्धी देवो. या प्रार्थनेसोबत वाचकवर्गाला ही विनंती कराविशी वाटते की त्यांनी अगदी निष्पक्ष होऊन कोणत्याही पूर्वग्रहदुषित ग्रसित न होता अगदी शुद्ध लढ्याने व सन्मार्गप्राप्तीच्या कामनेने याचे अध्ययन करावे.

शुभचिंतक

**डॉ. एम. यू कहाळे**

# अध्याय १

# आज मी जीवन-काव्य शोधतोय

## जगत आणि मानव

जगात मनुष्य बरेच काही बघतो आणि ऐकतो. अनेक मनोरम आणि सुंदर वस्तू त्याच्या डोळ्यांना सुखावतात. कितीतरी गोड (रुचकर) आणि मंजुळ स्वरांनी त्याचे कान सुखावतात. परंतु केवळ इतकेच पुरेसे नाही. मानवी प्रकृती यापेक्षा अधिकची कामना करते. त्याला असे वाटते की, स्वरांनी शब्दांत परिवर्तीत व्हावे आणि शब्दांनी गायनांत! वास्तविक आणि अपूर्व अशा सौंदर्याचा परिचय या सुंदरतेतून व्हावा, जेणेकरून या सौंदर्यात मनुष्य आपल्या स्वत:चे अध्ययन करू शकेल म्हणजे त्याचे जीवन सार्थक होईल.

ज्या व्यक्तीने या जगाला चिंतनात्मक दृष्टीने बघितले आणि त्याच्या उपस्थितीला अनुभवले तो अवश्य प्रभावित झाला आहे. त्याचे हृदय रोमांचित झाले आहे. त्याला प्रत्येक वस्तू नवीन व नूतन वाटली. त्याचे हृदय अधिक भावविभोर झाले. याला कुठल्यातरी स्पर्शाची अनुभूती होते, परंतु तरीही अस्पष्टता दूर होत नाही. सायंकाळच्या प्रहरी अंधुक प्रकाशात वस्तू तर दिसतात परंतु त्यांचे रेखाचित्र अंधुक असते जणूकाही प्रकाशात ढगाच्या आवरणाने आच्छादन घातले आहे.

संभवता जीवनाची सुंदरता पर्वतसमूह बर्फाळ शिखर, वृक्षे आणि त्यांच्यावर फुललेली फुले व त्यांचा सुगंध इत्यादी बघून एखाद्या विवेकशील मनुष्याला आशेचा उज्वल किरण दिसून येतो व त्याला जीवनाच्या अथांगात उतरल्याचा भास होतो. जणूकाही तो सत्याच्या अगदी जवळ आला आहे आणि बुद्धत्वाला प्राप्त झाला आहे. परंतु या विचारशृंखलेसोबत शंका व संशयाची शृंखलाही सोबत असते. तो विचार करतो की, मी कितीही बुद्धीने काम केले, कितीही खोलपर्यंत उतरलो आणि पुष्कळ काही बघून समजायलाही लागलो परंतु या केवळ माझ्या कल्पनाच ठरू नये. ज्यांचा सत्यतेशी व वास्तविकतेशी कोणतेही नाते नसावे. अशा प्रकारे जे सूत्र तो धरू इच्छितो तेच त्याच्यापासून सुटले आहे. एक संशय त्याचा पाठलाग करतो आणि त्यापासून सुटका प्राप्त करणे काही सोपे कार्य नव्हे. प्रकृतीची भाषा इतकी मौन आहे की त्याच्यावर साधारण मनुष्याची पकड होणे शक्य नाही. हे जितके खरे आहे तितकेच हेसुद्धा सत्य आहे की भाषा जितकी मौन आहे तितकीच वास्तविकसुद्धा आहे.

## प्रकृतीचे संकेत

ज्या लोकांनी जगाचे आणि जीवनाचे गहन अध्ययन केले आहे ते हे मान्य करण्यास बाध्य झालेत की हे जगत अत्यंत रहस्यमय आहे. ही रहस्यमयताच एक सहृदय मनुष्याला प्रेरित करते की या जगाचे आणि त्याच्या प्राकृतिक व्यवस्थेचे तसेच त्यात आढळून येणाऱ्या नियमांचे चिंतन, मनन करावे आणि हे जाणून घेण्याचा प्रयत्न करावा की हे जगत व जीवन यांचे अस्तित्व केवळ एक आकस्मिक घटना आहे किंवा त्यामागे एखादा गर्भित अर्थ व हेतू आहे. जगत आणि जीवन यांचे यथार्थवादिता आणि सचोटीने अध्ययन केले तर आमची निराशा आशेत परिवर्तीत होईल. हे बघण्याची क्षमता निर्माण होईल की मानवाचे स्वतःचे अस्तित्व आणि त्यांच्या भोवती चारही दिशेत जमिनीपासून आकाशापर्यंत संपूर्ण जगात अशी अगणित चिन्हे पसरलेली आहेत जी अगदी स्पष्टपणे सूचित करीत आहेत की हे सर्व काही निरर्थक नव्हे.

या अध्ययनात सर्वात आधी आम्हाला या गोष्टीचा आभास होईल की हे जग व जीवन अल्लाहविना अस्तित्वात आले नाही. इतकेच नव्हे तर या सृष्टीरूपी कारखान्याला बनविणारे व चालविणारे एकापेक्षा जास्त अल्लाह होऊच शकत नाही. ही गोष्ट वेगळी आहे की मनुष्य त्या संकेताकडे डोळेझाक करेल किंवा बुद्धी व विवेकचा उपयोग करणेच सोडून देईल! अल्लाहने तर जगात अशी अनेक स्मृतिचिन्हे पसरविली आहेत, जी सत्यापर्यंत नेतात. ही चिन्हे केवळ पृथ्वी व आकाशातच नव्हे तर आमच्या स्वतःच्या अस्तित्वातही विद्यमान आहेत. अल्लाहने ज्या प्रकारे आमच्या उपजीविकेसाठी केवळ साधन ठेवले नाही तर अनेक साधने उपलब्ध केलीत आणि यासाठी अनेक वस्तू, अन्न व फळे इत्यादीच्या रूपात निर्माण केलेत. त्याची गणना काही सोपे काम नाही. अगदी त्याचप्रमाणे त्याने आमच्या मार्गदर्शनासाठी पुष्कळशी साधने एकत्र केली आहेत. अल्लाहची ही इच्छा आहे की, मनुष्याने जे स्वीकारावे ते बुद्धी आणि विवेकाने स्वीकारावे म्हणूनच कुरआनने बुद्धीचा योग्य वापर आणि मनन-चिंतन व विचार करण्यावर अत्यंत जोर दिला आहे. कुरआनची इच्छा आहे की, मनुष्याने केवळ कल्पनांचाच सहारा घेऊ नये. कारण त्यात धोका होण्याची दाट आशंका असते. त्याची अपेक्षा आहे की, मनुष्याने दृष्टीगत होणारे जग व त्यामधील आभास होणाऱ्या प्रत्यक्ष वस्तूद्वारे त्या सत्यापर्यंत पोहचावे जे दृष्टीआड आहे जसे अल्लाहचे अस्तित्व, त्याचे एकत्व आणि सद्‌गुण इत्यादी.

आम्ही बघतो की सृष्टीची रचना आणि व्यवस्था अत्यंत सुदृढ आहे. यामध्ये प्रत्येक जागी आम्हाला अदृष्य सत्याचे ज्ञान आणि सामर्थ्याचा परिचय होतो. या जमिनीकडे बघा, वर्तमान आकारापेक्षा कमी आकार असता तर यावर दिसणारा वायुमंडळ छिन्न-भिन्न झाला असता व त्याची वर्तमान स्थिती कायम राहिली नसती. तो जमिनीची रक्षा करण्यात असमर्थ झाला असता. परिणामात उल्कापिंडच्या वर्षेने ही जमीन चक्काचुर झाली असती. हावर्ड युविनर्सिटीचे प्राध्यापक फ्लेशर वास्टन यांच्या संशोधननुसार पृथ्वीच्या वायुमंडळात बंदुकीच्या गोळीपेक्षा जास्त तीव्रतेने प्रतिदिवस एक अरब उल्कापिंड प्रवेश करतात. परंतु वायुमंडळ आमच्या पृथ्वीचे रक्षण करते. म्हणूनच उल्कापाताच्या भयंकर दुष्परिणामापासून पृथ्वी सुरक्षित आहे.

जर पृथ्वीचा आकार वर्तमान आकारापेक्षा दुप्पट असता तर हवेचे आवरण पृथ्वीच्या आकर्षणशक्तीच्या अधिकतेने संकुचित होऊन काही किलोमीटरच राहिला असता आणि आमच्या शरीराला हवेचा दाब असहनीय झाला असता. या संशोधनाने सिद्ध होते की पृथ्वीचा वर्तमान आकार एक योगायोग नव्हे तर त्यामागे एक हेतू कार्यरत आहे.

पृथ्वी आपल्या अक्षात (धुरीत) एक हजार मैल प्रति तास या वेगाने फिरते. जर ही गती १०० मैल प्रति तास असती तर रात्र-दिवस वर्तमानपेक्षा १० पटीने मोठे झाले असते. दिवसाची उष्णता आणि रात्रीची थंडी यामुळे जमिनीवर हिरवळ बघायला मिळालीच नसती. झाडे उगवली नसती व शेतकरी अन्न उगवूच शकला नसता. सूर्याकडे बघा, तो पृथ्वीपासून एका योग्य अंतरावरून चमकतो. त्याच्या क्षेत्रफळाचे तापमान १२००० इतके आहे. जर हे तापमान दुप्पट झाले असते तर पृथ्वीवासीयांना असहनीय झाले असते. या विपरीत जर त्याचे तापमान वर्तमान तापमानापेक्षा अर्धे झाले असते तर थंडीने प्रत्येक वस्तू गोठली असती. काय ही सर्व व्यवस्था या गोष्टीला प्रमाणित करीत नाही की या सृष्टीची रचना एक योजनाबद्ध कार्य आहे, ज्याच्या अंतर्गत सृष्टीचा हा कारखाना सुचारू रूपाने चालत आहे.

## जगात क्रियान्वित सहकार्याचा नियम

या जगत आम्ही बघतो की चारही बाजूने एक दुसऱ्याशी सहकार्याचा नियम क्रियान्वित आहे. म्हणूनच आपसात टक्कर होत नाही. पृथ्वी आकाशाला सहकार्य करते तर आकाश पृथ्वीची साथ देतो. या सहकार्यामुळे सृष्टीत एक प्रकारचा समन्वय आणि सामंजस्य आणि सहकारिता दिसून येते. ही सहकारिता या गोष्टीचे स्पष्ट प्रमाण आहे की

जग मात्र आकस्मिक घटनेचा परिणाम नसून त्यामागे एक परमोच्च बुद्धी कार्यरत आहे. पशुंची शारीरिक रचना अशी करण्यात आली की त्यांचा प्रत्येक अवयव वास्तव्य करीत असलेल्या वातावरणांशी सामंजस्य बनवून ठेवतो. हाच नियम वनस्पती जंगलात सुद्धा दिसून येतो. मानव मस्तिष्काचे अध्ययन केल्यास दिसून येते की त्यात एक अब्ज कोशिका आहेत. प्रत्येक कोशिकेमध्ये ६०,००० केंद्रबिंदू असू शकतात. आमच्या जीभेत ३०,००० स्वादतंत्र आहेत, ज्यांच्याद्वारे आम्ही खाद्यान्नाचा स्वाद घेऊ शकतो. आमच्या कानात आढळणाऱ्या अशा तंत्रांची संख्या १ लक्ष आहे, ज्यांच्या साहाय्याने आम्ही कोणताही ध्वनी ऐकू शकतो. डोळ्यांना प्रकाश ग्राह्य करण्याची क्षमता त्यात बसविलेल्या १३० मिलीयन (१३ शे लक्ष) तंत्रांमुळे प्राप्त आहे. शरीरात आढळणाऱ्या या अगणित कोशिकांशिवाय एका युवकाच्या शरीरातील रक्तवाहिन्यांची लांबी एकत्रित करून तानल्या तर ३६ हजार किलोमीटरपेक्षा जास्त लांब होतात. दुर्बोध आणि गुंतागुंतीच्या या व्यवस्थेचा अखंड क्रम बुद्धी आणि इच्छाशक्तीशिवाय संभव होऊच शकत नाही. जसे एखाद्या वानराने उलट-सुलट बोटे टाइपरायटरवर चालविली तर एखादी साधारण कविता अथवा कथा अस्तित्वात येत नाही. अशास्थितात कथा अथवा कवितेविषयी विचार करणे निरर्थक होय!

सर जेम्स जिन्स लॉर्ड एडिंग्टन (इ.स.१८८२-१९४४) आणि प्राध्यापक व्हाईट हेड यांच्या मते जगाची व्यवस्थित व सुसंगतीयुक्त संरचनेची व्याख्या तोपर्यंत संभव नाही जोपर्यंत आम्ही एखाद्या अदृश्य शक्तीला स्वीकारत नाही जी या दृष्य सृष्टीच्या पलीकडे आहे. सर जेम्स जिन्स यांच्या दृष्टीत हे जग एक महान मशीन नसून एक महान विचार आहे. काय अशा महान संरचनेची कल्पना एका महान कुशल स्त्रष्टाशिवाय केली जाऊ शकते?

विचारभावनेने परिपूर्ण होतो. त्यात केवळ शब्दांचा अभिप्रायच नव्हे तर बुद्धीचाही समावेश असतो. जगत व त्याच्या कार्यकलापाचे सूक्ष्म अध्ययन केल्यास त्यामध्ये चातुर्य, बुद्धीमता व तत्त्वज्ञानाचा पूर्णपणे आभास होतो. हे सर्व गुण एका विराट विचाराचा आभास देतात आणि स्पष्टपणे ज्ञात होते की यामागे एक जिवंत सत्य कार्यरत आहे. म्हणूनच ही सृष्टी आणि त्याच्या कार्य-कुशलतेला एका विचाराच्या रूपात बघणेच केवळ अत्यंत प्रसन्न करणारी गोष्ट नाही. सर जेम्स जिन्स तर अगदी स्पष्टपणे जगताला विचार म्हणतो आहे. दुसऱ्या शब्दांत ते असे सांगू इच्छितात की, जर आम्ही सृष्टीरचनेला एक विचाराच्या रूपात बघितले तर ते सत्याच्या अधिक निकट

होईल. अर्थात जगाला एक वस्तू किंवा पदार्थ अथवा ऊर्जा संबोधनापेक्षा विचार म्हटले तर जास्त सचोटीचे कथन होईल.

या जगात आमच्या गरजापूर्तीची व्यवस्था दिसून येते. आम्हाला तहान लागली तर जलसंग्रह उपलब्ध आहे. जगण्यास अत्यावश्यक असा प्राणवायु वायुमंडळात भरपूर प्रमाणात उपलब्ध आहे. शरीरस्वास्थ्यासाठी आवश्यक भिन्न-भिन्न खाद्यान्न जमिनीच्या गर्भात सुरक्षित करण्यात आली आहेत. थोडे थांबून एकाग्रचित्ताने विचार करा की, काय हे संभव आहे की आमच्या गरजा पूर्णपणे भागत आहेत आणि आमचे सर्व कार्य सुचारू रूपाने चालत आहे. परंतु यामागे दया-कृपा दर्शविणारा दाता नाही? किंवा आमच्या आवश्यकतांचे पूर्ण ज्ञान बाळगणारी परमसत्ता नाही? काय ज्ञान ज्ञाताशिवाय आणि दयेचे प्रदर्शन दयावान सत्तेशिवाय संभव होऊ शकते? पदार्थामध्ये तर ही संभावना होऊच शकत नाही की, तेथे चेतना, विवेक आणि दयाभावाचे स्त्रोत फुटतील. अंत: हे मान्य करावेच लागेल की, अल्लाह अवश्य आहे जो ज्ञान, चेतना, दया, करूणा, दानशिलता इत्यादी गुणांनी पूर्णपणे संपन्न आहे. त्याच्या याच गुणांचा कोणत्या न कोणत्या रूपात प्रदर्शन होत आहे. अल्लाह जिवंत सत्ता आहे. जीवनाची विशेषता, दानशीलता, त्याचे एक अविभाज्य अंग आहे. कोणताही वृक्ष जोपर्यंत हरित आणि जिवंत आहे तोपर्यंत त्याच्यापासून फळे-फुले आणि शीतल छत्राची आशा आम्ही बाळगू शकतो. परंतु सुकलेल्या वृक्षापासून फळ-फूलही प्राप्त केले जाऊ शकत नाही. तसेच त्याच्या शीतल छायेत विश्राम करण्याचा कुणी विचारही करणार नाही. प्रवाहित होत असलेल्या नदीत नौकाविहारही करू शकतो आणि शेतकरी तिच्या पाण्याने आपले शेत सिंचनही करू शकतो. परंतु कोरडी पडलेली अथवा जलविहीन नदीत नावही चालणार नाही आणि शेतकरी शेत सिंचितही करू शकणार नाही. जलप्रवाहच नदीचे जीवन आहे. अग्नी जोपर्यंत प्रज्वलित असतो तोपर्यंत आम्ही उष्णता प्राप्त करू शकतो, त्याच्या उष्णतेत भोजन तयार करू शकतो. थंडीच्या दिवसांत अग्नीवर पाणी गरम करून आंघोळ करू शकतो. परंतु अग्नी विझून थंड झाला तर त्याची दानशीलताही संपुष्टात येते. सूर्य जोपर्यंत जिवंत आहे आपली किरणे पसरवित आहे आणि जग त्यापासून प्रकाश व उष्णता प्राप्त करीत आहे. हे तोपर्यंतच शक्य आहे जोपर्यंत सूर्य चमकत आहे. परंतु अग्नीप्रमाणे जर का तो थंडावला अथवा निस्तेज झाला तर मग तो आम्हाला प्रकाशही देणार नाही आणि त्याच्या उष्णतेने शेती पिकणारही नाही. उपरोक्त चर्चेने ही गोष्ट नि:संशय सिद्ध होते की, प्रत्येक प्रकारची बहार (रमणीयता), विपुलता (बरकत) आणि दानशीलता यांचा संबंध

अथवा अस्तित्व ज्या विशेष गुणाशी संलग्न आहे, त्याचे नाव "जीवन" आहे. कृपणतेचा (कंजूषपणा) संबंध कदापिही जीवनाशी होऊ शकत नाही. त्याचा संबंध तर केवळ मृत्युशीच होऊ शकतो. ज्या व्यक्तीत जितकी कृपणता आढळून येईल ती व्यक्ती तितकी मृतप्राय असेल. कारण कृपणतेचा संबंध केवळ मृत्युशीच आहे, जीवनाशी नव्हे आणि मृत व्यक्ती आम्हाला काय देईल? ती तर आमच्या अभिवादनाचे (सलाम) उत्तर देण्याचे सामर्थ्यसुद्धा बाळगत नाही.

जगत आणि जीवन यामध्ये जे काही आम्हाला आनंददायक आणि शोभायुक्त दिसते, ते सर्व निर्जीव पदार्थांचा चमत्कार कदापिही नव्हे. उलटपक्षी ती तर एका परमजीवी सत्ता, अल्लाहची कृपा व दानशीलता आहे. अल्लाहची कृपाशीलता, दानशीलता आणि करूणायुक्त योजनेत एका संवेदनशील व्यक्तीला त्याची आभामय (चमकदार) सुंदरताही आभासित होते.

मनुष्याचे अस्तित्व सीमित आहे, परंतु त्याच्या 'मनात' एक असीम, उच्चतम आणि प्रत्येक दृष्टीने परिपूर्ण अस्तित्वाचा प्रत्यय विद्यमान आहे. येथे प्रश्न निर्माण होतो की सीमित वस्तूमध्ये असीम सत्तेच्या प्रत्ययाची उत्पत्ती कशी संभव झाली? वास्तविक सीमित वस्तूमध्ये असीम शक्तीचे प्रत्यय व्यक्त होणे संभव नाही. या असंभव प्रत्ययानेच ही गोष्ट पूर्णपणे सिद्ध होते की कुणी ईश, स्रष्टा अवश्य आहे जो आपल्या असीम शक्तीच्या प्रदर्शनाने आपल्या अस्तित्वाचे प्रमाण मानवमनात संचित करतो. जगातील सर्व वस्तू एका स्रष्टा (रचयिता)च्या अस्तित्वाला प्रमाणित करतात. कारण जगातील वस्तूंमध्ये हे सामर्थ्य नाही की त्यांनी स्वत:ला निर्माण करावे. त्यांचा निर्माता निश्चितच कुणी दुसरा आहे. अगदी याचप्रमाणे असीम (अनंत) ची कल्पना आणि धारणा सीमित मन आणि मस्तिष्काचा चमत्कार होऊच शकत नाही. हा चमत्कार तर केवळ त्या असीम सत्तेचाच होऊ शकतो ज्याला आम्ही सर्वशक्तिमान अल्लाहच्या नावाने ओळखतो. अल्लाहच्या अस्तित्वाप्रति हा एक प्रत्ययात्मक तर्क आहे ज्याला असत्य ठरविता येणार नाही.

उपरोक्त विवेचनाने केवळ ईशसत्य व त्याचे अस्तित्वाचेच स्पष्ट प्रमाण मिळत नाही तर हेसुद्धा सिद्ध होते की ती परमोच्च सत्ता कृपाशील व करूणाचा सागर आहे. या सत्तेकडून सतत कृपावृष्टी होत असते. त्याच्याशी आमचा संबंध हा आशावादी असावा. त्यापासून निराश होणे किंवा कोणत्याहीविषयी त्याच्याशी चांगली आशा न बाळगणे घोर अपराध होईल. जर आमच्या काही गरजा आहेत तर त्या यासाठीच की

पूर्ण व्हाव्यात. परंतु अकृतज्ञ मनुष्य आपल्या हृदयाच्या संकुचिततेमुळे अल्लाहशी मोठी आशा बाळगण्यास संकोच करतो आणि जेव्हा अल्लाहच्या एखाद्या महानतम कार्याचा उल्लेख त्यांच्या समक्ष केला जातो तेव्हा त्याला स्वीकार करण्याऐवजी नाकारने त्याला सहज व स्वाभाविक वाटते. अल्लाहचे महान अनुग्रह आणि त्यापासून होणाऱ्या अमृत वर्षाचा नकार हा अल्लाहचा अपमान आहे. या गोष्टीचे भान मनुष्याला नाही. धन-संपत्ती आणि जीवनाच्या भौतिक गरजांची पूर्तता ज्या सुव्यवस्थित पद्धतीने होत आहे, त्याबद्दल अल्लाहचा आभारी होणे अनिवार्य आहे. सांसारिक, भौतिक वस्तू बहुमूल्य आहेत या सत्यतेचा नकार केला जाऊ शकत नाही. अल्लाहचे सर्वात महान उपकार हे आहे की त्याने पैगंबरांच्या माध्यमातून मानवाला संबोधित केले. या संबोधनाद्वारेच मानवाला या गोष्टीचे ज्ञान प्राप्त आहे की जीवनाचा तो कोणता पक्ष आहे, ज्यामुळे जगात मानवाला श्रेष्ठत्व प्राप्त झाले आणि आत्म्याचा तो मधुर राग कोणता आहे जो जीवनाला अर्थमय बनवितो. या विषयावर पुढे सविस्तर विवेचन करू.

या प्रसंगी हे जाणून घेणे आवश्यक आहे की जीवनात सुख-सुविधा आणि भौतिक वस्तूच सर्व काही नाही, तर वर्तमान जीवनातही महत्त्वपूर्ण वस्तू ईश-अनुराग आणि अल्लाहप्रति समर्पणाची भावना होय. जीवनात जर आम्ही त्याची आराधना करण्यात असमर्थ ठरलो आणि त्याच्या समक्ष प्रार्थना करणे, तसेच प्रत्येक क्षणी त्याचे स्मरण आमच्या स्वभावाशी संमिश्र झाले नाही तर आमचे जीवन भौतिक सुख-सोयींनी सुसज्जित असूनही असे मरूस्थल (वाळवंटी) समान होईल, जेथे हिरवळीचा उद्‌गम दुर्लभ आणि फुलांचे फुलणे व पक्ष्यांचे मधुर गीत असंभव होय.

वर्तमान जीवनाला जर आशामय भविष्य नसेल तर एका संवेदनशील व्यक्तीसाठी हे जीवन केवळ एक तमाशा बनून राहील. अशा जीवनाचा अमरत्वाशी काहीही संबंध नाही. ते काही मौल्यवान वस्तू होऊ शकत नाही. मानव वर्तमानप्रमाणे भविष्याचीही कल्पना करतो तो केवळ वर्तमानावर कसा संतुष्ट होऊ शकतो?

या सृष्टीत व जीवनात जे संकेतात्मक चिन्ह आढळतात ते सांगतात की, मनुष्यासाठी वर्तमानाप्रमाणे भविष्यही आहे; परंतु सुखी भविष्य प्राप्त करण्यासाठी आम्हाला वर्तमान समृद्ध करावे लागेल. यासाठी आमचे वर्तमान सत्याशी परिचित व्हावे आणि जीवनाचे सर्व कार्यकलाप सत्याच्या अनुकूल व्हावे, या बाबतीत विस्तृत अशा मार्गदर्शनाची आवश्यकता आहे. आमची ही आवश्यकता कशा प्रकारे पूर्ण होईल आणि यासाठी जगत्स्रष्ट्याने कोणती व्यवस्था केली यावर सविस्तर चर्चा आम्ही पुढे करू.

# अध्याय २
# बुद्धी आणि विवेक यांची सीमा

मानव बुद्धी आणि त्याचा विवेक याला आपल्या सीमा आहेत. नि:संशय बुद्धी आणि मस्तिष्क बहुमूल्य ईशदेणगी होय. परंतु बुद्धीपासून काम घेत असताना तिची क्षमता आणि सामर्थ्य ध्यानात ठेवणे गरजेचे आहे. बुद्धीच्या सामर्थ्यापलीकडचे काम घेण्याचा प्रयत्न असफल होईल आणि हा बुद्धीवर अत्याचारही होईल. विज्ञान मानवबुद्धीचा चमत्कार आहे. विज्ञानाविषयी केन्ट स्वीकार करतो की, विज्ञान आम्हाला सत्यापर्यंत पोहचवू शकत नाही. "आइस्टाईन" ने आपले पुस्तक "आउट ऑफ माय लॅटर डेज्" मध्ये लिहतो-

"विज्ञान केवळ हे दाखविण्यात समर्थ आहे की "काय आहे?"

ते हे दर्शवित नाही की "काय असायेला पाहिजे!"

कारण मूल्यांचे निर्धारण त्याच्या परिघाच्या बाहेरील वस्तू आहे."

विशप बर्कले सांगतो की मानवमस्तिष्काच्या बाहेर कोणत्याही वस्तूचे अस्तित्व सिद्ध करणे असंभव आहे. मूळ वस्तू मेंदू आहे आणि आम्ही आमच्या मेंदूव्यतिरिक्त दुसऱ्या वस्तूशी परिचित नाही. अशा प्रकारे बर्कले ही गोष्ट स्वीकार करतो की मानवमस्तिष्काला व बुद्धीला आपली एक सीमा आहे. सत्याला प्राप्त करण्यासाठी केवळ त्याच्यावर विसंबून राहता येत नाही.

विज्ञानचा विषय केवळ ते तथ्य आहे जे आमच्या इंद्रियाच्या सानिध्यात (पकडीत) येतात, ज्यांना मापले जाऊ शकते. विज्ञान त्या तथ्यांशी सरळ संबध ठेवत नाही. जे इंद्रियाच्या पलीकडे आहे, ज्यांचे आम्ही प्रयोगशाळेत परीक्षण करू शकत नाही. हेच कारण आहे की विज्ञानाचा परिघ व दृष्य जग आणि जगातील भौतिक वस्तूपर्यंतच सीमित मानली जाते. येथे ही गोष्ट ध्यानात ठेवली पाहिजे की जर, आम्ही मूर्तमान (दृष्य) आणि या जगातील भौतिक वस्तूंनाच अंतिम सत्य समजले आणि अलौकिक तथ्यांचा इन्कार केला तर ही आमची फार मोठी चूक होईल. वास्तविक हे सीमोल्लंघन होईल. याच विकृत मानसिकतेच्या गाभाऱ्यातून अधर्माने जन्म घेतला आणि असा विचार व्यक्त केला जाऊ लागला की हे जगत एका मशिनीसमान आहे आणि त्याच्या मागे कोणत्याही जिवंत सत्तेचा हात नाही.

नि:संशय बुद्धीच्या रुपात एक बहुमूल्य वस्तू आमच्या जवळ आहे, त्यामुळेच आमची इंद्रिये पूर्ण व सार्थक होतात. बुद्धीशिवाय आमची इंद्रिये सुचारू रूपाने काम करू शकत नाही. तो मेंदूच आहे जो इंद्रियांना नियंत्रित ठेवतो आणि सुचारू पद्धतीने काम घेतो. बुद्धी आणि मस्तिष्क यांचे महत्त्व त्या वेळेस स्पष्टपणे कळुन येते, जेव्हा आम्ही एखाद्या दारूबाज मद्याच्या नशेत स्वत:ची बुद्धी गमावून बसतो. बुद्धीच्या विकृतीमुळे त्याची इंद्रिये सुचारू रूपाने काम करण्यास असमर्थ ठरतात. बुद्धीच्या या अप्रतिम महत्त्वानंतरही तिच्यात इतकी क्षमता नाही की ती आम्हाला अंतिम सत्याशी अवगत करेल. 'बर्गसा' म्हणतो की, "आमच्या भौतिक चिंतनामध्ये जीवनाची वास्तविकता आमच्या समक्ष प्रस्तुत करण्याची आणि जीवनाची विकासयुक्त प्रगतीचा अचूक व पूर्ण आशय (भावार्थ) प्रगट करण्याची क्षमता नाही."[१] ब्राइटमॅन ने तर येथपर्यंत लिहिले की, "मानवबुद्धी कोणत्याही विषयासंबंधी अंतिम प्रमाण, पूर्ण साक्ष आणि तार्किक विश्वास गोळा करू शकत नाही. मानवज्ञान एकल विश्वासापर्यंत पोहचण्यात असमर्थ आहे."[२] डॉ. जेम्स आर्नल्ड ग्रोथरचे कथन आहे की, "प्रकृतीव्यवस्थेची अथांग मौलिक सादगी इतकी आश्चर्यजनक आहे की विज्ञानलोकात अंतिम निर्णय अंतिम मानवासाठी सोडून द्यावे."[३] सर जेम्स जींस आपले पुस्तक "दी मिस्टरियस युनिवर्स" मध्ये लिहतात की, "आधुनिक विज्ञान त्या गुढ समस्येसंबंधी, जी नेहमी आमच्या ज्ञानाच्या चौकटीपलीकडे ठेवण्यात आली, काही सांगण्यात असमर्थ आहे."

या संदर्भात मॅक्स फ्लॅंक लिहतो की, "भौतिकशास्त्राच्या सर्वधारणा त्या जगाशी उद्‌धृत केल्या जातात, ज्यांचे ज्ञान आम्हाला इंद्रियांद्वारे होते. परंतु आमची बुद्धी आम्हाला सांगते की प्रकृतीचे नियम भूतलावर जीवन प्रकट होण्यापूर्वीपासून उपलब्ध आहेत आणि हे नियम मानवजातीच्या अंतानंतरही उपलब्ध राहतील." यावरून ही गोष्ट स्पष्ट होते की या मूर्त (दृष्य) जगाव्यतिरिक्त एक वास्तविक जगसुद्धा आहे, जे मानवाचे ज्ञान आणि धारणा तसेच कल्पनांच्या अधीन नाही.[४] डीन इंज ने सुद्धा म्हटले की,

---

१) Creative Evolution (Preface) P. 10.

२) The Science & The Modern World (P. 113)

३) Great Design (P. 52)

४) Universe in the Light of Modern Plupics.

"वर्तमान जग वास्तविक जग नाही. हे तर वास्तविक जगताचे आंशिक प्रदर्शन आणि त्याची अपूर्ण उपस्थिती आहे."[१] पाश्चिमात्य विद्वान जेव्हा या जगाला वास्तविक जगाची आंशिक छाया मान्य करतात तेव्हा बुद्धीला केवळ आपल्या बळावर सत्यापर्यंत पोहचणे अत्यंत दुर्लभ व दु:साध्य आहे. मानवबुद्धी नेहमी एखाद्या अलौकिक साहाय्य आणि योगदानाच्या प्रतिक्षेत असते. या तथ्याची उपेक्षा करणे एक भयंकर चूक होईल. याविषयी विज्ञानाची असमर्थता अगदी स्पष्ट आहे. सत्याचा एक महत्त्वूपर्ण भाग तो आहे ज्याला आम्ही उद्देश आणि आशयची संज्ञा देऊ शकतो. जीवन लक्ष्य असो की वेळेचे प्रयोजन याचे वास्तविक ज्ञान सत्याच्या ज्ञानापेक्षा कमी महत्त्वाचे नाही. ज्ञान या क्षेत्रातही आमचे मार्गदर्शन करीत नाही. अंत: सर रिचर्ड लिविंगस्टन म्हणतो, "आम्ही मानवासाठी साधने जुळवितो त्यांचा प्रयोग करणेही शिकवितो परंतु त्या उद्देशा (हेतू) विषयी काही नाही सांगत ज्याला प्राप्त करण्याचे हे साधन मात्र आहे."[२]

जोड सांगतो, "विज्ञान आम्हाला हे तर सांगतो (शिकवितो) की साधनांवर प्रभुत्व कसे प्राप्त करावे, परंतु उद्देशाप्रति तो काहीही सांगत नाही." जोड हेसुद्धा सांगतो की, "विज्ञान दुधारी तलवार आहे जिने मानवाला शक्तिशाली तर बनविले, परंतु या शक्तींना वापरण्याची पद्धत त्याला अवगत नाही. याचा परिणाम हा झाला की त्याची रक्तपात व विध्वंसक क्षमतेमध्ये वृद्धी झाली. अशाप्रकारे मानवसभ्यता विनाशरूपी नरकीय दरीच्या काठापर्यंत पोहचली. १९ व्या शतकाने विज्ञानाची केवळ उन्नती बघितली. विज्ञानाच्या या उन्नतीसोबत मानवाची अधोगती व विनाश बघण्याची जबाबदारी आमच्यावर सोपविली."[३]

'मानसिक विश्लेषक'चे कुशल विचारक 'जुंग' (इ.स.१८७५-१९६१) स्वत:चा अनुभव लिहितात की, "कोणकोणत्या वस्तूंचे कोणते व काय मूल्य आहे आणि काय नाही; हे ठरविणे माझ्यासाठी असंभव आहे. मी स्वत:विषयी आपल्या जीवनाप्रति कोणताही आदेश लागू करीत नाही. मला फक्त एवढे ज्ञात आहे की मी जन्माला आलो आणि जीवित आहे. मला हेसुद्धा दिसते की मी स्वत: नाही आलो तर मला आणले गेले आहे. माझे अस्तित्व दुसऱ्या वस्तुवर निर्भर आहे ज्याचे ज्ञान मला नाही."

---

१) God and The Astronomens (P. 13)

२) Education for a World : A drift.

३) God and Evil (P.114)

बुद्धी वस्तूंचे तात्कालिक आणि निकटवर्ती उद्देश तर सांगते परंतु वास्तविक आणि अस्सल उद्देश दर्शविण्यास असमर्थ आहे. मनुष्य आपल्या दुर्बलतेमुळे पूर्ण जीवनावर एकाच वेळी संतुलित दृष्टिपात करण्यात असमर्थ राहतो; हेच कारण आहे की तो स्वत:साठी जीवनाचा असा कोणताही मार्ग निर्धारित करू शकत नाही. ज्यामध्ये केवळ त्याच्या समस्त योग्यता आणि क्षमतांकडे सारखेच लक्ष केंद्रित केले गेले असावे. इतकेच नव्हे तर समस्त प्राकृतिक इच्छांसोबत न्याय केला गेला असावा.

इब्ने-तैमिया इ. स. १२६३-१३४८ यांनी आपले सुप्रसिद्ध पुस्तक 'अल-रदद अलल् मंतिकईन' मध्ये बुद्धीची दूर्बलता आणि त्रुटींचा उल्लेख स्पष्टपणे केला आहे. इब्ने खलदुन इ. स. १३३२-१४०६ ने 'तारीख' च्या भूमिकेत लिहले की, एकेश्वरत्व, परलोक आणि पैगंबरत्वाच्या विषयाला बुद्धीच्या कसोटीवर मापता येत नाही. तात्पर्य हे की, अलौकिक समस्येच्या बाबतीत मानवबुद्धी अत्यंत असहाय्य आणि असमर्थ दिसते. आधुनिक सुप्रसिद्ध विचारक 'काष्ट' (इ. स. १७२४-१८०६) आपले पुस्तक 'द क्रिटीक ऑफ प्युअर रीजन' अर्थात 'विशुद्ध बुद्धीचे परीक्षण' मध्ये याची सविस्तर चर्चा केली की, बुद्धीची क्षमता अत्यंत सीमित आहे आणि त्यांच्यासोबत अनेक भ्रम (शंका) लागले आहेत. केवळ बुद्धीच्या बळावर सत्यापर्यंत आम्ही पोहचू शकत नाही.

उपरोक्त विवेचनाचा हा अर्थ मुळीच नाही की, बुद्धी आणि विवेकाचे कोणतेही मूल्य आणि उपयोग नाही. बुद्धी आणि विवेक अल्लाहने प्रदान केलेला अमूल्य निधी आहे. यामुळेच मनुष्याला पशु इत्यादी निम्न दर्जाचे प्राण्यापेक्षा विशिष्टता आणि श्रेष्ठत्व प्राप्त आहे. ही श्रेष्ठता त्याच्यासाठी गौरवशाली आहे. बुद्धी प्रदान करून अल्लाहने मनुष्याला एका उच्च उद्देशासाठी निवडले आहे. अल्लाह मनुष्याला असहाय्य स्थितीत सोडू इच्छित नाही. ज्याप्रमाणे अल्लाहने मनुष्याला डोळे दिले परंतु त्यात प्रकाशाचा बंदोबस्त केला नसता तर मनुष्य डोळे असुनही आंधळाच राहिला असता! त्याचप्रमाणे बुद्धीसोबत तिला सहकार्य करण्यास असा प्रकाश हवा ज्याच्या प्रकाशात मनुष्य सत्य मार्गावर चालण्यास समर्थ होईल. जीवनात या बाबतीत शंकाकुशंकांच्या बेड्यात बंदिस्त होऊ शकणार नाही. याविषयी सविस्तर चर्चा पुढे करू.

# अध्याय ३

# मानवाचे रहस्यमय जीवन

मानवाचा भौतिक जीवनाशी गाढ संबंध आहे, परंतु याच सोबत अलौकिक जगताशी त्याचा संबंध काही कमी नाही. जीवनाचे रहस्य न उलगडल्यामुळे कित्येक विचार शंका-कुशंकांनी वेढले गेलेत. संदेहाच्या अंधारातून ते स्वत:ला काढू शकले नाही. मानव व्यक्तीत्व केवळ साधे सरळच नाही तर त्याच्यासोबत काही गुंतागुंतीसुद्धा आहेत, म्हणूनच त्याच्या रहस्याचे आकलन करणे व्यक्तीला कठीण झाले आहे.

मानवाच्या अनुभवात येणाऱ्या वस्तूंमध्ये सर्वात मौल्यवान वस्तू चेतना आहे. चेतनाशिवाय जीवनाची कल्पना निरर्थक आहे, जणूकाही चेतनाच जीवन आहे. आधुनिक संशोधनाने हे सिद्ध होते की जीवनाला पदार्थांची उत्पत्ती म्हणता येत नाही. पदार्थापासून विरक्त जीवनाचे आपले वेगळे अस्तित्व आहे. परंतु जीवन किंवा चेतनेचे स्त्रोत काय आहे? विज्ञान याचे उत्तर देण्यास समर्थ नाही. डॉ. बुकच्या अनुसार चेतनेचे तीन स्तर आहेत.

## १) साधारण चेतना

ही चेतना आम्हाला पशुमध्ये बघायला मिळते. ही निम्नकोटीची चेतना आहे. पशुंचा दर्जा एका जिवंत मशीनचा आहे. विचार आणि अतिंद्रिय विषयाच्या क्षेत्रात त्यांच्यापासून कोणत्याही शोध अथवा तपासाची आशा नाही. त्यांच्यापासून कोणत्याही सांस्कृतिक अथवा सभ्यतासंबंधी विकासाची संभावना नाही. वास्तविकता ही आहे की ते स्वत:साठी नव्हे तर रोपटे व वृक्षाप्रमाणे कोणत्या न कोणत्या दृष्टीने मानवाचे सेवकच असतात.

## २) आत्मचेतना

सर्वसामान्य लोक चेतनेच्या याच स्तरावर निर्माण होतात. मनुष्याला आपले ज्ञान असते. तो भविष्याची कल्पना करू शकतो आणि करतोसुद्धा! नश्वर जीवनात शाश्वत जीवनाची तो इच्छा करतो. तो विचारशील आहे. त्याच्याजवळ भावनांची सूक्ष्मता, कोमलता आणि सौंदर्याचे दर्शन घडते. त्याच्या भावनांच्या अथांग सागराला व विचारांच्या उंचीला आजपर्यंत मापता आलेले नाही. त्याच्याकडे अनुभव आणि विचार यांच्या ज्या संभावना आहेत, त्या अपार (असीम) प्रतीत होतात. मानवमस्तिष्कच्या अध्ययनाने कळते की त्याच्या शक्तीचा पूर्णपणे उपयोग आइनस्टाईनसारखा वैज्ञानिकही आपल्या संपूर्ण जीवनात करू शकला नाही.

## ३) विश्वव्यापी चेतना

चेतनेचा हा स्तर जनसामान्यांच्या स्तरापेक्षा अत्यंत उच्च असतो. ही उच्चतम चेतना सामान्य विभूतीमध्ये परिलक्षित होत नाही. चेतनेच्या या स्तरावर पूर्णपणे त्या विभूती दिसतात, ज्यांना जग पैगंबर, ईशदूत किंवा नबी या नावाने ओळखते.

# मानवआत्मा

भौतिकवादी हे समजत असत की मानवव्यक्तीत्व आणि चेतना इत्यादीचे स्त्रोत त्याचे मस्तिष्कच आहे. नविनतम आधुनिक संशोधनाने या विचाराला मिथ्या ठरवित रद्दबाह्य केले. मानवआत्मा आणि मस्तिष्क दोन्ही वेगवेगळे अंग आहेत. मानवचेतनाला पाशविक चेतनेचे विकसित रूप ठरविणे बुद्धीच्या विपरीत आहे, तर त्याला मस्तिष्काचा चमत्कार म्हणणेही वास्तविकतेचा विपरीत आहे. मानवी चेतना आणि पाशविक चेतना यामध्ये केवळ दर्जाचेच अंतर नव्हे तर दोहोंमध्ये प्रकार भेदही आढळतो. ओस्पेंसकीने लिहिले आहे की, मानवआत्मा आणि मस्तिष्क दोन्ही एक नाही. मस्तिष्क ते दर्पण (आरसा) आहे ज्याच्या माध्यमातून मानवआत्म्याचे प्रतिबिंब जगाच्या समक्ष येते जे त्री-आयामी आहे. याचा अर्थ हा होतो की, आमच्या भौतिक जगात मानवआत्मा मस्तिष्काच्या माध्यमातून प्रतिबिंबित होऊन पूर्णत: समोर येत नाही, तर त्याचा एक भाग समोर येतो. दर्पण फुटले तर त्याच्या आतील बिंब (प्रतीक) सुद्धा विघटित (नष्ट) होईल. जर दर्पणात दोष निर्माण झाला तर बिंब स्पष्ट दिसत नाही. परंतु याचा अर्थ हा कदापिही होत नाही की, दर्पण फुटल्याने ती वस्तूही नष्ट होईल जिचे प्रतिबिंब दर्पणामध्ये दिसत होते.[१]

मानवआत्मा आणि त्याच्या गुण-विशेषणाला समजणे कठीण जाते, याचे मूळ कारण म्हणजे आत्म्यापेक्षा मानवाच्या स्थूल शरीराला जास्त महत्त्व देणे होय. स्थूल शरीराला स्वस्थ ठेवण्यात आणि त्याच्या भौतिक गरजा पूर्ण करण्यात मनुष्य इतका व्यस्त राहतो की, मानव शरीराव्यतिरिक्त अजून काही आहे याविषयी विचार करण्यास त्याला सवडच मिळत नाही. सांसारिक सुख-सुविधांसाठी मनुष्य सुंदर अतिसुंदर भवननिर्मितीचीच काळजी वहन करतो. भौतिक जीवनस्तर उंचावण्यास संपत्तीची आवश्यकता असते. यासाठी व्यापार-नौकरी इत्यादी कार्य तो करतो. त्याच्याजवळ या गोष्टीसाठी वेळच नसतो की तो आपले व्यक्तीत्व आणि त्याच्याशी संबंधित समस्येवर सखोल अध्ययन करेल. हळूहळू तो इतका अचेतन होतो की आपली चूक स्वीकारणे

१) Tertium Organum (P. 164)

तर दूर तो आत्मा आणि आत्मिक जीवनाच्या सत्यतेचाच इन्कार करतो. आपल्या या दु:साहसाच्या पक्षात प्रमाण गोळा करू लागतो, जेणेकरून आपण स्वीकारलेली नीतीच तर्कसंगत आहे हे कसेबसे पटवून स्वत:ला विश्वासात घेता येईल. लोकांना सावध करीत कुणी लिहले की,

"You are a soul with a body rather than a body with a soul."

(अर्थात वास्तवमध्ये तुम्ही एक आत्मा आहात ज्याला एक शरीर मिळाले, न पेक्षा तुम्ही एक शरीर जे एक आत्मा राखते.)

## नैतिक चेतना

आम्ही बघतो की मनुष्यात बुद्धीसोबत नैतिक चेतनाही असते. या नैतिक चेतनेमुळेच तो चांगले आणि वाईटमध्ये अंतर करतो आणि काही कृत्याला चांगले समजतो व काहींना वाईट! ही गोष्ट या सत्याची स्पष्ट सूचक आहे की, आम्ही केवळ भौतिक शरीरच नव्हे तर या पलीकडे काही आहे. आमच्या अस्तित्वाचा स्तर भौतिक पदार्थापेक्षा उच्च आहे. आमचे (मनुष्य) मूळ निर्जीव पदार्थ कदापिही होऊ शकत नाही. चांगले आणि वाईट यांचा बोध मानवाला नेहमी (सदैव) राहिला आहे. अगदी प्राचीनतम सभ्यतांचे अध्ययन हे सिद्ध करते की मानव हा नैतिक चेतनेपासून कधीही विरक्त राहिला नाही. पवित्र कुरआन सांगतो,

"आणि मानवी जीवाची व त्या अस्तित्वाची शपथ ज्याने त्याला नीटनेटके केले. मग त्याच्यातील दुष्टता व पापभिरूता त्यावर प्रकट केली."

(दिव्य कुरआन, ९१ : ७-८)

## आध्यात्मिक चेतना

नैतिक चेतनेच्या पुढे मनुष्यामध्ये आध्यात्मिक चेतनासुद्धा असते. असे वाटते जसे त्याला अदृष्य आराध्याचा शोध आहे. जणूकाही त्याला एक वेगळ्याच प्रकारची तहान (तृष्णा) लागली आहे. या तृष्णेनंतरच एका व्यक्तीच्या हृदयावर सत्याचे दस्तक अथवा त्याचा आभास होण्याची संभावना निर्माण होते. व्यक्ती जेव्हा अदृष्य आराध्याच्या शोधात असतो ते केवळ यासाठीच की आपली आत्मिक तृष्णा शांत करावी आणि स्वत:ला आराध्यासमोर समर्पित करून शांती आणि आनंद प्राप्त करावा.

प्रत्येक व्यक्तीमध्ये आंतरात्मा नावाची एक अदृष्य शक्ती कार्यरत असते. प्रत्येक दुष्कृत्य अथवा चुकीचे काम करण्याचे ठरवताच हा आंतरात्मा मनुष्याला सचेत करत. मनुष्य आजपर्यंत आंतरात्म्याच्या हाकेला मिटवू शकला नाही. या

ध्वनीला ऐकण्यास मनुष्य बाध्य आहे. मनुष्यहृदयात या आवाजाचे तरंग त्याने निर्माण केले ज्याने मनुष्याला निर्माण केले.

"नव्हे, मी शपथ घेतो पुनरुत्थानाच्या दिवसाची आणि नाही, मी शपथ घेतो निर्भत्सना करणाऱ्या मनाची." (दिव्य कुरआन, ७५ : १-२)

कुरआनची ही आयत सांगते की, आत्म्याचा एक गुणविशेष हा आहे की तो अनुचित कार्यावर मनुष्याला सावध करतो, जेणेकरून मनुष्य उचित आणि अनुचित यामध्ये अंतर करू शकेल; आणि दुष्कर्मापासून स्वत:ला वाचवू शकेल. दुष्कर्मामुळे आत्म्याच्या तेजस्वितेला धक्का लागतो. मानवाच्या अंत:करणात उपलब्ध हा तेजस्वी संकेत (चिन्ह) एका महान तथ्याचा सूचक आहे.

## सौंदर्यबोध

नैतिक चेतनेप्रमाणे एक कोमल आणि मृदु वस्तू मनुष्यात दिसून येते जी सौंदर्यबोध होय. सौंदर्यबोध स्वत: प्रमाणित करतो की तो पदार्थप्रदत्त नाही. हा त्या सौंदर्याचा द्योतक आहे जो आमचे जीवन व आमचे शोध विचारांना एक नवीन दिशा प्रदान करण्यात सक्षम आहे. ज्याद्वारे आम्ही आनंदविभोर करणाऱ्या निष्कर्षापर्यंत पोहचू शकतो. पवित्र कुरआनने सौंदर्यबोधाला तर्काचा एक आधार मानले आहे,

"वस्तुस्थिती अशी आहे की हा जो काही सरंजाम पृथ्वीवर आहे, याला आम्ही पृथ्वीचा शृंगार बनविला आहे जेणेकरून या लोकांची परीक्षा घ्यावी की यांच्यापैकी कोण अधिक चांगली कृत्ये करणारा आहे." (दिव्य कुरआन, १८ : ७)

कुरआनचा अभिप्राय हा आहे की, ज्या भूतलावर वसविले त्या जमिनीला ओसाड आणि निर्जन ठेवले नाही. तिला अत्यंत सुंदर आणि आकर्षक बनविले. कुठे हरित जंगल आहे तर कुठे टवटवीत पानाफुलांनी बहरलेले शेत दिसतात. अरण्यात सुंदर सुवासिक विकसित फुले आहेत, तर कुठे कोकीळेची गोड कुहूकुहू प्रफुल्लित करीत आहे. कुठे बागडणारे हरीण दिसतात, तर कुठे नद्या प्रवाहित होत आहेत. तात्पर्य हेच की जमिनीला विभिन्न रूपाने सुसज्जित व सुशोभित केले गेले. भिन्न भिन्न ऋतुंच्या आगमनाने हे सौंदर्य उजळून निघते. मनुष्याला ज्या जमिनीवर वास्तव्य करण्याचा अधिकार अल्लाहने दिला त्या जमिनीला उजाड व असुंदर ठेवणे त्याला पसंत नाही. तो मानवी जीवन असुंदर कसा ठेवेल? मानवजीवनात सुंदरताही येते चांगले कर्म आणि सचरित्राने! म्हणूनच तर कुरआनात म्हटले आहे,

"जेणेकरून या लोकांची परीक्षा घ्यावी की यांच्यापैकी कोण अधिक चांगली कृत्ये करणारा आहे." (दिव्य कुरआन, १८ : ७)

## मनोवैज्ञानिक दृष्टिकोन

मानवाच्या मनोवैज्ञानिक अध्ययनान्वये ही गोष्ट स्पष्ट झाली की, त्याची मानसिकता नैतिकतेला रसातळाला नेणे पसंत करीत नाही. अपमान, अनादर त्याला अप्रिय आहे. त्याची इच्छा अथवा आकांक्षा हीच असते की, त्याला आदर आणि प्रतिष्ठा प्राप्त व्हावी. मानवाच्या अध्ययनाने माहीत होते की, त्याची प्राकृतिक अभिरुची, आत्मचेतना, आत्मसन्मान , स्वत:च्या गौरवाचा आभास व संकल्प आणि असे चारित्रसंपन्न गुण त्याच्यात विद्यमान आहेत. या गुणांनीच त्याचे व्यक्तीत्व परिलक्षित व निर्मळ होते. या व्यक्तीत्वाचे बरेच महत्त्व आहे. याची सुरक्षा आणि विकास मानवाची एक मोठी आवश्यकता आहे. व्यक्तीत्वाला निर्जीव पदार्थाचा चमत्कार म्हणता येणार नाही. निश्चितच महत्त्वपूर्ण व्यक्तीत्वाचे स्रोत एक परमोच्च व्यक्तीत्वच होऊ शकते. हे असे सत्य जे एका सामान्य बुद्धीलाही समजणे अवघड नाही. या भौतिक जगात त्याच परमोच्च व्यक्तीमत्त्वाचा आविर्भाव (प्रभाव) या सत्याचे प्रत्यक्ष प्रमाण आहे की या जगाच्या मागे अनिवार्यत: एक महान सत्य क्रियाशील आहे. त्याच्याविषयी विस्तृत ज्ञान प्राप्त करण्यात आम्हाला यश लाभले नाही तरी हा विश्वास अगदी दृढ होतो की, एका महान उद्देशांतर्गत हे जग चालत आहे आणि जमिनीवर लोक विचरन करीत आहेत.

## प्रत्यक्ष आणि परोक्ष (दृष्य-अदृष्य)

जीवनात जे काही प्रत्यक्ष आहे त्यापेक्षा अत्यंत कमी परोक्ष आहे, परंतु तोच अधिक महत्त्वपूर्ण आहे. शरीर प्रत्यक्ष आहे त्याला सर्व बघतात, परंतु आत्मा आणि त्याचे गुण अप्रत्यक्ष आहे. वास्तविक मनुष्य जितका दृष्टीस पडतो त्यापेक्षा कितीतरी पटीने अदृष्य आहे. याचे उदाहरण त्या हिमशैलप्रमाणे आहे जो समुद्रामध्ये पोहत असता त्याचा अत्यल्प भाग दृष्टीस पडतो, उर्वरित भाग पाण्यात बुडालेला असतो जो दृष्टीआड होतो.

या जमिनीवर आम्ही वास्तव्य करीत आहोत, परंतु आमच्या वास्तव्याचा वास्तविक उद्देश काय आहे? आमच्या जीवनयात्रेचा अंतिम पडाव कुठे आहे? वर्तमान जीवनात आम्हाला कोणत्या चारित्र्यिक कर्तव्यांचा निर्वाह (पालन) करायचा आहे?

जगाचा स्रष्टा आणि नियोजन करणारा कोण आहे? तो कोणत्या योजने अंतर्गत तो याचे संचालन करीत आहे? हे आणि यासारखे अनेक प्रश्न आहेत ज्यांची उत्तरे कोणत्याही पर्वतशीलेवर अंकित नाहीत. हे प्रश्न अत्यंत जिवंत प्रश्न आहेत, परंतु त्यांची उत्तरे देणे अत्यंत कठीण आहे. या प्रश्नांच्या अचूक आणि सत्य उत्तराशिवाय मानवजीवनाचे जे दर्शन प्रस्तुत केले जाईल ते चुकीचे आणि त्रुटीपूर्ण असेल. मनुष्य केवळ आपल्या बुद्धीच्या बळावर-भरवशावर जीवनमार्ग निर्धारित करेल तर तो विश्वासपात्र नसेल. कारण आम्ही बघितलेच आहे की, मानवबुद्धी अपूर्ण आहे. ती एका सीमित हद्दीपर्यंतच साथ देऊ शकते. या जगापलीकडे काय आहे? जर कुणी परमोच्च शक्ती आहे तर त्याची इच्छा काय आहे? याची सूचना आम्हाला कशी प्राप्त होईल? बुद्धी जास्तीतजास्त एवढे सांगू शकते की, आमच्या जीवनाचे लक्ष्य मृत्यू आणि विनाश होऊ शकत नाही. शाश्वत जीवनाकडे वाटचाल करणे आणि उच्चतमचे सामीप्य प्राप्त करणे आणि त्याच्यासोबत एकात्मता आणि एकरूपता निर्माण करणे आमचे कर्तव्य होऊ शकते. आमच्या कर्तव्यपालनाद्वारेच आम्ही सफलता प्राप्त करण्यास तसेच असफलता व विनाशापासून सुरक्षित ठेवण्यास पात्र ठरू शकतो. अल्लाहची अवज्ञा आम्हाला त्याच्यापासून दूर करेल व त्याचे सामीप्य आम्हाला प्राप्त होऊ शकणार नाही. बुद्धी हेसुद्धा सांगते की लोकांवर अन्याय, अत्याचार करून अल्लाहला प्रसन्न केले जाऊ शकत नाही; उलट त्याच्या प्रकोपाचा भागीदार बनवेल. हा बौद्धिक निर्णय आहे. परंतु काय वास्तवात असे होईल? याविषयी जोपर्यंत प्रत्यक्ष ज्ञान प्राप्त होत नाही आमचा संशय अथवा भ्रम (व्दिधा) संपणार नाही. कार्ल पोपर म्हणतो,

"जर आम्ही सत्य निष्कर्षापर्यंत पोहचलो तरी हे कधीही जाणू शकणार नाही की ही धारणा सत्य आहेच." (The Logic of Scientific discovery, Ch. I-III)

शंका आणि संशयापासून सुटका प्राप्त करणे आणि विश्वास व संशयरहित विश्वासाने परिपूर्ण होण्यास बुद्धीव्यतिरिक्त दुसऱ्या एखाद्या मार्गदर्शनाची आवश्यकता आहे. ईशप्रदत्त मार्गदर्शनच संशयरहित मार्गदर्शन होऊ शकते जे त्याचे दूत अर्थात पैगंबरांद्वारे मानवांपर्यंत पोहचत राहिले. ज्ञानाच्या या माध्यमाला पैगंबरत्व (प्रेषित्व) म्हणतात, जे लोक केवळ बुद्धीवरच विश्वास करतात आणि याव्यतिरिक्त दुसऱ्या कोणत्याही मार्गदर्शनाला अथवा विधानाला अर्थात पैगंबरत्वाला नाकारतात; पवित्र कुरआन त्यांना संबोधून प्रश्न करतो,

"काय यांच्याजवळ परोक्षाचे ज्ञान आहे ज्याला हे लिहित आहेत?"

(दिव्य कुरआन, ६८ : ४७)

एका दुसऱ्या जागी अल्लाह सांगतो -

"काय त्याच्यापाशी परोक्षाचे ज्ञान आहे की तो वास्तवतेला पाहत आहे?"

(दिव्य कुरआन, ५३ : ३५)

"काय त्याला परोक्षाची माहिती झाली आहे अथवा काय त्याने परमकृपाळूकडून एखादे वचन घेतले आहे?" (दिव्य कुरआन, १९ : ७८)

यावरून हे स्पष्ट होते की लोक पारलौकिक जीवनाविषयी ज्ञानाने संपन्न नाहीत आणि परोक्षाविषयी पूर्ण ज्ञानाशिवाय आम्ही जी जीवनप्रणाली निर्धारित करू ती संशय आणि भ्रम यापासून मुक्त होऊच शकत नाही. आता प्रश्न हा आहे की, काय केवळ बुद्धीवर आधारित मार्गदर्शनाव्यतिरिक्त मार्गदर्शनाचे अन्य विधान आहे? किंवा मग मनुष्याला जीवनरूपी समुद्रात क्षतिग्रस्त पतवारच्या साहाय्यानेच आपली नौका चालवावी लागेल. जर असे असेल तर त्या परमोच्च सत्तेची महिमा व अनुग्रहाविषयी प्रश्नार्थक चिन्ह निर्माण होईल. ज्याने आम्हाला जीवन देऊन वसविलेच नाही, तर आमच्या लहान-लहान गरजाही पूर्ण केल्या. या जगात जीवनास आवश्यक हवा व पाणीच नव्हे तर आमची भूक शमविण्यासाठी भिन्न-भिन्न प्रकारचे अन्न-धान्य व त्यासोबत भाजीची व्यवस्था केली. केवळ इतकेच नव्हे तर नाना प्रकारची स्वादिष्ट फळे व मेवेही तो आम्हाला देतो. आमच्या 'सौंदर्यबोधा'च्या तृप्तीसाठी येथील प्रत्येक निर्मीतीत सुंदरता ठेवली. डोळ्यांना सुख-विलासासाठी आकर्षक फुले फुलविली. नाकाला श्वसनशक्ती देऊन नाना तऱ्हेच्या सुगंधाची व्यवस्था केली. शिशुसाठी आईच्या स्तनात निर्मळ दूध आणि माता-पिताच्या हृदयात त्याच्याप्रति अगाध प्रेम व वात्सल्य निर्माण केले. अल्लाहने आमच्या मानसिक आणि भौतिक स्वभावाला तसेच भावनांना ध्यानात ठेवून लहानात लहान अथवा क्षुल्लक आवश्यकतेची उपेक्षा केली नाही.

विचारात्मक बाब ही आहे की, मनुष्याची ऐच्छिक आणि सांसारिक आवश्यकतांच्या पूर्तीसाठी जग-नियंता आमच्या स्वामीने इतकी चोख व अप्रतिम व्यवस्था कार्यरत केली तो मनुष्याच्या मौलिक आवश्यकता अर्थात जीवनलक्ष्य प्राप्तीचा मार्ग सुलभ करण्यापासून त्याला वंचित अथवा परावृत्त कसा ठेविल? मानवजीवन मात्र खाणे-पिणे आणि सांसारिकं भोग विलासासाठी नाही. या सत्याला कुणीही नाकारू

शकत नाही. मानवाच्या अंतर्मनात सांसारिक सुख-सामग्रीपेक्षा अमरत्वाची इच्छा जास्त प्रबळ असते. तो जीवनाच्या अंतिम रहस्यापासून अनभिज्ञ राहु इच्छित नाही. तो यथार्थच्या साक्षात्काराची अपेक्षा बाळगतो. तो केवळ आपसात मधुर वार्तालापाने तृप्त होत नाही, तो आपल्या निर्मिकाशी वार्तालापाचे श्रेय आणि जितके संभव होईल त्याचे सान्निध्य प्राप्त करण्यास उत्सुक दिसतो. ईश-मिलन तर मनुष्याची नियती (अनिवार्य गोष्ट अथवा) आहे. कुरआन सांगतो,

"हे पैगंबर (स.)! सांगा, मी तर एक मनुष्य आहे तुम्हासारखाच, माझ्याकडे 'दिव्यबोध' पाठविला जातो की तुमचा इश्वर केवळ एकच अल्लाह आहे. म्हणून जो कोणी आपल्या पालनकर्त्याच्या भेटीची आशा करील त्याने सत्कृत्ये करावीत आणि भक्तीमध्ये आपल्या पालनकर्त्यासमवेत इतर कोणाला भागीदार करू नये."

(दिव्य कुरआन, १८ : ११०)

पवित्र कुरआन हेसुद्धा सांगतो,

"त्या अल्लाहकडून आहे जो उंच स्थानाचा मालक आहे. दूत आणि आत्मा चढून त्याच्या पुढे जातात. एका अशा दिवशी ज्याचे प्रमाण पन्नास हजार वर्षे आहे."

(दिव्य कुरआन, ७० : ३-४)

यावरून कळून येते की झेप तर अल्लाहकडेच असावी. चरित्र आणि कर्मशक्ती ती आहे जी आम्हाला अल्लाहकडे नेते. या रहस्याला जर आम्ही जाणले नाही तर आम्ही मानव असूनही पशुच्या स्तरावर जगत राहणार. मनुष्यासाठी पशुस्तरावर जीवन व्यतीत करणे संभवता सर्वात मोठा अपराध आहे. जर मनुष्य निर्मिक अल्लाहला सोडून दुसऱ्याला आपला आराध्य आणि इष्ट बनवून त्याच्याप्रति स्वत:ला अर्पित करत असेल तर त्याचे जीवनस्तर पाशविक स्तरापेक्षाही निम्न स्तराचे होय. कारण पशुंना ईशज्ञान प्राप्त नाही, परंतु ते अल्लाहच्या अधिकारात दुसऱ्या कुणालाही सहभागी ठरवित नाही. जो अल्लाह नाही अशा दुसऱ्या कुणाचीही उपासना व पूजा ते करीत नाही. त्यांना सत्याचे ज्ञान नाही आणि ही त्यांची विवशता लाचारी आहे. अंत: त्यांना हे विचारता येणार नाही की, त्यांनी ब्रह्मज्ञान का प्राप्त केले नाही आणि ईशप्रेमाला आपल्या जीवनाचे मोहक अंग का नाही बनविले? सत्यता तर ही आहे की पशु-पक्षी यासाठी निर्माणच केले गेले नाही. त्यांना चेतनेच्या त्या स्तरावर ठेवण्यात आले जेथे दायित्वाचा प्रश्नच उपस्थित होत नाही.

# अध्याय ४

# मार्गदर्शनाचे सामान्य अस्तित्वगत विधान

## अस्तित्वगत मार्गदर्शन

मनुष्याला अल्लाहने बघण्याची व ऐकण्याची शक्ती प्रदान केली. ज्यांच्याद्वारे माहिती व ज्ञान तो प्राप्त करतो. या प्राप्त ज्ञानाद्वारेच तो निष्कर्षावर पोहचण्याचा प्रयत्न करतो. इतकेच नव्हे तर त्याच्या अंतर्मनात समज व अक्कल यांची जी क्षमता ठेवली आहे, मनुष्य पूर्ण जीवनात त्याचा उपयोग घेत राहतो. कधीकधी तो पद्धत आणि बंडखोर प्रवृत्तीने असा मार्ग स्वीकार करतो ज्याचा विरोध त्याची आंतरात्मा स्वत: करतो. अस्तित्वगत मार्गदर्शन मानवाला ज्या माध्यमातून प्राप्त होते, त्याला साधारणत: सहजवृत्ती, अंत:बोध आणि आंतरात्मा म्हणतात.

## सहजवृत्ती

अस्तित्वगत मार्गदर्शनाला पवित्र कुरआनच्या शब्दांत 'वह्य' (दिव्य प्रकटन) आणि 'इलहाम' (अलौकिक प्रेरणा) म्हणतात. अस्तित्वगत मार्गदर्शनाला 'वह्य' आणि 'इलहाम' या नावाने संबोधित करण्यामागे विशेष कारण आहे. 'वह्य' चा अर्थ होतो गोपनीय आणि सूक्ष्म संकेत. हा संकेत पराशक्तीद्वारे संपन्न होतो. या दृष्टीने याला 'वह्य' आणि 'इलहाम'ची संज्ञा देण्यात आली. पवित्र कुरआनने तर 'वह्य' या शब्दाचा प्रयोग व्यापक रूपात केला, कारण व्यक्तीत्वगत मार्गदर्शनात अतिशय व्यापकता आढळते. कुरआनच्या अध्ययनाने कळते की आकाशसुद्धा 'वह्य'चे पालन करते.[१] जमीन आणि देवदूतसुद्धा 'वह्य'शी संलग्न आहेत. मधमाशीसुद्धा मार्गदर्शनाच्या या विधी-प्रणालीचा लाभ घेते.[२] मासोळी याच मार्गदर्शनाने पाण्यात पोहते. यासाठी तिला कुठेही शिक्षण प्राप्त करावे लागत नाही. नवजात शिशुला दूध पिणे शिकवावे लागत नाही. ईशवह्य याचे मार्गदर्शन करते. प्रत्येक जीवधारीची योग्यता आणि आकार व प्रकारानुसार 'इलहामी' (आकाशी) ज्ञान मिळाले आहे. पशुंना त्यांच्या आवश्यकतेनुसार 'इलहामी' मार्गदर्शन प्राप्त होते. याच मार्गदर्शनाद्वारे मासोळ्या पोहतात, पक्षी हवेत उडतात आणि आपले घरटे बनवतात. मधमाशी आपले पोळे निर्माण करते. यासाठी त्यांना कुठे

१) दिव्य कुरआन - ४१ : १२

२) दिव्य कुरआन - १६ : ६८

प्रशिक्षण प्राप्त करण्यास जावे लागत नाही. आईच्या छातीचे दूध पिण्याचे मार्गदर्शन जर बाळाला लाभले नसते तर त्याला तसे शिकविणे असंभव होते.

मानवाने जीवनाच्या कोणत्याही क्षेत्रात पथभ्रष्ट होऊ नये. यासाठी त्याच्या सर्वांगीण मार्गदर्शनाची जी व्यवस्था अल्लाहने केली ती पैगंबरत्वाची व्यवस्था होय. पैगंबरांकडे मार्गदर्शनाच्या हेतूने जी वह्य येते तिला 'वह्य जली' अर्थात स्पष्ट प्रकाशना म्हणतात. यामध्ये अल्लाहकडून अगदी स्पष्ट शब्दांत त्याची वाणी अवतरते. या अवतरणानंतर सत्य कोडे बनून राहत नाही. पैगंबरांच्या माध्यमातून जीवनाच्या प्रत्येक क्षेत्रात अल्लाह मानवाचे मार्गदर्शन करतो. पुस्तकाच्या पुढील काही पानांवर या विषयावर विस्तारपूर्वक विचार केला गेला आहे.

## आत्मबोध (अंत:बोध)

कधीकधी एखाद्या बाबतीत सहसा एखादी अचानक सूचना विजेच्या चमकीप्रमाणे सूचते. याला अंत:बोध (आत्मबोध) म्हणतात. कॅपलरला ग्रहपथ अंडाकार होण्याचे ज्ञान सहसा याच प्रक्रियेअंतर्गत झाले. या ज्ञानाने नक्षत्रांच्या चालीसंबंधी समस्त समस्याचे समाधान झाले. जगात जे उपयोगी आणि लाभप्रद अविष्कार झालेत त्यामागे या गुप्त मार्गदर्शनाचे मोठे योगदान आहे. मोठ-मोठे विजेते, योजनाकार, विचारक आणि लेखकांद्वारे जे महान कार्य संपन्न झाले त्यामागे या गोपनीय मार्गदर्शनाचाच हात आहे.

## आंतरात्मा

प्रत्येक व्यक्तीमध्ये एक आंतरात्मा असतो. हा आंतरात्मा तिला प्रत्येक वेळी जेव्हा जेव्हा ती वाईट अथवा दुष्कृत्य करण्याचा विचार करते, तिला सावध व सचेत करतो जेणेकरून ती दुष्कृत्यापासून परावृत्त होईल. आंतरात्माची ही हाक कुणीही बंद करू शकत नाही. अगदी साधारण व्यक्तीलासुद्धा या गोष्टीचा आभास होतो की हृदयाच्या आवरणातून कोणी सावधान करणारा त्याला सचेत करीत आहे. इतकेच नव्हे तर या सावधतेच्या इशाऱ्याला न जुमानता जेव्हा तो दुष्कृत्य करतो तेव्हा त्याला धिक्कारतो की, तू ही चूक केली. गुन्ह्यांची मलिनता व अपवित्रता आणि अज्ञानामुळे हा अज्ञात (गैबी) आवाज मध्यम होणे तर शक्य आहे आणि मनुष्य त्या आवाजाकडे दुर्लक्ष करतो. परंतु आंतरात्मा तर आपले कर्तव्य प्रत्येक स्थितीत पार पाडत असते. भाग्यशाली आहेत ते लोक ज्यांचा आंतरात्मा जिवंत असतो व ते आपल्या

कर्तव्यापासून कधी विचलित होत नाहीत.

नैतिक चेतनेचा स्त्रोत हाच आंतरात्मा आहे. मनुष्यात बुद्धी आणि विवेकासोबत नैतिक चेतनासुद्धा असते. यामुळेच तर तो चांगले आणि वाईट, सत्कर्म आणि दुष्कर्म यामध्ये अंतर करतो. एका कानाला चांगले तर एकाला वाईट समजतो. मानवाला एक नैतिक अस्तित्व आहे. मानवाला दैवी पद्धतीने (इलहामी) भले आणि बुरे यांचे ज्ञान प्राप्त आहे. भले आणि बुरे यांच्याप्रति या ज्ञानाने संकेत स्पष्टपणे प्रत्येक सभ्यता व संस्कृतीमध्ये दिसतात. कोणत्याही स्थानी व कोणत्याही काळी मनुष्य या ईशज्ञानापासून अपरिचित नव्हता. अप्रत्यक्ष (परोक्ष) रूपात मानवाचे हे मार्गदर्शन त्याची मौलिक आवश्यकता आहे. अस्तित्वगत हे मार्गदर्शन त्याच्या अस्तित्वामध्ये संमिलित आहे. या संमिश्रनाशिवाय त्याचे अस्तित्व निरर्थक होऊन राहील. या प्रकारची ही 'वह्य' आणि सूक्ष्म मार्गदर्शन अप्रत्यक्षपणे होत असल्यामुळे मनुष्याला प्रत्येक कर्म आणि चरित्र पूर्णत: आपले कर्म आणि चरित्र वाटते. यद्यपि त्याच्या कर्म आणि चरित्र यामध्ये महत्त्वपूर्ण हिस्सा 'वह्य' अर्थात सूक्ष्म मार्गदर्शनचा असतो. मार्गदर्शनाच्या सूक्ष्मतेमुळे मनुष्याला प्रत्येक कर्म व चरित्र पूर्णपणे आपलेच वाटते. कोणत्याही अप्रत्यक्ष व सूक्ष्म अशा मार्गदर्शनाचा सहसा त्याला आभासही होत नाही. जीवनात या वह्य आणि मार्गदर्शनाचे महत्त्व श्रवण (ऐकणे) आणि दर्शन (बघणे) इत्यादीच्या क्षमतेपेक्षा कमी क्षमता कदापिही नाही. पवित्र कुरआनने अनेक जागी मनात उठणाऱ्या चांगल्या आणि बौद्धिक विचारांचा 'वह्य' म्हणून उल्लेख केला आहे. उदा.

"आणि मी जेव्हा 'हवारी'ना (येशू ख्रिस्ताच्या अनुयायांना) इशारा केला की माझ्यावर व माझ्या पैगंबरांवर श्रद्धा ठेवा, तेव्हा त्यांनी सांगितले की, "आम्ही श्रद्धा ठेवली आणि साक्षी राहा की आम्ही मुस्लिम आहोत." (दिव्य कुरआन, ५ : १११ )

एका दुसऱ्या जागी म्हटले,

"आम्ही मूसा (अ.) च्या आईला संकेत दिला की, "याला दूध पाज, मग जेव्हा तुला त्याच्या जिवाचे भय वाटेल तेव्हा त्याला नदीत सोडून दे आणि कसलेही भय आणि दु:ख बाळगू नकोस आम्ही त्याला तुझ्यापाशीच परत घेऊन येऊ आणि त्याला पैगंबरांत समाविष्ट करू." (दिव्य कुरआन, २८ : ७)

## सच्चे स्वप्न

सत्य स्वप्न ईशमार्गदर्शनाचे एक माध्यम आहे, म्हणूनच पैगंबर मुहम्मद (स.) यांनी सच्चा स्वप्नांना ईशदूतत्वचा शेहेचाळीसवा हिस्सा म्हटले आहे.[१] पैगंबर मुहम्मद (स.) यांनी हेसुद्धा सांगितले की, माझ्यानंतर कोणताही पैगंबर येणार नाही. म्हणजे पैगंबरत्वचा क्रम समाप्त झाला आहे. आता याच्यासारखी दुसरी गोष्ट अस्तित्वात असली तर ती चांगले स्वप्न होय.[२] म्हणजे अशी सूचना जिला प्राप्त करण्याचे कोणतेही बाह्य अथवा भौतिक साधन होऊ शकत नाही. अल्लाहच्या आज्ञाकारी दासांना स्वप्नाच्या माध्यमातून याची सूचना मिळू शकते. मानवी इतिहासात खऱ्या स्वप्नापासून बराच फायदा घेतलेला दिसतो. कुरआन स्वत: वर्णन करतो की इजिप्तच्या राजाने एक अद्‌भुत स्वप्न बघितले की सात लठ्ठ गायी सात दुर्बल (गायींना) खात आहे. सात बाले (कणीस) हरित तर दूसरी सात सुकलेली आहेत. हे स्वप्न अगदी खरे निघाले. इजिप्तची सात वर्षे समृद्धीची गेली. शेती हिरवी होती. मुबलक पिके होती. खाद्यान्न विपूल प्रमाणात होते. यानंतरची सात वर्षे अत्यंत कष्टाची गेली. दुष्काळ पडला होता. साठवून ठेवलेले धान्य या वेळी कामी आले.

पवित्र कुरआनमध्ये अशा काही स्वप्नांचा उल्लेख केला आहे जी तंतोतत खरी ठरली. उदा. आदरणीय यूसुफ (अ.) यांनी बालपणी एक स्वप्न बघितले की सूर्य आणि चंद्र यांच्या उपस्थितीत अकरा ग्रह यांना सजदा करीत आहे. हे स्वप्न पूर्णपणे खरे ठरले. युवा अवस्थेत जेव्हा आदरणीय यूसुफ (अ.) या पैगंबरांना इजिप्तचा राज्यसत्ता प्राप्त झाली, तेव्हा त्यांच्या माता-पितासह त्यांचे अकरा भाऊ इजिप्तमध्ये उपस्थित होते. या वेळी त्यांच्या ११ भावांनी आदरणीय यूसुफ (अ.) यांना सजदा केला. याप्रसंगी आदरणीय यूसुफ (अ.) म्हणाले, बाबा हे माझ्या पूर्वकालीन स्वप्नाचे साकार रूप होय. माझ्या पालनकर्त्या प्रभुने त्या स्वप्नाला सत्य करून दाखविले.[३]

केकुले (Kekule) ला बेन्जीन (Benzine)[४] च्या अणूची बनावट रचना माहीत करावयाची होती. परंतु ज्ञात संभावना परीक्षणाच्या कसोटीवर पूर्ण उतरत

१) हदीस : बुखारी, मुस्लिम
२) हदीस : बुखारी, मुस्लिम
३) विस्तारासाठी बघा - दिव्य कुरआन - १२ : ४-५,१००
४) हायड्रोकार्बनचे तरल संमिश्रण

नव्हते. तो चिंतित होता. काय करावे हे कळत नव्हते. त्याने स्वप्नात बघितले दोन सर्प परस्पर एक दुसऱ्याचे शेपूट तोंडात घेऊन एक वर्तुळ बनविले आहे. त्याला या स्वप्नाद्वारे हा संकेत मिळाला की बेन्जीनची बनावट सरळ साखळीची नसून वृत्ताकार हाराच्या रूपात होऊ शकते. समस्येचे समाधान झाले व परीक्षणाच्या कसोटीवर हा विचार (स्वप्न) सत्य सिद्ध झाला.

प्रचलित गोष्ट हीसुद्धा आहे की मशीनमध्ये सुईच्या फिटींगची पद्धत शोधकर्त्याला स्वप्नाद्वारे कळाली.

आम्ही याआधी हे नमूद केलेच आहे की मार्गदर्शिता प्रत्येक वस्तूच्या संरचनेत संमिलित आहे. संरचना किंवा सृष्टी स्वत: हेतू आणि उद्देशाची परिचायक असते आणि हा उद्देश किंवा हेतू ज्याच्या अंतर्गत त्या संरचनेला अस्तित्व मिळते तो संरचनेतून स्पष्ट झळकत असते. ही ती वस्तू आहे जी व्यापक रूपाने जगाला दिसते. ही प्राकृतिक तसेच अस्तित्वगतही आहे. प्राकृतिक मार्गदर्शनाने मनुष्याला वंचित ठेवलेले नाही. मनुष्याला बुद्धी देण्यात आली, यद्यपि त्याच्या बुद्धीची एक सीमा आहे. त्याला सहजवृतीय आणि अंत:बोधाची क्षमता प्राप्त आहे. इतकेच नव्हे तर त्याच्याजवळ आंतरात्मासुद्धा आहे. त्याला नैतिक चेतनाही प्राप्त आहे.

या सर्वाव्यतिरिक्त त्याला सहावे इंद्रिय आणि तिसरा डोळासुद्धा प्राप्त आहे. कधी भविष्यात होणाऱ्या घटना त्याला साक्षात दिसतात याला 'कश्फ' किंवा अनावरण म्हणतात. कधीकधी स्वप्नातसुद्धा त्याला असे संकेत मिळतात. या सूचनांचे कोणतेही भौतिक साधन दिसून येत नाही. या प्रकारचे जे ज्ञान त्याला प्राप्त होते आणि चांगल्या व वाईटचा 'इलहाम' (अलौकिक प्रेरणा) ही त्याला होतो. परंतु हे सर्व मनुष्याचे विस्तृत जीवन आणि त्याच्या अगणित समस्येत त्याच्या मार्गदर्शनास कदापिही होऊ शकत नाही. आम्ही आधी स्पष्ट केलेच आहे की मनुष्यामध्ये बघणे, ऐकणे आणि विचार करून निष्कर्षापर्यंत पोहचण्याची क्षमता आहे. परंतु यासोबत जर प्रामाणिक आणि प्रमाणित स्त्रोतापासून स्पष्ट आणि विस्तृत मार्गदर्शन लाभणार नाही, तर तो स्पष्ट रूपात कोणतीही जीवनप्रणाली निर्धारित करू शकत नाही. जीवनाच्या गुंतागुंतीत हे जाणून घेणे अत्यंत गरजेचे आहे की अल्लाहप्रति आभार प्रकट करण्याचा मार्ग कोणता आहे की ज्याच्यावर जीवनयात्रेचा प्रवास करून आपल्या स्त्रष्टा (रचयिता, निर्माता) ची

प्रसन्नता प्राप्त होईल आणि अकृतज्ञतेचा मार्ग कोणता आहे की त्याच्यावर जीवन खपवून कधीही आपल्या स्रष्टाची प्रसन्नता प्राप्त होणार नाही.

मनुष्याजवळ ज्ञानप्राप्तीची जितकी साधने आहेत ती जीवनाच्या प्रत्येक क्षेत्रात आमच्या मार्गदर्शनास पर्याप्त नाहीत. याशिवाय मनुष्याला विचार करणे आणि समजून आपल्यासाठी मार्ग निश्चित करण्याची आणि त्याच्यावर आचरण करण्याचे अथवा न करण्याचे पूर्ण स्वतंत्र्य प्राप्त आहे. त्याचा तो मिथ्या (चुकीचा) उपयोगसुद्धा करतो. यामागे पुष्कळ गोष्टी कार्यरत असतात. यामध्ये स्वार्थपरता, अहंकार, ईर्ष्या, पक्षपात, आळस आणि बेपर्वाई प्रमुख आहेत. याव्यतिरिक्त वातावरणाचा प्रभाव यामुळे मनुष्य बहुधा स्वत:ला सुरक्षित ठेवू शकत नाही. वातावरण जर दूषित असेल तर मनुष्याला वातावरणाच्या विरूद्ध कोणतेही आचरण करणे काही सहज व सोपे नाही. मनुष्याची एक आवश्यकता ही आहे की, त्याला एकीकडे जीवनाचे पूर्ण मार्गदर्शन प्राप्त व्हावे जे आपल्या पूर्णत्वासोबत प्रामाणिक व सत्य आहे. त्यात कोणत्याही पद्धतीने संकुचित वृत्ती आणि पक्षपात नसावा. जो स्त्रोत त्याचे उगमस्थान आहे त्यापेक्षा श्रेष्ठ सत्याचा अन्य कोणताही स्त्रोत संभवच नसावा. तसेच तो तुच्छ इच्छा आणि स्वार्थपणा इत्यादि दुर्गुणांपासून सर्वथा मुक्त असावा.

दुसरीकडे मनुष्याची हीसुद्धा एक मोठी आवश्यकता आहे की त्याच्यासाठी अशा प्रबळ प्रेरक वस्तू उपलब्ध असाव्यात ज्यामुळे तो सत्याचा सहर्ष अंगीकार करू शकेल आणि ते स्वीकारण्यात त्याला यत्किंचितही संकोच होऊ नये. त्याला हे स्पष्ट दिसले पाहिजे की जे सत्य त्याच्या समक्ष प्रकट अथवा अनावृत झाले आहे, जर ते त्याची उपेक्षा करेल तर त्याच्या स्वत:प्रति ही मोठी शत्रुता होईल. कारण सत्याची उपेक्षा वास्तवमध्ये स्वत:च्या विनाशाशिवाय दुसरे काही नसते. सर्वात मोठे व श्रेष्ठ मार्गदर्शन हे आहे की सत्याचे प्रकटीकरण असे व्हावे की, अज्ञान आणि अनभिज्ञतेचा सर्व काळोख दूर व्हावा व मनुष्याला हे समजून जावे की त्याच्या जीवनाची सार्थकता व सफलता केवळ या गोष्टीवर निर्भर आहे की त्याने त्या मार्गदर्शनानुसार आपले चरित्र निर्माण करावे. तात्पर्य, आपल्या जीवनाला त्या योजनेच्या अनुरूप घडविण्याचा प्रयत्न करावा, ज्या योजनेअंतर्गत जगाला आणि स्वत: त्याला अस्तित्व मिळाले. (यालाच नैसर्गिक अथवा मानवधर्म म्हणतात.)

जीवनामध्ये असे परिपूर्ण मार्गदर्शन पैगंबरांद्वारेच मिळू शकते आणि मिळाले आहे. पैगंबरांच्या माध्यमातून अल्लाह आमच्यासाठी जीवनाचा तो मार्ग उपलब्ध करतो जे आमची सर्वात मोठी व महत्त्वपूर्ण गरज आहे. याच्या अभावी आमची बुद्धी आणि विवेक; आंतरात्मा आणि अन्य आंतरात्मिक उर्जा अपूर्ण आणि अर्थहीन राहतील. आणि पैगंबरांच्या माध्यमाने प्राप्त मार्गदर्शनान्वये आमच्या शक्ती आणि आंतरिक क्षमता अर्थपूर्ण दिसू लागतात.

पुढील प्रकरणात आम्ही या पूर्ण मार्गदर्शनावर सविस्तर प्रकाश टाकणार आहोत. हे पूर्ण मार्गदर्शन ज्या माध्यमाने प्राप्त होते, त्याला पारिभाषिक शब्दात प्रेषित्व अथवा ईशदूतत्व म्हणतात. पैगंबरांचा एक विस्तृत इतिहास आहे. ज्याचे मानवाच्या इतिहासात अतिशय महत्त्व आहे. पैगंबरांचा हा इतिहास आणि पैगंबरांनी मानवजातीच्या मार्गदर्शनासाठी जे प्रयास केलेत आणि यासाठी त्यांना अत्यंत कठीण आणि कष्टप्रद परिस्थितीतून जावे लागले. असाध्य व अमानवीय परिस्थितीत त्यांनी ज्या महान चरित्राचा परिचय दिला त्याने मानवजातीला जो उत्साह आणि प्रतिष्ठा प्राप्त झाली त्या सत्यतेपासून डोळे लपविणे सर्वात मोठा अन्याय, निर्लज्जता आणि उद्धटपणा होईल.

# अध्याय ५

## पैगंबरत्व आणि त्याचे महत्त्व

ईशदूतत्वाचा विषय मानवतेसाठी एक महत्त्वपूर्ण विषय आहे, परंतु दूर्भाग्याने मानवसमाजात सामान्यत: याला ते महत्त्व प्राप्त नाही जे त्याला असायला पाहिजे. पवित्र कुरआनने ईशदूतत्वाला अल्लाहची कृपा व दयाळूतेची संज्ञा दिली.[१] वास्तवमध्ये ही अल्लाहची सर्वात मोठी व महान अशी कृपा आहे. खाणे-पिणे आणि राहणे या सुविधा तर पशुनांही प्राप्त आहेत. परंतु स्पष्ट आणि प्रत्यक्ष संबोधन अल्लाहने केवळ मानवाशी केले आहे. केवळ मनुष्यालाच त्याने हे स्वातंत्र्य दिले की तो त्याच्या कृपेला स्वत: जाणून आणि ओळखून स्वेच्छापूर्वक त्याच्यापासून लाभान्वित व्हावा.

ईशवह्य (दिव्य प्रकटन) द्वारे आपल्या पैगंबराला संबोधित करतो आणि त्याच्यावर आपली वाणी अवतरित करतो. अशा प्रकारे तो मानवी मार्गदर्शनासाठी अशी व्यवस्था करतो की त्यासाठी त्याची जितकी प्रशंसा व आभार व्यक्त करू तो कमीच ठरणार! 'वह्य'चे मानवी जीवनात इतके महत्त्व आहे की, 'एडिंग्टन (Eddington)' हे मान्य करण्यास बाध्य झाला की, मौलिक प्रश्न त्याची सत्ता व त्याचे होणे हा नव्हे तर या गोष्टीचा संशयरहित विश्वासच आहे की अल्लाह 'वह्य'द्वारे मानवाचे मार्गदर्शन करतो.[२] जीवन हे जीवनमुल्यांशिवाय तुच्छ आणि निरर्थक होय. परंतु प्रश्न हा आहे की जीवनमूल्य ओळखायचे कसे? आणि कोणकोणत्या वस्तू त्यांना विश्वसनीय बनवितात? दिव्य प्रकटन (वह्य) एकमेव साधन आहे ज्याद्वारे आम्ही जीवनमूल्यांना जाणून घेऊ शकतो आणि दिव्य प्रकटनच जीवनमूल्यांना मौल्यवान आणि विश्वसनीय बनविते. ही ईशप्रकाशना मनुष्यापैकी विशेष व्यक्तीकडे केली जाते. अशाच व्यक्तींना पैगंबर म्हणतात. 'आइस्टाईन'ने हे स्वीकार केले की, ज्या जीवनमूल्यांचे ज्ञान या प्रतिष्ठित व्यक्तींच्या (नबी) माध्यमातून आम्हाला प्राप्त होते ते अनुभवाच्या कसोटीवर पूर्ण उतरते. जोड (Joad) ने सुद्धा प्रकाशना (वह्य) चे महत्त्व स्वीकार करीत सांगितले की, प्रकाशना स्वत:च स्वत:चे प्रमाण असते.[३] जोड हेसुद्धा सांगतो की, तथ्यांचे ज्ञान बुद्धीला हळूहळू होते परंतु आत्म्याची ही विशेषता आहे की

१) दिव्य कुरआन - ६ : १५८, ७ : ५२, ११ : १७-२८, १६ : ८९.

२) Science and Unseen World (P. 44)

३) Philosophical Aspects of Modern Science.

तो त्यांना त्वरित आंतरिक बोधाच्या रूपात प्राप्त करून घेतो. औसोंसकी (Ospensky) ने दिव्य प्रकटनच्या महत्त्वावर या शब्दांत प्रकाश टाकला.

"जर दिव्य प्रकटन (वह्य)ची अवधारणा नसली तर धर्मच शिल्लक राहत नाही. धर्मात कोणते न कोणते तत्त्व असे अवश्य असते की सामान्य मानव चिंतनक्षेत्राच्या बाहेरचे असते."[१]

दिव्य प्रकटनाद्वारे प्राप्त ज्ञान बुद्धीविपरीत नसून बुद्धीसंगत असते. अर्थातच जर बुद्धी विकृत नसेल म्हणजे निष्पक्ष व पूर्वग्रहापासून मुक्त असावी आणि सत्यप्रियतेचा गुणधर्म असावा. प्रकाशनामुळे आमची बुद्धी, विचार व समज यामध्ये तेजस्विता येते. 'प्रकाशन' मानवीय बुद्धीला पथभ्रष्ट करीत नाही उलट ती तिची साहाय्यक असते. प्रकाशनाद्वारे हे माहीत होते की, मानव मार्गदर्शनास बुद्धी पर्याप्त नाही. कारण मनुष्याला ते सर्व हवे असते ज्यापर्यंत बुद्धीची सरळ पकड असंभव आहे. लॉक (Lock) ने लिहले -

"जी व्यक्ती 'वह्य'ला स्थान देण्यासाठी बुद्धी, विचार व समज यांना बहिष्कृत करते ती वह्य आणि बुद्धी दोघांचे दिवे विझविण्याचा अपराधी आहे."[२]

मात्र बुद्धीने जी वस्तू प्राप्त होते तिच्यासोबत एका प्रकारे अंतरच बनलेले राहते. म्हणूनच तर हेनरी बर्गसन (Henri Bergson) अंतज्ञार्नला महत्त्व देतो. ए.एस. एडिंग्टन (A.S. Eddington) आंतरिक विज्ञानाची गोष्ट करताना दिसून येतो.

वह्य आणि पैगंबरत्व (संदेशवाहकता) च्या माध्यमातून अल्लाहने मनुष्याचे पूर्ण मार्गदर्शनाची व्यवस्था केली आहे. या मार्गदर्शनाद्वारे मनुष्य त्याच्या जीवनाचे मूळ अभिप्राय आणि उद्देशाची परिचित होतो. केवळ इतकेच नव्हे तर या जगातील जीवनात पसरलेल्या बाबतीत आणि समस्येवरही हे मार्गदर्शन प्रकाश टाकते. मग या समस्या सामाजिक असो की राजनैतिक, आर्थिक असो की शैक्षणिक! तात्पर्य, 'वह्य'द्वारा प्राप्त मार्गदर्शनाच्या अनुकरणानेच मनुष्य जगात न्यायाची स्थापना करू शकतो आणि शोषण व अत्याचार यापासून मानवाला मुक्त करू शकतो.

---

१) New Model of Universe (P. 34)

२) Essay Book IVth Quoted by Brightman.

## पैगंबरांचे उच्च स्थान

पैगंबरांचे स्थान अत्यंत उच्च असते. ते चेतनेच्या इतक्या उंचावर असतात की सामान्यत: आम्ही त्याचे अनुमानही करू शकत नाही. बुक (Buke) ने लिहले की, ज्या प्रकारे आत्मचेतना बाळगणारा मनुष्य पशुपेक्षा प्रत्येक दृष्टीने श्रेष्ठ असतो. कारण पशु चेतनेच्या या स्तरावर पोहचलेला नसतो. त्याचप्रमाणे जी व्यक्ती स्थायी रूपात व्यापक चेतना ने संपन्न होते ती आत्मचेतना बाळगणाऱ्या मानवापेक्षा असीमित रूपाने उच्च होते.[१]

चेतनाच्या अशा उच्चतम पातळीवर मानवापैकी जे लोक असतात जग त्यांना पैगंबरच्या नावाने ओळखते. यांना ज्या प्रकारची प्रकाशना प्राप्त होते ती इतक्या उच्चकोटीची असते की तिची तुलना कोणत्याही दुसऱ्या वस्तूने केलीच जाऊ शकत नाही. ही उच्चकोटीची वह्य जेव्हा पैगंबरावर अवतरित होते तेव्हा ते या बाबतीत पूर्णपणे अवगत असतात की ही 'वह्य' अल्लाहकडून येत आहे. या वह्यद्वारा सत्य धारणा, न्याययुक्त आदेश आणि विधी-विधानाचे ज्ञान पैगंबरांना जीवनाच्या प्रत्येक क्षेत्रात लोकांचे मार्गदर्शन करण्यास प्रदान करण्यात येते.

बर्डेव (Bendyaev) ने सांगितले की, पैगंबरांना होणारे दिव्य प्रकटन विशिष्ट प्रकारचे असते. त्याच्या वर्णनाने कळते की, तो या संभावनेला स्वीकार करतो की, सत्याचे प्रकटीकरण अशा प्रकारे होऊ शकते आणि जीवनाच्या अदृष्य रहस्यांना आम्ही अशा प्रकारे जाणून घेऊ शकतो. ज्याप्रकारे कुणी पाठविलेले पत्र वाचून दिलेल्या सुचनांशी अवगत होतो. 'बर्डेव'च्या शब्दांत,

"पैगंबरत्व किंवा पैगंबरी दिव्य प्रकटन वर आधारित असते. पैगंबर जग आणि मानवाची नेमणूक आणि भविष्य यासंबंधी अल्लाहचा आवाज ऐकतो. तो स्वत:ला एकटा पडतो. तो ज्या लोकांना नुकसान व विनाशापासून वाचविण्याचा प्रयत्न करतो ते त्याला दगडाने मारतात. परंतु या सर्वानंतरही तो त्यांना सोडून वेगळा होत नाही. ही प्रकाशना त्याने स्वत:अर्जित केलेली नसते. ही अशी वस्तूही नाही जी क्रमाक्रमाने विकास करून प्राप्त केली जाऊ शकेल. ही एक अंतर्गत वस्तू आहे. एक पैगंबरची प्रकाशना भारत आणि युनानच्या सिद्ध संतांच्या अलौकिक दर्शनपासून नितांत भिन्न वस्तू आहे."[२]

---

१) Cosmic Consciousness (P. 67)

२) The Divine and the Human (P. 136)

औस्पेंसकीच्या विचाराने असे मार्गदर्शक (पैगंबर) मानवताच्या अंतिम पदावर आरूढ होतात. आध्यात्मिक मूल्यांच्या ज्ञानात ते आपल्या पूर्णतेला प्राप्त होतात. वास्तविक हे लोक जीवनाच्या एका नविन स्तरावर प्रकट होतात.[१]

वास्तविक नुबूवत एक असा गुण आणि प्रविणतेचे नाव आहे. ज्यांच्याद्वारे त्या वस्तूंचे ज्ञान होऊ शकते ज्याचे नाव इंद्रिये आणि बुद्धीविवेकाने होऊ शकत नाही. इमाम गजाली यांनी लिहले आहे.

"नुबूवत ला स्वीकार करण्याचा अर्थ हा आहे की, हे मान्य करावे की बुद्धीपेक्षा एक दर्जा उच्चतर आहे आणि ज्यात डोळे उघडली तर त्या विशेष वस्तू माहीत होतात ज्या पासून बुद्धी अगदी वंचित असते. अगदी त्याच प्रमाणे ज्या प्रमाणे श्रवण शक्ति रंगाचे ज्ञान प्राप्त करण्यात बिलकुल असमर्थ असते."[२]

मुजद्दिद अलिफ सानी आणि शेख अहमद सरहिन्दी ने सुद्धा म्हटले आहे की, ज्या प्रमाणे बुद्धीची पद्धत (रीति) ज्ञानेन्द्रियाच्या पद्धतीपासून भिन्न आणि वेगळी आहे; जसे ज्या वस्तू ज्ञानेन्द्रियांच्या आवाक्यात येत नाही. बुद्धी त्यांना प्राप्त करते. त्याच प्रकारे नुबुवतची पद्धत बुद्धीपेक्षा भिन्न आणि त्यापेक्षा वेगळी आहे; ज्या वस्तू बुद्धीच्या आवाक्यात येत नाही, नुबूवतच्या माध्यमातून त्यांचे ज्ञान होते. आता जो व्यक्ती बुद्धीच्या शिवाय ज्ञानाच्या दुसऱ्या कोणत्याही प्रकाराला मान्य करीत नाही. तो वास्तविकपणे नुबुवतच्या पद्धतिला नाकारतो. तो मार्गदर्शनाचा स्पष्ट विरोधी आहे.

## पैगंबरांचा एक विशेष गुण

पैगंबराला पैगंबरी त्या वेळेस मिळते जेव्हा त्यांचे हृदय व आत्मा शुद्ध व अलंकृत करण्यात येते. पैगंबरांना आपल्या अल्लाहतर्फे वैचारिक शक्ति व समज आणि आंतरिक प्रकाश प्राप्त झाल्यावर ते या स्थितीत येतात की त्यांच्यावर स्पष्टतः वह्यचे अवतरण होऊ शकते. ते सत्य व असत्य या मधील अंतराशी चांगल्या प्रकारे अवगत असतात. मग जेव्हा त्यांच्यावर वह्यचे अवतरण होते तेव्हा ती त्या गोष्टीची पुष्टी करते किंवा दुसऱ्या शब्दात त्याची साक्षीदार होते, ज्या नबीवर पूर्वास्थेमध्ये प्रकट करण्यात आली होती. कुरआनच्या विभिन्न श्लोकाने याची पुष्टी होते.

---

१) Meaning and Purpose, - by Kenneth Walker (P.96)

२) मन् कजुम मिनज्जलाल - पृष्ठ. ३१

"आम्ही नूह (अ.) ला त्याच्या लोकांकडे पाठविले होते. (त्याने म्हटले) "मी तुम्हा लोकांना स्पष्टपणे खबरदार करतो, की अल्लाहशिवाय इतर कोणाची भक्ती करू नका अन्यथा मला भीती आहे की तुम्हांवर एके दिवशी दु:खदायक प्रकोप कोसळेल."

(दिव्य कुरआन, ११ : २५-२६)

पवित्र कुरआनमध्ये आहे की, शुऐब (अ.) यांनी सांगितले,

"शुऐब (अ.) ने सांगितले, "बंधूंनो, तुम्ही स्वत:च विचार करा की जर मी आपल्या पालनकर्त्याकडून एका स्पष्ट साक्षीवर होतो आणि मग त्याने मला आपल्याकडून चांगली उपजीविका देखील दिली. (तर त्यानंतर तुमच्या पथभ्रष्टतेत आणि हरामखोरीत तुमचा सहभागी कसा होऊ शकेन?) आणि मी हे मुळीच इच्छित नाही की ज्या गोष्टींपासून मी तुम्हाला रोखतो त्या गोष्टी मी स्वत: कराव्यात."

(दिव्य कुरआन, ११ : ८८)

याच प्रकारे पैगंबर (स.) यांच्याविषयी कुरआनमध्ये आले आहे,

"सालेह (अ.) ने सांगितले, "हे माझ्या देशबंधुंनो! तुम्ही कधी या गोष्टीचादेखील विचार केलात काय की जर मी आपल्या पालनकर्त्याकडून एक स्पष्ट साक्ष बाळगत होतो आणि त्याने आपल्या कृपेने देखील मला उपकृत केले तेव्हा यानंतर अल्लाहच्या तावडीतून मला कोण वाचवील जर मी त्याची अवज्ञा केली?"

(दिव्य कुरआन, ११ : ६३)

अल्लाहचे अंतिम पैगंबर मुहम्मद (स.) यांनी जेव्हा अल्लाहचा संदेश लोकांपर्यंत पोहचविण्याच्या शुभकार्याचा आरंभ केला तेव्हा अज्ञानी लोकांनी खूप विरोध केला. विरोधी म्हणायचे हा व्यक्ती स्वयं गोष्टी घडतो आणि सांगतो की या गोष्टी अल्लाहकडून माझ्यावर अवतरित झाल्या आहेत. कुरआन सांगतो जर हे दिव्य प्रकटन अल्लाहचे नाही तर तुम्हीसुद्धा अशाच सुक्तीची रचना करून आणा. परंतु त्यांना हे सामर्थ्य प्राप्त नाही की ते अल्लाहचा मुकाबला करू शकतील आणि अवतरित ईशवाणीसमान वाणी तयार करू शकेल. विरोधी भौतिक जीवन आणि त्यात प्राप्त सुख-सुविधाचे पुजारी आहेत, त्यांना माहीत नाही की, सत्याच्या विरोध करण्याचा परिणाम नरकाग्नीच्या  व्यतिरिक्त दुसरे काहीही होऊच शकत नाही. याच संबंधात सांगितले गेले की पथभ्रष्टता आणि अंधकार कधीही सत्यमार्ग आणि प्रकाशाच्या तुल्य (समान) होऊच शकत नाही. तसेच ज्या व्यक्तीचे जीवन अंधारात भटकण्याशिवाय काही नाही, काय तो त्या व्यक्तीच्या पदापर्यंत पोहचू शकतो जो सत्यप्रिय आहे आणि अंधारात नव्हे तर पूर्णत: चक्क प्रकाशात जीवन व्यतीत करीत आहे? पैगंबर मुहम्मद (स.) विषयी कुरआनमध्ये सांगितले आहे,

"मग बरे ती व्यक्ती जी आपल्या पालनकर्त्याकडून एक स्पष्ट साक्ष बाळगत होती, यानंतर एक साक्षीदार देखील पालनकर्त्याकडून (त्या साक्षीच्या समर्थनार्थ) आला, आणि अगोदरच मूसा (अ.) चा ग्रंथ मार्गदर्शक व कृपा म्हणून आलेला देखील उपस्थित होता, (तोसुद्धा भौतिकवाद्यांप्रमाणे याचा इन्कार करू शकतो काय?) असले लोक तर त्याच्यावर श्रद्धा ठेवतील." (दिव्य कुरआन, ११ : १७)

उपरोक्त आयतीत 'मग काय ती व्यक्ती'शी अभिप्रेत पैगंबर मुहम्मद (स.) आहे. पैगंबरत्वाच्या आधी आपणास (स.) ती आंतदृष्टी आणि प्रकाश प्राप्त झाला होता, जो ईशवह्यसाठी अनिवार्य आहे. आम्ही यापूर्वीही हे स्पष्ट केले आहे की, पैगंबरत्वापूर्वी नियुक्त करावयाच्या व्यक्तीचा आत्मा आणि हृदयाचे शुद्धीकरण स्वत: अल्लाहतर्फे केले जाते. तपश्चातच ती व्यक्ती वह्य ग्रहण करण्यायोग्य होते. वह्य अवतरणाची सत्यता व प्रमाणिता आणि तिचे ईशवाणी होणे याबद्दल कुठलीही शंका राहत नाही. पैगंबर मुहम्मद (स.) यांच्याजवळ अल्लाहचे सुस्पष्ट प्रमाण पैगंबरत्व बहाल होण्यापूर्वीही होते. आपला आत्मा शुद्ध होता. आपण प्रत्येक प्रकारच्या दुष्कृत्यापासुन अलिप्त व पवित्र होते. मन आणि आत्म्याची पवित्रता आपला विशेष गुण होता. विचार आणि कर्माशी संबंधित कोणत्याही प्रकारच्या घृणित अथवा दूषित गोष्टीशी आपला यत्किंचितही संबंध नव्हता. काल्पनिक ईश्वरासमोर आपण कधीही नतमस्तक झाला नाहीत. मूर्तीपूजेपासून आपण नेहमी दूर राहायचे व त्यांच्या समोरील वस्तू आपण कधीही ग्रहण केली नाही. दारू (मदीरा) आणि अश्लील कृत्याशी स्वप्नातही आपले नाते नव्हते. केवळ एकमेव अल्लाहकडे आपले लक्ष केंद्रित असायचे. वह्य अवतरणानंतर त्या सत्याचे आपण स्वत: एक साक्ष बनले. ते सत्य जे आपल्याला यापूर्वीही प्रिय होते. पैगंबरत्व प्राप्त होणे म्हणजे पूर्वाधाच्या प्रकाशात अवतरित प्रकाश संमिश्र होऊन सूर्यप्रकाशापेक्षा अधिक तेजस्वी झाला; जणूकाही मधुरता माधुर्याचा सन्मान करीत आहे आणि सुंदरता सौंदर्याचे स्वागत आणि पवित्रतेचे समर्थन करीत आहे. दुसऱ्या शब्दांत पैगंबर (स.) यांना सत्यतेचे साक्षी बनविले जाते. मग वह्यच्या माध्यमातून सत्याचे विस्तृत ज्ञान आणि त्याविषयी व्यवहार व कर्म याविषयी शिकवण देण्यात येते.

पवित्र कुरआनच्या उपरोक्त आयातीत 'सुस्पष्ट प्रमाण'च्या शब्दांचा प्रयोग करण्यात आला आहे. हा मूळ अरबी शब्द 'बैयनिह'चा अनुवाद आहे. या आयतीत स्पष्ट प्रमाण नंतर 'वह्य' अवतरित होण्याचा उल्लेख करण्यात आला आहे. यावरून ही गोष्ट नि:संशय सिद्ध होते की पैगंबर किंवा प्रेषित हे पैगंबरत्व प्राप्त होण्यापूर्वीही भ्रष्ट नसतात. उलट एक प्रकारचा सत्याचा प्रकाश त्यांच्यासोबत असतो. तसेच बुद्धी व

विवेक आणि आपली अभिरूची (इच्छा-आकांक्षा) व प्रकृतीच्या दृष्टीने अत्यंत स्वस्थ आणि पवित्र अवस्थेत असतात. या आयतीत पैगंबरांवर अवतरित 'वह्य'ला दयाळुता-कृपा; उत्तम आजीविका आणि प्रकाशची संज्ञा देण्यात आली आहे. या प्रकारच्या 'अभिव्यंजना' (दुसरे अर्थ स्पष्ट करणारी उपमा) ची उदाहरणे कुरआनमध्ये अनेक जागी आढळतात. केवळ कुरआनच नव्हे तर यापूर्वीची ईशग्रंथ तौरात, इंजिलमध्येसुद्धा दिसते.

महापंडित हमीदुद्दीन फराही यांनी लिहले की, अल्लाह आपल्या पैगंबराला सर्वात प्रथम एकेश्वरत्व, नमाज (प्रार्थना) न्याय आणि अल्लाहकडे समपर्ण (अल्लाहसमक्ष) करणे आणि (विकसित) उन्मेख होण्याची शिकवण देतो. यामुळे त्यांच्या हृदयाला परितोष (संतोष) प्राप्त होतो आणि त्याच्या प्रकृतीला अपेक्षित वस्तू प्रकाशनाद्वारे प्राप्त होते, पाहा दिव्य कुरआन (२० : १२-१६) एकेश्वरत्व आणि नमाजनंतर कृतज्ञता अर्थात भलाईचा आदेश देतो. समस्त सत्कर्माचे मूळ नमाज आणि जकात आहे. म्हणून तो याकडेच आमंत्रित करतो आणि या दोहोंच्या आधारावर स्वर्गाची शुभसूचना देतात आणि परलोकाच्या (मृत्युपश्चात) यातनांची कल्पना देऊन त्याप्रति भीती निर्माण करतात. कारण या दोघांची अवहेलना समस्त वाईट कृत्ये आणि बिघाडचे मूळ आहे.

पैगंबरांच्या शिकवणीचे अध्ययन केल्यास कळते की, ते ज्या सत्याकडे आम्हाला आमंत्रित करतात आणि जीवनाच्या ज्या नियम आणि मर्यादांचे अनुसरण करण्यावर जोर देतात त्या अनुसरणाशी अभिप्रेत मानवआत्माच असतो. कारण सत्य आणि त्याचे नियम व मर्यादाविहीन आत्मा नीतीभ्रष्ट व मलीन तर होऊ शकतो परंतु उच्चता आणि सौंदर्याची प्रतिमा होऊ शकत नाही.

प्रिंसिपल क्रेंडिट लिहतो,

"परम सत्याशी संलग्न जीवन काही अपरिचित जीवन नसते. असे जीवन जर बाहेर दुसरीकडे असेल तर ते आमच्या स्वत:च्या अंतर्मनातही असते. याच्या पुढे मान तुकविणे म्हणजे बाह्य दमनकारी नियम व कायदे किंवा कोणत्याही बाह्य सत्याची अधिनता अंगीकारणे मुळीच होत नाही; तर एका अशा कायद्याचे अनुसरण होय जो आमच्या स्वत:च्या प्रकृती (स्वभाव)चा कायदा असतो. ही आज्ञाकारिता एका अशा शासकाची आहे ज्याचे राज्य सिंहासन आमच्या हृदयाच्या अथांग सागरात आहे."[१]

१) Introduction to the philosophy of Religion. (P. 237)

नि:संशय अल्लाह आणि स्वयंम मनुष्यामध्ये अनुकूलता निर्माण करणे आणि त्याच्या आदेशाचे अनुसरण म्हणजे स्वत:शी विद्रोह नव्हे तर ते आपल्या स्वत:च्या प्रकृतीचा आदर करणे होय. प्राकृतिक नियम आणि आदेशांचे अनुसरण करूनच सृष्टीतील सर्व पशु जगतात. याच नियमाच्या अनुसरणानेच संपूर्ण जग विद्यमान आहे आणि त्याची सर्व सुंदरता याच प्राकृतिक आदेशाच्या अनुकरणाचे फळ होय. पैगंबरांद्वारे आम्हाला चेतनेच्या स्तरावर प्राकृतिक आणि नैसर्गिक आदेशाचे ज्ञान प्राप्त होते. पैगंबर आम्हाला आमच्या वास्तविक प्रकृतीशी अवगत करतात. ते आम्हाला आमच्या वास्तविक कामना व अभिलाषांची सूचना देतात. पैगंबर वास्तविकतेत प्रकृतीची (निसर्ग), ध्वनी (आवाज) असतात. म्हणूनच त्यांनी आणलेल्या (प्रस्तुत केलेल्या) 'दीन' (धर्म-जीवनपद्धत) ला'स्वाभाविक धर्म' म्हणतात. तसेच प्राकृतिक आदेशाला 'मारुफ' (भलाई अर्थात ते कर्म अथवा वस्तू ज्यांच्याशी आमचा आत्मा परिचित असतो.) तर त्यांनी (पैगंबर) दाखविलेले जीवन व्यतीत करण्याच्या मार्गाला 'सिराते-मुस्तकीम' (सरळ आणि सहज मार्ग) म्हणतात. तो ज्या कृत्यापासून आम्हाला रोखतो अथवा प्रतिबंधित करतो त्यांना 'मुन्कर' (अशा वस्तू अथवा कर्म जी आत्म्यासाठी अनोळखी आहेत) म्हणतात कुरआनने पैगंबर मुहम्मद (स.) यांना 'मुजक्किर' अर्थात स्मरण करविणारा म्हटले आहे. ते आपल्या जातीमध्ये जे कार्य करतात त्याला 'तजकीर (अनुस्मरण) या शब्दाने संबोधले. मानव-प्रकृतीच्या विरुद्ध काही निर्माण करणे हे पैगंबराचे कार्य कदापिही नाही; ते तर त्या गोष्टीला सुस्पष्ट करतात, जी आमच्या अंतर्मनी पूर्वीपासूनच उपलब्ध असते. म्हणूनच प्रलयानंतर हिशेबाचे दिवशी अल्लाहसमक्ष विरोधक आपला गुन्हा मान्य करतील. ते हे सांगणार नाहीत की 'आम्हाला सत्याची सूचनाच नव्हती' उलट ते स्वत:च आपल्याविरुद्ध साक्ष देतील की ते अकृतज्ञ व सत्याचा नकार करणारे होते. अर्थातच हा त्यांचा उद्धटपणा होता की त्यांनी सत्याचा इन्कार केला.[१] आमची प्रकृती अर्थात आमची वास्तविक कामना आणि अभिलाषाच आहेत ज्या पैगंबरांनी आणलेल्या धर्माचा आधार आहेत.

पैगंबर जेव्हा एखाद्या जाती-संप्रदायाकडे येतात तेव्हा त्या जातीसाठी एक प्रकारचे परीक्षण आणि निर्णयाचा दिवस असतो. कुरआन आणि यापूर्वी अवतरित ईशग्रंथात याचा उल्लेख मिळतो. सत्य आणि असत्य यांच्या संघर्षात विजय सत्याचा होतो. जेव्हा विरोधकांचा विरोध अंतिम सीमेला पोहचतो आणि सत्याचे संख्याबळ

१) दिव्य कुरआन - ६ : १३०

अतिशय कमी असते, तेव्हा दैवी प्रकोपाद्वारे विरोधकांचा नाश केला जातो. अशा दैवी प्रकोपापूर्वी त्यांना आपली नीती बदलण्याची व सत्याचा स्वीकार करण्याची संधी देण्यात येते. त्यांना चेतावणी देण्यात येते की त्यांनी जर विद्रोही नीती सोडली नाही, समाजात उपद्रव माजवणे बंद केले नाही तर अल्लाहचा प्रकोप येईल. परंतु जेव्हा ते या संधीचा लाभ घेऊ इच्छित नाहीत आणि त्यांच्या कृत्याने हे स्पष्ट होते की त्यांना ईशयातनाच अभिष्ट आहेत; अशा लोकांच्या जीवनाची वैधता समाप्त होते. सत्याच्या अनुयायींनी असत्यावर विजय प्राप्त करून भूतलावर ईशविधी-विधान स्थापित करून न्याय, शांती व समानता स्थापित केली असती.

मागील पानावर आम्ही हे स्पष्ट केले आहे की, पैगंबर अशा उच्च स्थानावर असतात की त्यांना आपल्या पैगंबराविषयी कोणत्याही प्रकारचा संदेह राहत नाही. त्यांना शंका-कुशंका वेढत नाही. पैगंबर होण्याच्या नात्याने ते जे काही ऐकतात आणि बघतात त्याच्या सत्यतेविषयी यत्किंचितही संशय त्यांच्या मनात नसतो. जे तथ्य आणि ज्या गोष्टी पैगंबरांवर अल्लाहकडून प्रकट होतात मग ते 'इलहामी ज्ञाना'द्वारे सरळ हृदयात प्रविष्ट करण्यात आले असो किंवा 'प्रकाशना'च्या माध्यमातील ईशवाणीचे शब्द असोत; तात्पर्य, ईशसंदेश कोणत्याही रूपात असो त्यांना त्या बाबतीत मुळीच शंका नसते. सैतान आणि दुरात्म्याच्या प्रभावाने ते पूर्णपणे सुरक्षित असतात. पैगंबरांना आपल्या पैगंबर होण्यावर इतका दृढ विश्वास असतो जितका मासोळीला स्वत:च्या जलतरणपटू होण्यावर आणि पक्ष्याला आपल्या उडण्यावर असतो. म्हणूनच पैगंबरांच्या हृदयात क्षणासाठीही ही शंका डोकावत नाही की ते पैगंबर नाहीत, किंवा त्यांना पैगंबर होण्याचा भ्रम झाला आहे. पैगंबर नेहमी पूर्ण प्रकाशात असतात आणि लोकांना प्रकाशाकडेच आमंत्रित करतात. पैगंबरांच्या उच्चतम पदाकडे बघून अल्लाहच्या आकाश आणि भूतलावर पसरलेल्या ईशराज्याचे प्रत्यक्ष निरीक्षण करविले जाते. सत्यतेवरील भौतिक आवरण बाजूला सारून सत्यतेचे दर्शन करविले जाते. ते सत्य ज्यांच्यावर अप्रत्यक्ष रूपात श्रद्धा बाळगण्यास मानवाला आमंत्रित करते. पैगंबरांचे पद हे दार्शनिक (तत्त्ववेत्ता) पदापेक्षा पूर्णपणे भिन्न असते. पैगंबर जे सांगतात ते प्रत्यक्ष ज्ञान व प्रत्यक्ष अवलोकनाच्या आधारावर सांगतात तर दार्शनिक जे काही सांगतात ते आपली बुद्धी व अनुमानावर आधारित असते. दार्शनिक काल्पनिक जगात कितीही उंच भरारी घेत असेल व आपल्या कथनात सूक्ष्मदर्शितेचा परिचय देत असेल तरीही त्याच्या अनुमानाची तुलना पैगंबरांचे ज्ञान, व्यक्तीगत अनुभव आणि अवलोकनाशी करता येत

नाही. हेच कारण आहे की, तत्त्ववेत्त्याच्या तत्त्वज्ञानाच्या अध्ययनाने मन नि:संशयित होत नाही आणि आम्हाला ती शांती आणि अलौकिक आनंद प्राप्त होत नाही जो पैगंबरांवर अगाढ श्रद्धा व त्यांच्या अनुसरणाने प्राप्त होते. एक दार्शनिक कधीही सत्याचा प्रत्यक्षदर्शी असत्याचा दावा करत नाही व करूही शकत नाही, तो केवळ संभावित सत्याचीच गोष्ट करतो. यांच्यापुढे जाण्याची क्षमता केवळ पैगंबरांनाच प्रदान करण्यात आली आहे. पैगंबरांचा हाच प्रयत्न असतो की आम्हाला आमच्या आत्म्याचा आवाज सुस्पष्ट ऐकायला यावा. ते आमच्यावर काहीही लादण्याचा प्रयत्न करीत नाहीत. ते आमच्या हृदयात अशी कोणतीही धारणा-संकल्पना प्रविष्ट करण्याचा प्रयत्नही करीत नाहीत जी आमच्यासाठी अपरिचित किंवा परकी आहे आणि त्या गोष्टीच्या व आमच्यामध्ये एकात्मता नाही. तो आम्हाला आमच्या मुर्छितावस्था व बेपर्वाईपासून मुक्त करून आमची ऐकण्याची व बघण्याची क्षमता तीव्र करतो. पैगंबरांची कामना हीच असते की आमच्या सत्याच्या मध्यात आवरणाची भिंत जर पूर्णपणे दूर होत नसेल, तर निदान ती इतकी पारदर्शक व्हावी की परोक्ष जगताचे प्रतिबिंब कोणत्या न कोणत्या दर्जात (अनुभव) ज्ञात व्हावे. मनुष्याच्या प्रकृतीला पूर्णपणे नष्ट करणे हे विरोधकांच्या आधिपत्यात नाही. ते आपल्या मिथ्या (असत्य) गोष्टीद्वारे लोकांना वास्तविक प्रकृतीपासून दूर करण्याचा प्रयत्न तर करू शकतात, परंतु ते यात सफल होऊ शकत नाहीत. मानवप्रकृती यानंतरही जीवनात प्रकट होण्यास धडपड करते, अशा वेळी तिला बाह्य आश्रयाची गरज असते. मनुष्याला सत्याची प्राप्ती व्हावी यासाठी यामधील अडचणी दूर करण्याचा आटोकाट प्रयत्न अल्लाहचे पैगंबर करतात; जसे एखादा बहुमूल्य हिरा जो चिखलाने लिप्त असल्यामुळे आपली चमक हिरावतो. परंतु जवाहिरांच्या व्यापाऱ्यालाही जाण असते की, तो हिरा आहे, केवळ घाणीच्या बाह्य आवरणामुळे त्याचे प्राकृतिक स्वरूप त्याला माहीत नाही. जवाहिऱ्याचा हाच प्रयत्न राहील की हिऱ्यावरील घाण दूर करावी म्हणजे त्याची प्राकृतिक चमक-दमक त्याला प्राप्त होईल.

पैगंबर आपल्या व्यक्तीत्वाच्या दृष्टीने सर्वथा एक आकर्षक व सुंदर संदेश देतात. साहजिकच तो ईशसंदेश असल्यामुळे सुंदर व आकर्षक का बरे नसणार! या संदेशात झोपी गेलेल्या आत्म्याला जागृत करण्याची क्षमता असते. म्हणूनच पैगंबर स्मरण बनून जगात येतात. ते मनुष्याला त्या गोष्टीचे स्मरण करवितात जिचा त्याला सामान्यत: विसर पडलेला असतो.

पावित्र कुरआन सांगतो,

"अल्लाहने तुमच्याकडे एक उपदेश अवतरला आहे. एक असा पैगंबर जो तुम्हाला अल्लाहची स्पष्टपणे मार्गदर्शन करणारी वचने ऐकवितो जेणेकरून श्रद्धावंत व सत्कृत्ये करणाऱ्यांना अंधारातून काढून प्रकाशात आणावे."

(दिव्य कुरआन, ६५ : १०,११)

पैगंबरांची सर्वात पहिली शिकवण हीच असते की लोकांनी एकमेव अल्लाह आणि कर्मफळाची धारणा स्वीकार करावी. त्याचा संदेश हाच असतो की लोकांनी एकमेव अल्लाहमध्ये विश्वास बाळगावा आणि त्याने दिलेल्या आदेशानुसार जीवनयापन करावे. कारण अल्लाहच आमचा स्रष्टा, पालनकर्ता आणि रक्षक आहे. आमचा आत्मा जे प्राप्त करण्यास व्याकूळ असतो, त्याच्या परिपूर्णतेचे आयोजन तो करेल आणि आम्हाला अशा उच्च शिखरावर पोहचवेल जेथे केवळ प्रकाश आहे. अंधकार नाही; जेथे जीवन आहे मृत्यू नाही. आमचे जीवन भ्रष्ट व पतित व्हावे हे त्याला कधीही पसंत पडणार नाही. म्हणूनच तो त्या प्रिय उपदेशाला प्राप्त करण्यास आमचे मार्गदर्शन करतो ज्याला प्राप्त केल्यावर प्रत्येक प्रकारच्या शंका-कुशंका व भय यापासून मनुष्य मुक्त होतो.

एकेश्वरत्व आणि कर्मफळ यामध्ये गाढ संबंध आहे. एकेश्वरवादी होणे याचा अर्थ केवळ प्रबोधन प्राप्त करणे नसून व्यवहारात अल्लाहचा आज्ञाकारी होणे अनिवार्य आहे. अल्लाहचा अवज्ञाकारी व अकृतज्ञ अपराधी असल्यामुळे ईशदंडाचाच पात्र असतो. इतिहासाच्या अध्ययनाने हे सिद्ध आहे की, एक परमसत्ता आहे, जिच्या शासनाच्या आधीन हे जग आहे. त्याच्या प्रकोप व दयेचे चमत्कार ऐहिक जीवनातही प्रत्ययास येत असतात. जेव्हा एखादी जात अथवा संप्रदाय दुष्कर्माच्या सीमा पार करतो आणि अत्याचाराच्या उच्च शिखरावर पोहचतो तेव्हा तो समुदाय अत्यंत मलिन होतो किंवा पुरेपूर मिटविला (नष्ट) जातो. अल्लाह त्या समुदायाला प्रतिष्ठा प्रदान करतो जो जमिनीवर बिघाडाचे नव्हे तर रचनात्मक (बनावटी) कार्यात प्रयत्नशील असतो जो जमिनीवर विध्वंस नव्हे तर निर्माणकार्याचा प्रेरक असतो. या भौतिक जगात जेव्हा अल्लाह जुलूम व अत्याचार करणाऱ्या समुदायाची धरपकड करतो आणि न्याय स्थापन्यासाठी व मानव हितासाठी कार्यरत समुदायावर त्याची दया कृपा होते, तर मग परलोकात नश्वर जगातील कर्मांचा मोबदला देण्याचा दिवस असेल. अत्याचारी व जुलमी लोकांना तो दंड का बरे देणार नाही? तसेच त्या दिवशी आपल्या प्रामाणिक व

आज्ञापालक दासांना आपल्या दयाकृपेपासून वंचित कसा ठेवेल? पारलौकिक जीवनात (मृत्यूपश्चात) जे काही बघायला मिळेल त्याला कोणत्याही दृष्टीने अनुचित अथवा अयोग्य ठरविता येत नाही. वर्तमान लोकजीवनाला 'आज' तर परलोकाला उद्या म्हणता येईल. ज्या व्यक्तीचा अथवा समुदायाचा 'आज' सुंदर (अगदी ईशआदेशाचे अनुसरणाने) आकर्षक असेल त्याचा 'उद्या'ही सुंदर व आकर्षक असेल. तात्पर्य, उद्याचा येणारा हा दिवस कुणासाठी दुःखदायक तर कुणासाठी आनंददायक असेल.

या बाबतीत हे तथ्यही विसरता कामा नये की, नैतिक आणि विधी-विधान या दोन्ही दृष्टीने एका सामान्य समुदायाच्या तुलनेत त्या समुदायाचा मामला सर्वथा भिन्न असतो. ज्या समुदायात प्रत्यक्ष पैगंबर पाठविला जातो व पैगंबराचे प्रत्यक्ष संबोधन त्याला प्राप्त होते. ज्या समुदायात पैगंबर जन्माला येतो आणि त्यांच्याच भाषेत ईशसंदेश प्रस्तुत करतो. पैगंबरांचे व्यक्तीत्वाचा प्रभाव आणि त्यांच्या सत्यतेची चमक लोकांसमोर प्रत्यक्षपणे उपलब्ध असते. ते आपल्या समुदाया समक्ष जीवन-आदर्शाच्या रूपात असतात. त्यांचे जीवन कल्पित कहाणी मात्र नसते तर जिवंत यथार्थ रूपात दृष्टीसमोर असते, अशा समुदायावर अल्लाहची हुज्जत पूर्ण होते. अशा समुदायासाठी श्रद्धा (इमान) धारण न करणे अथवा त्यात विलंब करण्याचे कारण प्रस्तुत करण्याची कोणतेही कारण प्रस्तुत करण्याची कोणतीही संधी नसते. तसेच जो समुदाय ईशपैगंबराला प्रत्यक्षपणे असत्य करार देतो आणि इतकेच नव्हे तर त्याच्या जीवाचा शत्रू होतो तो आपल्या या दुष्ट आणि धुष्टतेमुळे पुरेपूर विनाशास पात्र ठरतो. अशा संप्रदायाला अजून काही संधी देण्याचा प्रश्नच नसतो. कारण तो तर पैगंबराच्या जीवाचाही शत्रू झाला आहे. पवित्र कुरआन मध्ये नमुद आहे की,

"हे लोक पृथ्वीवर कधी निरीक्षण करीत नाहीत काय की यांना त्या लोकांचा शेवट दिसला असता जे यांच्यापूर्वी होऊन गेले आहेत? ते यांच्यापेक्षा अधिक शक्तिमान होते आणि यांच्यापेक्षा अधिक प्रबळ अवशेष पृथ्वीवर सोडून गेले आहेत. परंतु अल्लाहने त्यांच्या अपराधांबद्दल त्यांना पकडले आणि त्यांना अल्लाहपासून वाचविणारा कोणीही नव्हता. असा त्यांचा शेवट यामुळे झाला की त्यांच्याजवळ त्यांचे पैगंबर स्पष्ट प्रमाण घेऊन आले आणि त्यांनी मानण्यास नकार दिला. सरतेशेवटी अल्लाहने त्यांना पकडले. निश्चितच तो मोठा सामर्थ्यवान आणि शिक्षा देण्यात अत्यंत कठोर आहे." (दिव्य कुरआन, ४० : २१-२२)

हा ऐहिक जीवनाचा परिणाम आहे. या लोकांची परलोकात काय अवस्था होईल याचे वर्णन कुरआन या शब्दांत करतो,

"तो दिवस, जेव्हा सर्वजण उघडे असतील, अल्लाहपासून त्यांची कोणतीही गोष्ट लपलेली नसेल. (त्या दिवशी पुकारून विचारले जाईल.) आज साम्राज्य कोणाचे आहे? (सर्व जग मोठ्याने उद्‌गारेल) एकमेव महाप्रतापी अल्लाहचे. सांगितले जाईल आज प्रत्येक सजीवाला त्या कमाईचा बदला दिला जाईल जी त्याने केली होती, आज कोणावर कसलाही अत्याचार होणार नाही, आणि अल्लाह हिशेब घेण्यात फार तत्पर आहे."

(दिव्य कुरआन, ४० : १६-१७)

ज्या लोकांनी पैगंबरांना जाणले आणि त्यांचे मार्गदर्शन स्वीकारले ते जागरूक लोक होते. ते मूर्च्छितावस्थेत नव्हते आणि कोणत्याही प्रकारच्या पूर्वग्रहाने ग्रस्त नव्हते. त्यांनी पैगंबराचा संदेश आणि आपल्या आत्म्याच्या हाकेला प्रतिसाद दिला. त्यांना हृदयात होत असलेली सत्याची धकधक स्पष्टपणे ऐकू येत होती. पैगंबरांनी आणलेल्या प्रकाशात त्यांचे स्वत:चे वास्तविक स्वरूप दृष्टिगोचर होऊ लागले. परिणामत: त्यांना स्वत:चे अस्तित्व आणि प्राण (जीव) यापेक्षा पैगंबर प्रिय झाला. त्यांना आपल्या व पैगंबराच्या निकटतम आणि मधुर संबंधाचा आभास होऊ लागला. अल्लामा हमीदुद्दीन फराही लिहतात,

"पैगंबर (नबी) ज़ातीचे अनुभवशाली हृदय असते. त्यांचा दर्जा व योग्यता कान, नाक आणि हृदयाचा असतो."

किती विवेकशील आहेत ते लोक अथवा तो समुदाय ज्याला पैगंबरांच्या कानाने ऐकणे, डोळ्याने बघणे आणि हृदयाच्या माध्यमातून समजणे आणि अनुभव करणे सुलभ होते. परंतु सामान्यत: या लोकांना त्यांच्या पैगंबराशी असलेल्या गाढ संबंधाचे ज्ञान नसते. ते यापासूनही अनभिज्ञ असतात की पैगंबरांच्या आदेशाचे उल्लंघन अथवा इन्कार केवळ स्वत:प्रति अप्रामाणिकताच नव्हे तर ते स्वत:ला आघात पोहचवित आहेत. अल्लाहची ही विशेष कृपा आहे की त्याने मार्गदर्शनाची सर्व माध्यमे जसे बुद्धी, विवेक, सृष्टी आणि स्वयम् मानवाचा आंतरात्मा इत्यादीमध्ये आढळणारे सूक्ष्म संकेत आणि चिन्हांच्या सहकार्यास स्पष्ट मार्गदर्शनाची व्यवस्था केली. यासाठी त्याने आमच्याकडे आपले पैगंबर पाठविले. पैगंबरांवर आपले ग्रंथ अवतरित केले. या ग्रंथांतून अगदी स्पष्टपणे सांगितले की, एकेश्वरत्व काय आहे आणि त्याच्या काय अपेक्षा आहेत? कृतज्ञता प्रकट करण्याचा मार्ग कोणता आणि अकृतज्ञतेची नीती कोणती आहे? या ग्रंथाद्वारे हेसुद्धा स्पष्ट केले गेले की कृतज्ञतेचा मार्ग स्वीकार करणाऱ्या लोकांचा परिणाम

किती तेजस्वी, सुंदर व आनंददायक होईल आणि अकृतज्ञतेची नीती अंगीकार करणाऱ्यांचा परिणाम किती भयानक व दुःखद होईल. पैगंबरांच्या या शिकवणीचा मानवजातीवर जो प्रभाव पडला तो इतका खोलपर्यंत आहे की जगात आजही अल्लाह आणि परलोकाची धारणा जेथे आहे तेथे सत्कर्म आणि दुष्कर्म यामध्ये अंतर केले जाते. दया आणि करूणाची चर्चा होते. या सर्वाच्या मुळाशी पैगंबराची शिकवण आहे, ही वास्तविकता आहे. पैगंबरी शिकवणीचा हा प्रभाव जगातील विभिन्न समुदायांत दिसून येतो. आता हा भाग वेगळा आहे की त्या संप्रदायांना हे माहीत नसावे की या मौलिक प्राकृतिक धारणा आणि भावनांचा मूळ स्त्रोत काय आहे?

## पैगंबरांच्या आगमनाची आवश्यकता

प्रिय वाचक आतापर्यंतच्या चर्चेत ही गोष्ट स्पष्ट झाली आहे की पैगंबर जगात मानवहृदयावर प्रलोभन आणि काल्पनिक विचारांनी जे आवरण घातले आहे ते बाजूला सारून प्राकृतिक सत्याचे रहस्य त्यांचेवर प्रकट करण्यास येत राहिले. यांच्याद्वारे मानवी जीवनाचा अभिप्राय (हेतू) काय आहे? अल्लाहने कोणत्या योजनेअंतर्गत मनुष्याला निर्माण केले? मनुष्याच्या या जीवनयात्रेचा अंत काय आहे? काय मृत्युपश्चात जीवन आहे किंवा नाही? परोक्षाच्या संबंधित या बाबीचे सत्य जाणून घेण्याचा कोणताही मार्ग अथवा विश्वसनीय साधन मनुष्याजवळ उपलब्ध नाही. परंतु वास्तविक सत्य हे आहे की, परोक्षाशी संबंधित या बाबी मानवी जीवनात सर्वात जास्त मौल्यवान आहेत. म्हणून परोक्षाविषयी हमखास सत्याचे आकलन होणे आमची सर्वात मोठी व प्रमुख आवश्यकता आहे. आमची ही आवश्यकता वरकरणी उद्याची वाटत असली तरी ती वर्तमान आहे. कारण परोक्षच्या ज्ञानाशिवाय आमचे आजचे मूल्य निर्धारण करणे असंभव आहे. जीवनाच्या या बहुमूल्य गरजेची उपेक्षा (तिरस्कार) करणे जीवनाप्रति उदासिनता (विरक्ती) प्रकट करणे, न्यायाच्या दृष्टीने सर्वात मोठा अपराध आहे. परोक्षाविषयी सत्य ज्ञान अल्लाहशिवाय अजून कोठूनही प्राप्त होऊ शकत नाही. अल्लाहने दिलेल्या ज्ञानापासून अनभिज्ञ होऊन मनुष्य केवळ कल्पना आणि अनुमान यापलीकडे काही करू शकत नाही आणि अटकळ व अनुमान कधीही सत्याचा बदला होऊ शकत नाही. जीवनाची वास्तविक रूप-रेखा निर्धारित करण्यास आवश्यक आहे की जीवनाच्या या महत्त्वपूर्ण भागाचे पूर्ण व अचूक ज्ञान असावे ज्याचा संबंध परोक्षाशी आहे. जीवनाला पारिभाषित करण्यास परोक्षाविषयी ज्ञान, एक मौलिक गरज आहे; याच विशिष्ट आवश्यकतेच्या पूर्ततेसाठी पैगंबरांचा क्रम अथवा शृंखला आरंभ करण्यात आली. कुरआन सांगतो,

"परंतु अल्लाहची ही प्रथा नाही की त्याने तुम्हाला परोक्षाची पूर्वसूचना द्यावी. (परोक्षाच्या गोष्टीची माहिती देण्याकरिता तर) तो आपल्या पैगंबरांपैकी ज्याला इच्छितो त्याची निवड करतो म्हणून (परोक्षाच्या गोष्टीच्या बाबतीत) अल्लाह आणि त्याच्या पैगंबरावर श्रद्धा ठेवा." (दिव्य कुरआन, ३ : १७९)

"तो अल्लाहच आहे ज्याच्या व्यतिरिक्त कोणी उपास्य नाही, तो बादशाह आहे अत्यंत पवित्र, सर्वस्वी शांती अभयदान करणारा, निगाहबान, सर्वांवर प्रभावी आपली आज्ञा बळाने लागू करणारा आणि मोठाच बनून राहणारा, पवित्र आहे अल्लाह त्या अनेकेश्वरवादापासून जे हे लोक करीत आहेत." (दिव्य कुरआन, ५९ : २३)

उपरोक्त आयतीत अल्लाहला सम्राट म्हणजे बादशहाची संज्ञा दिली आहे आणि हे सर्व विहीत आहे की बादशहा प्रजेच्या प्रत्येक व्यक्तीशी सरळ संपर्क ठेवत नाही. तो विशेष दूत अथवा प्रतिनिधी नियुक्त करतो, तेच बादशहाच्या आदेशांना प्रजेपर्यंत पोहचवतात. हीच पद्धत सम्राटाला साजेशी आहे. सम्राट केवळ सिंहासनाचा सम्राट नसतो, त्याचे हे कर्तव्य आहे की प्रजेसाठी असे आदेश व विधान पाठवावेत ज्याच्या अनुसरणाने प्रजा सुखी होईल व सम्राटही प्रसन्न होईल. सम्राटच्या आदेशाचे उल्लंघन सम्राट आणि न्याय दोहोंच्या दृष्टीत हा अपराध उरेल. अल्लाह केवळ सृष्टीचा रचयिताच नव्हे तर पवित्र कुरआनच्या या कथनानुसार सम्राट, स्वाभिमानी, प्रभुत्वाशाली आणि सुखशांती देणाराही आहे. त्याच्यासाठी हेच उचित आणि स्वाभाविक आहे की एका सम्राटाप्रमाणे आपला प्रतिनिधी आणि विशेष राजदूताद्वारे जनतेसमक्ष प्रजेची उन्नति आणि कल्याणाची योजना व विधी पाठवावी. प्रजेची चिंता, सुख, समृद्धी, कल्याण यापासून विरक्त सम्राट कधीही समर्थ, विवेकशील शासक होऊ शकत नाही. पैगंबर वास्तवमध्ये जगाच्या वास्तविक सम्राटचे दूत आणि संदेशवाहक असतात. लोकांपर्यंत वास्तविक सम्राटचे आदेश पोहचविण्याच्या कार्यावर नियुक्त असतात. ते ही चेतावनीसुद्धा देतात की, ईशआदेशाचे अनुसरण जर केले नाही किंवा अल्लाहच्या प्रसन्नतेची कामना व प्रकोपाची चिंता जर त्यांना नसेल तर त्याचा अत्यंत भयानक परिणाम त्यांच्यासमोर येईल.

ईशआदेश आणि परोक्षाचे ज्ञान आम्हाला ईशपैगंबरांच्या माध्यमातूनच मिळते, जी आमच्या जीवनाची अत्यंत मौलिक गरज आहे. हाच तो मौलिक ईशनियम जो वर कुरआन (३ : १७९) च्या हवाल्याने स्पष्ट केला आहे.

ईशआदेश आमच्या आंतरात्म्याचेच नियम असतात. म्हणूनच पैगंबरांनी प्रस्तुत केलेले ईशआदेश आम्हाला अपरिचित वाटत नाहीत. पैगंबरांची नियुक्ती ही आम्हाला

आमच्या प्रकृतीशी व आंतरात्म्याच्या स्वाभाविक विधी-विधानाचे स्मरण करून देण्यासच होते. उदा. मानव स्वभावतः न्याय, पूजा, समर्पणाच्या रसास्वादाशी परिचित आहे. पैगंबर केवळ आम्हाला या गोष्टीचे स्मरण करवितात की आम्ही आमच्या प्रकृती आणि त्याच्या मधुर अभिरुचिची अवहेलना व कुचेष्टा करू नये. जर आम्ही असे केले तर आम्ही अपराधी ठरणार. आमच्या उन्नतिची दारे आम्ही बंद करायला नको. जे काही त्याला प्राप्त आहे ते भौतिक आवश्यकतेच्या पूर्तीसाठी आहे. पूर्णपणे सुसज्जित शाश्वत जीवन त्याच्या प्रतीक्षेत आहे कारण सध्या तर तो मार्गातच आहे. अल्लाहने आपल्या पैगंबरांद्वारे आपली जबाबदारी पूर्ण केली. उद्या लोक ही तक्रार करू शकणार नाही की, आम्हाला सूचित केले नव्हते. आम्हाला बेपर्वाहीच्या निद्रेतून जागे करण्याचा प्रयत्न केला नाही, अन्यथा आम्ही कधीही अकृतज्ञतेचा मार्ग स्वीकारलाच नसता. आम्ही अपराधी यासाठी बनलो की अल्लाहने आमची खबरदारी घेतली नाही. आम्हाला अज्ञानात भटकण्यासाठी मोकळे सोडले. परंतु अल्लाहने पैगंबर व आपला संदेश पाठवून या सर्व तक्रारींवर पूर्णपणे बांध घातला, आता असे भ्रामक तर्क प्रस्तुत करण्याची संधी मुळीच नाही. कुरआनने घोषित केले,

"हे जिन्न व मानवसमुदाय! काय तुमच्यापाशी स्वतः तुमच्यापैकी असे पैगंबर आले नव्हते जे तुम्हाला माझी संकेतवचने ऐकवीत होते आणि या दिवसाच्या परिणामाचे भय दाखवीत होते." ते म्हणतील, "होय, आम्ही आमच्याविरूद्ध स्वतःच ग्वाही देत आहोत. आज ऐहिक जीवनाने या लोकांना फसविले आहे, परंतु त्यावेळेस ते स्वतः आपल्याविरूद्ध ग्वाही देतील की ते अश्रद्ध होते."

(दिव्य कुरआन, ६ : १३०)

दुसऱ्या जागी कुरआन सांगतो,

"हे सर्व पैगंबर शुभवार्ता देणारे व भय दाखवणारे म्हणून पाठविले होते की त्यांना पाठविल्यानंतर लोकांजवळ अल्लाहच्याविरूद्ध कोणतेही प्रमाण राहू नये. आणि अल्लाह सर्व परिस्थितीत वर्चस्व बाळगणारा व बुद्धिमान व विवेकशील आहे."

(दिव्य कुरआन, ४ : १६५)

# अध्याय ६
# पैगंबरांचा इतिहास

संपूर्ण मानवजात एका माता-पिताची संतान आहे. ते पहिले मानव ज्यांचे आम्ही अपत्य आहोत, ते आदरणीय आदम (अ.) जगातले पहिले पैगंबरसुद्धा आहेत. अल्लाहने त्यांना आदेश दिला की, आपल्या संततीला अल्लाहची आज्ञापालक बनवा, त्या अल्लाहचा जो एकमेव आहे. त्याच्याशिवाय दुसरा कोणी पूजनीय आणि स्वामी नाही. तसेच आपल्या संततीला या गोष्टीची ताकीद करण्यास बजावले की त्यांचे जीवन अल्लाहच्या आदेशानुसार आणि त्याची प्रसन्नता प्राप्त करण्याच्या प्रयासातच व्यतीत करा. त्यांना सांगा की, साहाय्यतेसाठी अल्लाहचीच प्रार्थना करा आणि जगात त्याचे कृतज्ञ बनून जीवनयापन करा. जर तुम्ही असे कराल आणि न्यायावर तटस्थ राहाल तर शाश्वतता तुमच्या स्वागतास तत्पर आहे. मग तुम्हाला सर्वथा रमणीय आणि आनंदमय जीवन प्राप्त होईल. तेथे कोणताही अभाव राहणार नाही. दु:ख आणि क्लेषाचे कोणतेही कारण तेथे नसणार.

आदमची संतती भूतलावर विभिन्न भागांत पसरली. विभिन्न जाती-संप्रदायांचा अविर्भाव झाला. लोक ईशआदेशांना विसरले. विचारात दोष निर्माण झाला. तुच्छ इच्छापूर्तीसाठी नाना प्रकारचे रीती-रिवाज अविष्कृत केले आणि नाना प्रकारचे मतमतांतर आणि धर्म बनले गेले. अज्ञानामुळे अनेकेश्वरत्व, मूर्तीपूजा सोबतच अन्य दुष्कर्म त्याच्या घराची शोभा बनले. अल्लाहने प्रत्येक समुदायात व भूभागात आपले पैगंबर पाठविले की त्यांनी लोकांना त्यांच्या चुकांप्रति सावध करावे आणि त्यांना एकमेव अल्लाहची दास्यता स्वीकारण्यास प्रेरित करावे. त्या अल्लाहच्या आधिपत्यात येण्याचे आमंत्रण द्यावे, ज्याच्या दास्यता व बंदगीची शिकवण आदरणीय आदम (अ.) यांनी दिली होती. जगात भिन्न-भिन्न भागात अल्लाहचे पैगंबर आलेत. या सर्व पैगंबरांची शिकवण मौलिक रूपात एकच होती. ज्या जातीत ज्या प्रकारचे अज्ञान पसरले होते आणि ज्या दुष्कर्माचा जास्त जोर होता त्याला दूर करण्यास विशेष प्रयत्न केले गेले.

पैगंबरांना सत्य धर्म प्रचारार्थ अत्यंत हाल-अपेष्टा सहन कराव्या लागल्या. त्यांच्या समुदायाच्या लोकांनीही त्यांच्याशी चांगला व्यवहार केला नाही. परंतु तरीही ते आपले कर्तव्य सातत्याने पार पाडत राहिले. काही मोठे समुदाय त्यांचे अनुयायी झाले. परंतु जगातून पैगंबरांनी प्रस्थान केल्यानंतर त्यांच्या शिकवणी लोकांनी बदलून

टाकल्या. त्यांनी आणलेल्या ईशग्रंथातही अनुचित परिवर्तन केले. पैगंबरी शिकवणींध्ये अनेक असत्य गोष्टी रचून सामील केल्या. ईशशिकवणीत आपल्या मर्जीने मिथ्या वचने रचून अशी संमिश्र केली की ती असत्य वचने ईशनियमाच्या नावाने लागू होऊ लागली. शेकडो वर्षानंतर त्यांची अवस्था ही झाली की, त्यांच्याकडे कोणताच मापदंड नव्हता अथवा नाही की यामध्ये कोणती शिकवण पैगंबरी व ईश्वरी आहे व कोणती नाही? आता वास्तविक धर्मविधान लुप्त झाले. पैगंबरांच्या जीवनवृत्तांता मध्ये अशा गोष्टी रचून दाखल केल्या की त्यांची प्रामाणिकता संपुष्टात आली. परिणामात त्यांचे सत्य जीवनचरित्र मानवी दृष्टीच्या आड गेले. इतक्या पराकाष्ठेनंतरही त्यात ईशमार्गदर्शनात काहीनाकाही अंश सत्याला प्रतिबिंबित करणारे शिल्लक राहिले जे आजही भिन्नभिन्न समुदायांत दिसून येतात. उदा. ईश्वरांची व मृत्युपश्चात जीवनाची धारणा कुठे स्पष्ट तर कुठे अस्पष्ट दिसून येते.

मानवजातीत निर्माण झालेल्या या मौलिक बिघाडचा वैचारिक आणि व्यावहारिक सुधार घडविण्यास निरंतर पैगंबर येत राहीले. मानव इतिहासात अनेक जाती-संप्रदाय झाले. या सर्वांकडे एक पैगंबर आला तरी त्यांची संख्या लाखोंमध्ये जाते. अंतिम पैगंबर मुहम्मद (स.) यांच्या काही हदीस (पैगंबरकथन) मध्ये असा उल्लेख आहे की जवळपास १ लक्ष २४ हजार पैगंबर या जगात आलेत. कुरआनमध्ये काही प्रमुख पैगंबरांच्या जीवनाचा व कार्याचा अगदी संक्षिप्तपणे आढावा घेण्यात आला व कुरआनमध्ये चर्चित पैगंबरांची नावे अशा प्रकारे आहेत, आदरणीय १) आदम (अ.), २) नूह (अ.), ३) इदरिस (अ.), ४) जुलकिफ्ल (अ.), ५) शुएब (अ.), ६) सालेह (अ.), ७) इब्राहीम (अ.), ८) इसहाक (अ.), ९) इस्माईल (अ.), १०) अय्युब (अ.), ११) इलियास (अ.), १२) अल - यसआ (अ.), १३) दाऊद (अ.), १४) सुलेमान (अ.), १५) जकरिया (अ.), १६) यहया (अ.), १७) लूत (अ.), १८) याकूब (अ.), १९) युसूफ (अ.), २०) युनूस (अ.), २१) मूसा (अ.), २२) हारून (अ.), २३) इसा (अ.) आणि २४) मुहम्मद (स.) या सर्व पैगंबरांवर अल्लाहची दया व कृपा असो.

कुरआनमध्ये ज्या विशेष जाती-समुदायाचा उल्लेख आला आहे ते समुदाय नूह, आद, समूद, तुब्बा, मदयनचे निवासी असहाबुर्रस, अल-ऐकचे निवासी आणि लूत, याशिवाय बनीइस्त्राईल आणि सबा इत्यादि.

कुरआनमध्ये प्रथम संबोधित समुदाय अरब होते. यानंतर यहुदी आणि इसाई. कारण यहुदी व इसाई वस्त्या तेथे वास्तव्य करीत होत्या. म्हणूनच कुरआनने त्याच पैगंबरांचा व समुदायांचा उल्लेख केला जे अरब, यहुदी व इसाई यांना परिचित होते. अपरिचित समुदाय व पैगंबरांचा उल्लेख अनुचितच ठरणार. मग जितके समुदाय व पैगंबरांचा उल्लेख कुरआनमध्ये आला आहे तो आमच्या मार्गदर्शनास आणि शिकवणीस पर्याप्त आहे. अरबचे लोक व्यापारासाठी जेथे जाणे-येणे करायचे तेथेही अरबांना परिचित या वस्त्या राहत होत्या.

आदरणीय आदम (अ.) आणि नूह (अ.) यांच्यामध्ये जे लांब अवधी आहे, यामध्ये जे समुदाय होऊ गेलेत लोक त्यांच्या वृत्तांताविषयी अनभिज्ञ होते. म्हणूच कुरआनने त्यांचा उल्लेख केला नाही. पैगंबरांचा उल्लेख आदरणीय नूह (अ.) पासूनचा आहे.

आम्ही पूर्वीच हे स्पष्ट केले आहे की समुदायांनी सामान्यत:आपल्या पैगंबराचा विरोध केला आणि त्यांच्या शिकवणीपासून लाभान्वित होऊ शकले नाहीत. ज्या जातीसमुदायाने पैगंबरी शिकवणींवर आचरण करून लाभान्वित झाले. तेसुद्धा आपल्या पैगंबरांच्या शिकवणीला तिच्या मूळ स्वरूपात तिच्या प्रामाणिकतेसह सुरक्षित ठेवू शकले नाही. याचा परिणाम हा झाला की त्यांच्यानंतर येणाऱ्या पिढ्यांनी आपल्या मर्जीने पैगंबरी शिकवणींत बरेच परिवर्तन केले. पैगंबरांची सत्य व मूळ शिकवण आणि वृत्तांत इतिहासजमा झाला. काल्पनिक कथानकात ते असे हरवले की त्याच्या शोध व त्याची प्रामाणिकता मनुष्याच्या आवाक्याबाहेरची गोष्ट झाली. याचाच परिणाम लोकांनी ईश्वर अथवा ईशसंतान (पुत्र) अथवा ईशअवतार म्हणून त्यांचीच पूजा, वंदना, भक्ती करण्यास आरंभ केला. लोक आपल्या पथभ्रष्ट धर्मनेत्यांच्या अंधानुकरणात ग्रस्त झाले. आपली समज व बुद्धीचा उपयोग घेण्याऐवजी असत्याला बुद्धीच्या चौकटीत बसविण्यातच व्यस्त झाले. या धर्मनेत्यांनी वैचारिक आणि व्यावहारिक प्रत्येक दृष्टीने लोकांना पथभ्रष्ट केले. सभ्यता, संस्कृती आणि नैतिकतेला विनाशाच्या गर्तेत ढकलले. त्यांनी पैगंबरांचा इन्कार केला तर हे कारण प्रस्तुत करून की, 'काय मनुष्य आमचे मार्गदर्शन करेल?' आश्चर्याची गोष्ट तर ही आहे की हेच लोक आपल्या अज्ञानी धर्मगुरूंना डोक्यावर घेऊन मिरवतात व त्यांचे अप्राकृतिक मार्गदर्शन सहर्ष स्वीकार करतात. कदाचित याचे कारण हेच असू शकते की, त्यांनाही कुमार्ग व दूषित पथच प्रिय असावा. असे लोक त्या मार्गदर्शकांनाच पसंत करतात जे सत्याच्या तेजस्वी प्रकाशापासून लोकांना दूर ठेवतात आणि उच्च चरित्र, विवेक आणि ज्ञानज्योत त्यांच्यापर्यंत पोहचू देत नाहीत.

# पैगंबरांच्या शिकवणींत अंतर नसते

मूळ पैगंबरी शिकवणींत कोणतेही अंतर आढळत नाही. सर्वच पैगंबरांनी मनुष्याला अल्लाहचा दासच म्हटले आहे. अंत: (याकरिता) त्याने अल्लाहच्याच दास्यतामध्ये आपले जीवन व्यतीत करावे. त्याच्या जीवनव्यवहाराचा हेतू (सार) ईशभक्तीशिवाय दुसरे काही नसावा. शेवटी या जगातील जीवनयात्रा संपवून सर्वांना अल्लाह समक्ष आपल्या कर्माचा हिशेब प्रस्तुत करावयाचा आहे. हे जीवन वास्तविक जीवन नाही, वास्तविक जीवन तर या जगातील जीवनानंतर येणाऱ्या परलोकात आमच्या कर्मानुसार आम्हाला प्राप्त होईल. कायमस्वरूपी पारलौकिक जीवन जे सर्वथा रसमय व आनंददायक असेल अथवा सर्वथा कष्ट व यातनाग्रस्त असेल, हे मानवाचे चरित्र आणि कर्मावर निर्भर करते. जी व्यक्ती आपल्या प्रकृतीशी बेसावध राहून या भौतिक जगतात अल्लाहची मर्जी आणि त्याच्या योजनांची उपेक्षा करते अशा विद्रोही व्यक्तीची अल्लाह का बरे पर्वा अथवा काळजी करेल? अशा अपराधी व्यक्तीचे पारलौकिक जीवन दु:खदायी व पीडात्मकच होईल आणि व्हायलाही असेच पाहिजे. या विपरीत ज्या लोकांनी आपले जीवन ईशयोजने अंतर्गत अल्लाहच्या मर्जीनुसार व्यतीत केले, अशा आज्ञाकारी सेवकाने ईशप्रसन्नतेला प्राधान्य देऊन जीवनरूपी पुष्पाचा सुगंध जाणला आणि ईशप्रेमात गतीशील राहणे आपली प्रतिष्ठा समजली. या लोकांसाठी ईश प्रेमच ते प्रेरक शस्त्र होते ज्याच्या बळावर ते जीवनात सत्यमार्गावर चालण्यात यशस्वी झाले.

सर्व पैगंबरांनी हीच शिकवण दिली की, लोकांना ईशअधिकारासोबत त्याच्या दासांचे अधिकार जे त्याच्यावर आहेत, ते ओळखावे आणि कुणावरही अन्याय होता कामा नये. सतत प्रयत्नशील राहावे की त्याचा व्यवहार लोकांसोबत अत्यंत मधुर, न्यायिक,त्याग व उत्सर्गावर आधारित राहील. स्वत:पेक्षा दुसऱ्यांच्या आवश्यकतेला प्राधान्य द्यावे. गरीब व असहाय लोकांची मदत करावी.

पवित्र कुरआन परलोकाचे वर्णन रेखांकित करतो की त्या दिवशी परलोकात यशस्वी लोक स्वर्गात स्थान प्राप्त करतील. ते नरकवासी लोकांना विचारतील की "तुम्ही नरकात कसे काय?"

"ते म्हणतील, "आम्ही नमाज अदा करणाऱ्यांपैकी नव्हतो आणि गरिबांना जेवू

घालत नव्हतो, आणि सत्याविरूद्ध गोष्टी रचणाऱ्यांविरूद्ध आम्हीही गोष्टी बनविण्यात लागत होतो. आणि मोबदल्याच्या दिवसाला खोटे ठरवीत होतो, येथपावेतो की त्या निश्चित गोष्टीशी आमचा प्रसंग घडला.'' (दिव्य कुरआन, ७४ : ४३-४७)

पैगंबरांनी न्यायालाच नेहमी प्राथमिकता दिली. ते व्यक्तीगत आणि सामाजिक जीवनातील प्रत्येक दुष्कृत्यापासून अलिप्त राहण्यास आणि सत्कर्म करण्यास प्रेरित करीत असत. त्यांनी सांगितले की ''तुमचे प्रत्येक कार्य अल्लाहसाठीच असावे आणि त्याचीच प्रसन्नताप्राप्तीचा हेतू त्यामागे असावा. लोक दर्शन आणि भौतिक जीवनात प्रसिद्धी, प्रशंसा यांची आकांक्षा सत्कर्माची प्रेरक नसावेत.''

## मोजिजा

प्राकृतिक नियमापासून भिन्न दिसणारे असे कार्य जे करण्यात मनुष्य असमर्थ असतो, त्यांना 'मोजिजा' अर्थात चमत्कार म्हणतात. पवित्र कुरआनमध्ये यासाठी जो शब्द प्रयुक्त झाला आहे, तो 'आयत' किंवा आयात आहे. 'आयत' या शब्दाचा अर्थ होतो - चिन्ह, निशाणी, प्रमाण, आदेश. कुरआन सांगतो,

''पृथ्वी आणि आकाशांत कित्येक संकेत आहेत ज्यावरून हे जात असतात आणि थोडेदेखील लक्ष देत नाहीत.'' (दिव्य कुरआन, १२ : १०५)

चिन्ह अथवा निशाणी (आयत) कोणत्याही स्वरूपात असो बुद्धी आणि अंतर्मन दोघांना जागृत करण्याची क्षमता बाळगते. जगात पसरलेल्या अपार निशाण्या ईशगुण जसे, दयाळुता, तत्त्वदर्शिता, महानता, उच्चता, न्याय आणि प्रतिदान (मोबदला) इत्यादींच्या द्योतक आहेत. याचप्रमाणे ईशवाणीच्या रूपात ज्या आयाती आम्ही ऐकतो किंवा पठण करतो त्यासुद्धा ईशगुणांना प्रमाणित करतात. त्यांचे प्रमाणीकरण सविस्तर आणि अत्यंत सुस्पष्ट रूपात होते. पवित्र कुरआनच्या आयतींच्या अवतरणपश्चात जगात पसरलेल्या आयातींना (चिन्हे) जणूकाही भाषा प्राप्त झाली, कुरआनच्या माध्यमाने जणूकाही त्यांचे मौनव्रत तोडले, त्यांना वाच्यता प्राप्त झाली.

पवित्र कुरआनमध्ये अवतरित आयातला 'रहमत' (दयाळुता), 'रिज्के हसन' (उत्तम उपजीविका), ची संज्ञा देण्यात आली. त्यांना 'जिक्र' (अनुस्मारक आणि बोध) तसेच 'नूर' (प्रकाश) म्हटले आहे, आणि सुस्पष्ट सांगितले की यापासून बुद्धीमान व

विचारशील लोकच लाभान्वित होऊ शकतात. वास्तविकता ही आहे की पवित्र कुरआन आम्हाला आमंत्रित करतो की आम्ही इमान (श्रद्धा) आणून सत्कर्म करावे. त्याचे हे आमंत्रण केवळ अंधविश्वास म्हणून नव्हे तर बुद्धी, विवेक आणि बोध यांच्या कसोटीवर असते. सामान्यतया लोकांना ज्या प्रकृतीचा विसर पडला तिलाच जागृत करतो. पवित्र कुरआनचा हाच तो पैलू अथवा दृष्टिकोन आहे, ज्यामुळे त्याला चेतावणी आणि स्मरण करविणे म्हणतात. यासाठीच तर पवित्र कुरआनने स्वत:ला 'जिक्र' आणि 'तब्सिरा' (स्मरण आणि भ्रम दूर करून शुद्धीवर आणणे) ची संज्ञा देण्यात आली आहे. पवित्र कुरआनच्या आयातीने केवळ ज्ञानालाच नव्हे तर विचारांनाही सुदृढता (स्थिरता, बळकटी) प्राप्त होते. विचाराची स्थिरता सर्व शंकांचे निरसन करते. पवित्र कुरआन जर स्वत:ला 'हुदा', 'तिबयान', 'हक', 'बुरहान', 'बसाइर', 'नूर', 'शिफा' इत्यादी नावांनी संबोधित करतो तर यामध्ये काहीही अतिशयोक्ती नाही.

पैगंबरी शिकवणींने ही गोष्ट अगदी स्पष्ट होते की, आश्चर्यचकित करणारे चमत्कार आणि अप्राकृतिक कृतीला फारसे महत्त्व नाही. ते लोकांना केवळ चमत्कार, मोजिजा (दिव्य चमत्कार) विचित्र प्रसंग यामध्येच रस घेणारे अथवा यांचेच प्रेमी बनवित नाही. या विपरीत पवित्र कुरआन आणि पैगंबर यांच्या शिकवणींच्या अध्ययनाने ही गोष्ट नि:संशय स्पष्ट होते की धर्मामध्ये ज्या गोष्टीला महत्त्व आहे ती केवळ 'सत्य' आहे. मनुष्याला सत्याचे ज्ञान अशा प्रकारे व्हावे की त्याच्या जीवनाची बहुमूल्य आणि आकर्षक वस्तू म्हणजे 'सत्य' असावे. मानवाने सर्व प्रकारच्या भ्रम, अचेतनता, मूर्खता आणि अंधविश्वासातून मुक्त व्हावे. जीवनाचे वास्तविक रहस्य आणि हेतू (आशय) यांच्या ज्ञानमय प्रकाशात जीवन व्यतीत करण्यास प्रेरित होऊन जावे. त्याच्या मनात मलीनता, संदेह, द्विधा यांना कोणतेही स्थान नसावे. नैतिक आणि चारित्र्यिक शक्तीच्या प्रभावाने त्याचे जीवन दुसऱ्यासाठी एक आदर्श जीवन बनावे. ही ती उपलब्धी आहे की, कोणताही चमत्कार याच्या तुलनेत मौल्यवान होऊ शकत नाही.

लोकांना चमत्कार अथवा मोजिजा दाखविणे हे पैगंबरांचे कार्य नव्हे. पैगंबरांच्या पुष्टीसाठी की ते अल्लाहचे पैगंबर आहेत, अल्लाहला वाटले तर 'मोजिजा' (दिव्य चमत्कार) दाखवून देतो. अर्थातच तो अल्लाहकडून व अल्लाहच्याच मर्जीवर अवलंबून आहे. जसे फिरऔन (त्या वेळेचा बादशहा)च्या

समक्ष अल्लाहने पैगंबर आदरणीय मूसा (अ.) यांच्या पुष्टीसाठी दोन मोजिजे (चमत्कार) दाखविले. एक हा की अल्लाहच्या आज्ञेने जेव्हा आदरणीय मूसा (अ.) यांनी आपल्या हातातील काठी फेकली तेव्हा ती एक जिवंत अजगरच्या रूपात परिवर्तीत झाली. दुसरे असे की आदरणीय मूसा (अ.) यांनी ईशआज्ञेने आपला हात आपल्या गळपट्टीत घातला आणि जेव्हा बाहेर काढला तेव्हा कोणत्याही कष्टाशिवाय तो चमकतच बाहेर आला. या ईशचमत्कारांना फिरऔनने (जो स्वत: प्रजेचा ईश्वर बनून होता) जादू समजण्याची मोठी चूक केली. त्याने या जादूच्या प्रतिकारास आपल्या राज्यातील सर्व जादूगारांना पाचारण केले. परंतु जेव्हा या जादूगारांनी आदरणीय मूसा (अ.) यांच्या प्रस्तुत केलेल्या मोजिजाला बघितले तेव्हा घोषणाकरते झाले की, निश्चितपणे ही जादू नाही. आदरणीय मूसा (अ.) या पैगंबरांद्वारे प्रस्तुत केलेला चमत्कार संकेत देत होता की अल्लाहचे पैगंबर जेव्हा जनसामान्यांसमक्ष अल्लाहचा संदेशवाहक म्हणून कर्तव्य पार पाडत असतात, तेव्हा अल्लाहची शक्ती आणि समर्थन त्यांच्यासोबत असते. हा संकेत एका जिवंत अजगरामार्फत मिळतो. चमकणाऱ्या हाताचा चमत्कार दर्शवितो की पैगंबर असा प्रकाश घेऊन येतात की त्या प्रकाशात मानवी जीवनाला त्याचा वास्तविक मार्ग प्राप्त होतो. हा तो मार्ग आहे जो अज्ञानरूपी अंधकारापासून पूर्णपणे सुरक्षित, परंतु अगदी सरळ आणि मानवप्रकृतीच्या अगदी अनुकूल असतो. या मार्गाद्वारे मनुष्याला इतकी मोहक जीवनशैली प्राप्त होते की त्यापेक्षा जास्त सरसची कल्पनाही करवत नाही.

आम्ही हे स्पष्ट केलेच आहे की, 'मोजिजा' प्रस्तुत करणे हे पैगंबरांचे नव्हे तर अल्लाहचे काम आहे. असे हे मोजिजे केवळ पैगंबरांसाठीच असतात. मोजिजा (दिव्य चमत्कार) मागणाऱ्या लोकांनी मोजिजा बघून इमान धारण करावे यासाठी त्यांचे प्रकटीकरण होत नसते तर अल्लाह आपल्या निशाण्या कर्तव्य पूर्ण करण्यास प्रस्तुत करत असतो. म्हणजे उद्या हिशेबाच्या वेळेस कोणी हे सांगू नये की आम्हाला, मोजिजाच्या रूपात एखादी निशाणी दाखविली असती तर आम्ही अवश्य इमान धारण केले असते. अल्लाह कोणत्याही जाती संप्रदायाला त्याच्या हठधर्मी प्रवृत्ती आणि विद्रोही आचरणाव्यतिरिक्त कोणत्याही कारणास्तव पूर्णपणे नष्ट करीत नाही. मग यापेक्षा जास्त हठधर्मी काय होईल की त्याच्या मागणीनुसार त्याला मोजिजा

(दिव्य चमत्कार) दाखविल्यानंतर तो सत्याचा विरोध आणि शत्रुत्वापासून परावृत्त झाला नाही. अल्लाहचा हा नियम आहे की मोजिजा बघितल्यानंतर एक तर त्या लोकसमुहाने इमान स्वीकारून सत्कर्माकडे वळावे अन्यथा अल्लाहच्या प्रकोपास व यातनेस तयार राहावे. पवित्र कुरआनने स्पष्ट केले,

"ते म्हणतात की या पैगंबरावर एखादा दूत का अवतरला गेला नाही? जर आम्ही एखादा दूत अवतरला असता तर आतापावेतो केव्हाच निर्णय झाला असता, मग यांना कोणतीच सवलत दिली गेली नसती." (दिव्य कुरआन, ६ : ८)

पैगंबर स्वत: कोणताही मोजिजा (दिव्य चमत्कार) दाखवू शकत नाहीत. त्यांचे कर्तव्य केवळ हे आहे की लोकांपर्यंत ईशसंदेश पोहचवून द्यावा. पवित्र कुरआन सांगतो,

"त्यांच्या पैगंबरांनी सांगितले, "काय अल्लाहच्या बाबतीत शंका आहे जो आकाशांचा व पृथ्वीचा निर्माता आहे? तो तुम्हाला आवाहन करीत आहे की तुमचे अपराध माफ करावेत व तुम्हाला एका निश्चित कालावधीपर्यंत मोकळीक द्यावी." त्यांनी उत्तर दिले, "तुम्ही आमच्या सारखेच माणसं आहात; त्यापेक्षा वेगळे काही नाही तुम्ही आम्हाला त्या विभूतीच्या भक्तीपासून रोखू इच्छिता ज्यांची भक्ती पूर्वजांपासून होत आली आहे. बरे, तर आणा एखादे सुस्पष्ट प्रमाण." त्यांच्या पैगंबरांनी त्यांना सांगितले, "खरोखरच आम्ही काहीच नाही परंतु तुमच्याचसारखे मानव. परंतु अल्लाह आपल्या दासांपैकी ज्याला इच्छितो त्याला उपकृत करतो, आणि हे आमच्या अखत्यारीत नाही की तुम्हाला एखादे प्रमाण आणून द्यावे. प्रमाण तर अल्लाहच्याच आज्ञेने येऊ शकते आणि अल्लाहवरच इमानधारकांनी विश्वास ठेवला पाहिजे."

(दिव्य कुरआन, १४ : १०-११)

पवित्र कुरआनच्या या आयतीनी सुद्धा स्पष्ट होते की, 'मोजिजा' (दिव्य चमत्कार) दाखविणे पैगंबरांचे कार्य नाही. अल्लाह जेव्हा इच्छितो आपल्या पैगंबरच्या पुष्टीसाठी 'मोजिजा' दाखवितो. पैगंबरांनी मोजिजा दाखविण्यात कधीही रस घेतला नाही. त्यांचा संदेश तर लोकांनी एकेश्वरत्व स्वीकारावे हाच होता. अर्थात केवळ एकमेव दास्यता आणि स्वत:ला त्याच्या अधीन करावे (म्हणजे पूर्णपणे समर्पित करावे) आणि निर्णयाच्या दिवसावर दृढ श्रद्धा बाळगावी की पारलौकिक जीवनात आपल्या कर्मानुसार अल्लाह निर्णय करेल की कोण कायमस्वरूपी राहणाऱ्या स्वर्गाचा

अधिकारी आहे व कोण कायमस्वरूपी नरकात प्रवेशास पात्र ठरतो. मोजिजा बघितल्यानंतर हा जो समुदाय पैगंबरांवर विश्वास बाळगत नाही, निश्चितच तो स्पष्ट विद्रोहाच्या चरमसीमेवर पोहचला आणि स्वत:च्या विनाशाला स्वत:च आमंत्रित करत आहे. स्पष्ट निशाणी आणि मोजिजा प्रगट झाल्यानंतर त्या समुदायाची विचार करण्याची, समजण्याची संधी समाप्त होते. म्हणूनच अशा निर्णायक मोजिजासाठी एक निश्चित वेळ असते. इतिहासचे अध्ययन हे सांगते की मोजिजा बघण्याआधी ज्या लोकांनी इमान स्वीकारले नाही त्यांनी मोजिजा बघितल्यावरही इमान स्वीकारण्याच्या घटना नगण्यच! ज्या प्रकारे प्रलयानंतरच्या हिशोबाच्या दिवसाला अल्लाहने परोक्षात लपवून ठेवले आहे, त्याचप्रमाणे मोजिजाला अल्लाह लपवून ठेवतो येथपर्यंत की त्याच्या प्रकटीकरणाच्या वेळेचे ज्ञान पैगंबरालाही नसते. पवित्र कुरआनचे स्पष्टीकरण आहे,

"आणि हे जे ते सांगत आहेत की या पैगंबरावर याच्या पालनकर्त्याकडून एखादी निशाणी का अवतरली गेली नाही. तर यांना सांगा, "परोक्षचा स्वामी व मुखत्यार तर अल्लाहच आहे, बरे तर प्रतीक्षा करा, मी देखील तुमच्याबरोबर प्रतीक्षा करीत राहतो." (दिव्य कुरआन, १० : २०)

जिवंत आणि सदैव बाकी राहणारा 'मोजिजा' तर ज्ञानात्मकच होऊ शकतो. तो मोजिजा पवित्र कुरआनच्या रूपात आजही जिवंत आहे. जग कोणत्याही पैलूने पवित्र कुरआनसारखी वाणी प्रस्तुत करण्यात असमर्थ आहे आणि नेहमी असमर्थच राहील. पवित्र कुरआनची वाणी अत्यंत प्रभावशाली आहे. त्या वाणीत आत्मा जागृत करण्याची, हृदयाच्या तारांना छेडण्याची तसेच आमची मूर्छा भंग करण्याची अद्वितीय शक्ती आहे. मार्गदर्शनाच्या दृष्टीनेही कोणतेही पुस्तक त्याच्याशी तुलना करण्यायोग्य नाही. मोठ-मोठे विचारक आणि साहित्यकार पवित्र कुरआनचे शब्द आणि अर्थासंबंधी विशेषता व सौंदर्याच्या अध्ययनात गर्क झाले, परंतु ते पवित्र कुरआनची विशेषता आणि त्याच्या साहित्यिक रचनेच्या भावांना व्यक्त करण्यात असमर्थ राहिले. पवित्र कुरआन जे निमंत्रण देतो ते लोकांच्या बुद्धी, विवेक आणि सुक्ष्मदर्शिता व सौंदर्यबोधाशीही अपील करतो. मोजिजाचा विषय गौण आहे. कुरआनची इच्छा आहे की लोकांची मूर्च्छा भंग होऊन समता व विवेक यांनाच त्यांनी आपला आदर्श बनवावे. चमत्कार आणि मोजिजाच्या प्रतिक्षेत आपल्या मानसिकतेला पतनाकडे नेऊ नये.

# अवतारवाद एक समीक्षा

रसूल अथवा पैगंबरची धारणा यहुदी (ज्यू) आणि इसाई (ख्रिस्ती) या दोहोंमध्ये आढळून येते. बनीइस्राईल (इस्राईलची संतती) संप्रदायात अनेक पैगंबर झालेत. भारतीय धर्मामध्ये पैगंबरत्वाची धारणा 'अवतारवादा'च्या नावाने प्रचलित आहे. सामान्यत: 'अवतारवाद'चा प्रचलित अर्थ हा आहे की जेव्हा जेव्हा धर्माला ग्लानि पोहचते किंवा दुष्ट व अत्याचारी लोकांना नष्ट करणे आवश्यक होते; तेव्हा ईश्वर स्वत: कोणातरी रूपात जन्म घेतो किंवा प्रकट होतो. परंतु विचारांती हे सुस्पष्ट होते की 'अवतारवाद' या शब्दाचा हा विकृत व चुकीचा अर्थ प्रचलित झाला. हा त्याचा वास्तविक अर्थ नव्हे. अवतार हा शब्द स्वत: दर्शवितो की याचा अर्थ ईश्वराचे स्वत: जमिनीवर उतरणे नसून ईश्वराद्वारे उतरविणे किंवा पाठविणे असा होतो. अवतार शब्दाच्या विश्लेषणाने स्पष्ट आहे की अवतार शब्द 'अव' या उपसर्ग 'तृ' या धातूने 'धत्र' प्रत्ययाच्या योगाने बनला आहे. अंत: अवतार शब्दाचा अर्थ होतो, 'उतरविणे' पाणीनिने या शब्दाच्या व्याख्या करीत लिहले की, 'अवतरणं अवतार' अर्थात खाली (जमिनीवर) उतरविला गेला. डॉ. वेद प्रकाश उपाध्याय यांनी आपली शोधपुस्तिका 'कल्कि अवतार' मध्ये अवतारवादाच्या प्रचलित अर्थाचा विरोध केला. ते लिहतात, "अवतारवाद या शब्दापासून अभिप्रेत हेच आहे की ईश्वर आपले दूत किंवा पैगंबर लोकांच्या मार्गदर्शनासाठी पाठवितो आणि या पैगंबरी शृंखलेची अंतिम कडी पैगंबर मुहम्मद (स.) हेच आहेत."

ईश्वराचे गुणधर्म जसे सर्वव्यापक, सर्वशक्तिमान, अद्वितीय, सर्वाधार, कर्ता, नियंत्रक, अगोचर इत्यादी! यांना बघता हे स्वीकार करावे की ईश्वर मनुष्य किंवा सिंह इत्यादी रूपात अवतार घेतो निव्वळ हास्यास्पद आहे. ईश्वर जर शरीर विशेषाने अवतार धारण करेल तर याचा अर्थ हाच होईल की तो सर्वव्यापी नाही आणि अमर्यादित असूनही मर्यादित झाला. मग इतकेच नव्हे तर देशवर्ती असल्यामुळे त्याला सर्वज्ञही म्हणता येणार नाही. तर मग त्याला स्वयंभू (अजन्मा) कसे म्हणणार! एक विचित्र गोष्ट आहे की, रामचंद्रजी आणि परशुरामजी हे दोन्ही एकाच काळाचे अवतार मानले जातात. इतकेच नव्हे तर दोघांमध्ये द्वंद युद्ध होण्याची संभावनाही निर्माण झाली होती. काय याचा अर्थ हा नाही का होणार की दोघांपैकी कोणालाही हे अवगत नव्हते

की ज्याच्याशी युद्ध अपेक्षित आहे तोही परमात्मा आहे. अंत: प्रचलित अवतारवाद बुद्धीसंगत आणि धर्मसंगत होऊच शकत नाही. ही गोष्ट तर ईशमहानतेच्या अगदी प्रतिकूल आहे की त्याला पूर्णावतारच नव्हे तर अंशावतारही स्वीकार करावे. ईशसत्तेला खंडित करण्याला दु:साहसच (बहादुरी) म्हणावे लागेल!

तात्पर्य हेच की ज्या प्रकारे भारतवर्षात देवदूतांच्या धारणेत बिघाड आला आणि त्याने देवीदेवतांच्या रूपात प्रसिद्धी प्राप्त केली; त्याचप्रमाणे पैगंबर आणि ईशदूतांच्या धारणेचे विकृतीकरण म्हणजे प्रचलित अवतारवादची कल्पना होय. ईश्वर मनुष्य किंवा इतर रूपात स्वत: प्रकट होतो ही धारणा प्रस्तुत करताना व तिला स्वीकार करत असताना या मूळ मौलिक गोष्टीकडे पूर्णपणे दुर्लक्ष करण्यात आले की या कल्पनेने ईश्वराप्रति विचारात विकृती व अशुद्धता निर्माण होईल.

औतार (अवतार) या शब्दाच्या विद्वानांनी पैगंबरच्या अर्थात प्रयोग केला आहे. उदाहरणार्थ, महमुद गजनवीच्या सिक्क्यावर इस्लामचा मौलिक कलिमा (सूक्त) "ला इलाहा इल्लल्लाह, मुहम्मदुर्रसूलुल्लाह" (स.) (अल्लाहच्या अतिरिक्त कुणीही पूजनीय नाही, मुहम्मद (स.) अल्लाहचे पैगंबर आहेत.) चा संस्कृत अनुवाद याप्रमाणे अंकित आहे, "अव्यक्त एकम, मुहम्मद औतारम" या अनुवादात अल्लाहसाठी अव्यक्त शब्द आला आहे तर रसूल किंवा पैगंबरासाठी पारिभाषिक शब्द 'औतार'चा उपयोग करण्यात आला आहे. अल्लाहसाठी प्रयुक्त झालेला शब्द अव्यक्त अत्यंत सार्थक आहे. कारण अल्लाहचा एक अर्थ हा होतो की ती सत्ता जी अत्यंत रहस्यमय आहे आणि जी सत्ता रहस्यमय असेल ती अव्यक्तच राहील. कोणत्याही नबी किंवा रसूलसाठी आम्ही जो शब्दप्रयोग करतो, जसे संदेशवाहक, दूत इत्यादी कदाचित हे शब्द एका 'नबी'च्या दर्जाला व्यक्त करण्यात कमी पडतात असे वाटते म्हणूनच विद्वानांनी नबी-रसूल यांना 'अवतारी' पुरुषाची संज्ञा देऊन 'नबी' शब्दाचा वास्तविक भाव व्यक्त करण्याचा सफल प्रयत्न केला.

'वेदां'मध्ये परलोक आणि स्वर्ग व नरक इत्यादीविषयी धारणा स्पष्टपणे दिसून येते, जी पवित्र कुरआनच्या शिकवणींशी साम्यता दर्शविते. संस्कृतचे विद्वान दुर्गाशंकर सत्यार्थी यांनी हे सिद्ध करण्याचा प्रयत्न केला आहे की वेदात रिसालत किंवा पैगंबरत्वाची धारणा विद्यमान आहे. यासंबंधी त्यांनी जे शोधकार्य केले व या संर्दभात जे वेदांचे श्लोक प्रस्तुत केले ते वाचकांच्या सोयीसाठी येथे देत आहोत.

"अग्नि दूत वृणीमहे होतारम् विश्ववेदसम्" (ऋग्वेद १/४/१२/१)

अर्थात-"आम्ही अग्नीला दूत नियुक्त करतो, विश्वाची वेदना हवन करणाऱ्याला."

सत्यार्थीजी लिहतात, वेदांच्या अनेक श्लोकांनी 'रिसालतची' पुष्टी होते, उदाहरणार्थ,

"ताँ लशतो वि बोधय यदग्ने यासि दूत्यम।। (ऋग्वेद १/१२/४)

त्वामिदस्या उषसो व्युष्टिषु दूतं। (ऋग्वेद १०/१२२/७)

त्वं दूत: प्रथमोवरेण्य:। (ऋग्वेद १०/१/२२/४)

शश्वत्तम मिळते दूत्याय। (ऋग्वेद १०/७०/३)

या श्लोकांना उदधृत (प्रस्तुत) करून सत्यार्थीजी लिहतात -

'या प्रकारचे अनेक श्लोक आहेत. वेदांमध्ये 'दूत' शब्द अत्यंत सामान्य आहे. पुष्कळशा जागी आला आहे.'

वेदांमध्ये अशा प्रकारच्या श्लोकांत 'दूत' या शब्दाशी अभिप्रेत पैगंबर आहे किंवा नाही, परंतु हे सत्य आहे की अल्लाहचे पैगंबर (ईशदूत) विभिन्न देशांत आणि काळांत (युगांत) आलेत आणि यांनी सत्यसंदेश लोकांपर्यंत पोहचवला. पैगंबरी शृंखलेची अंतिम कडी पैगंबर मुहम्मद (स.) आहेत. आपले आगमन संपूर्ण जगासाठी पैगंबर म्हणून झाले आहे. पवित्र कुरआन ने याची घोषणा केली की,

"(लोकहो!) मुहम्मद (स.) तुमच्या पुरुषांपैकी कोणाचे पिता नाहीत परंतु ते अल्लाहचे पैगंबर आणि अंतिम पैगंबर आहेत, आणि अल्लाह प्रत्येक वस्तूचे ज्ञान राखणारा आहे." (दिव्य कुरआन, ३३ : ४०)

# अध्याय ७

# तो चारित्र्यवान नायक (पैगंबर मुहम्मद (स.))

## जगत आणि जीवन

अल्लाहचे अंतिम पैगंबर मुहम्मद (स.) यांचे व्यक्तीत्व आणि कार्याच्या सर्वेक्षणापूर्वी आपण पुन्हा एकदा हे जग आणि जीवन यावर विहंगम दृष्टिपात करू या. विज्ञान या सृष्टीची चालत असलेली सुरळीत कार्यप्रणाली व त्यात कोणते प्राकृतिक नियम काम करतात यावर प्रकाश टाकण्याचा प्रयास करतो. विज्ञान या जमिनीवरील वस्तूंचा उपयोग आणि मानवशरीराला निरोगी व स्वस्थ ठेवण्यास मार्गदर्शन करतो. रोगांचा उपचार कसा करावा, वायुमंडळाला दूषित होण्यापासून कशा प्रकारे वाचविता येईल. आपल्या शत्रूंना परास्त करण्यासाठी अस्त्र-शस्त्र यांचा शोध कसा लावला जातो? दूरच्या लोकांपर्यंत लवकरात लवकर सूचना कशी पाठविता येईल? लांब अंतरावर अतिशय जलद गतीने कसे पोहचता येईल? या समस्येच्या निवारणार्थ त्याने टेलिग्राफ, फॅक्स, इंटरनेटचा शोध लावला. विमान आणि भिन्न भिन्न प्रकारची शस्त्रे येथपर्यंत की अणुबॉम्ब, हायड्रोजन बॉम्बपर्यंत त्याने मजल मारली.

या नेत्रदीपक वैज्ञानिक प्रगतीनंतरही हे जीवन आणि जग याचा वास्तविक उद्देश काय आहे हे सांगण्यात तो असफल आहे. मनुष्य या भूतलावर का बरे जन्माला आला? त्याच्या या जीवनयात्रेचा अंतिम पडाव कोणता व कुठे आहे? काय मानवाची नियती (दैव) क़ेवळ मृत्यू आहे? जीवनाचे ते वास्तविक लक्ष्य कोणते आहे की ज्याला प्राप्त करण्याच्या प्रयासाला त्याचे परम कर्तव्य म्हणता येईल? मानवजीवन आणि जग याकडे मनुष्याने कोणत्या दृष्टीने बघावे? काय भौतिक दृष्टिकोनाशिवाय दुसरा दृष्टिकोनही संभव आहे? या मौलिक प्रश्नांची उत्तरे देण्यात विज्ञान असफल आहे, कारण हे त्याच्या परिघी (घेरा) च्या बाहेर आहे. या अतिमहत्त्वपूर्ण प्रश्नांची अचूक उत्तरे प्राप्त करण्याची आशा केवळ धर्माशीच केली जाऊ शकते. परंतु जेव्हा आम्ही धर्माकडे वळतो तेव्हा निराशा पदरी पडते, कारण येथे या प्रश्नांचे निरसन करण्याऐवजी मनुष्य अवांतर गोष्टीत अडकलेला दिसतो. यामुळे समस्या सुटण्याऐवजी जास्त बिकट झाली. वास्तविक धर्म केवळ एक असायला हवा परंतु तो भिन्न भिन्न संप्रदायांत विभक्त झाला. वास्तविकता तर ही आहे की अनेक धर्मांची उपस्थिती स्वत: एक अधर्म आहे. कारण मौलिक आणि

मूलभूत प्रश्नांची अचूक उत्तरे अनेक होऊच शकत नाहीत. योग्य उत्तर तर केवळ एकच असणार! आणि हे उत्तर मानवी प्रतिष्ठेच्या अनुकूल, न्याय आणि सत्यावर आधारित असेल. ते सर्वांसाठी स्वीकार्य असावे. मानवप्रकृती मुळात एक आहे, मानवतेचे प्रश्न समान आहेत. मग विचार करा बरे, उत्तरे अनेक कशी असणार?

अल्लाहने आमच्या जीवनास आवश्यक सर्व साहित्य-सामग्री गोळा केली. भूतलावर मनुष्य केवळ जिवंतच नव्हे तर सुख-समृद्धीने राहू शकेल यासाठी किती चोख व व्यापक व्यवस्था केली. आकाशातून पाण्याचा वर्षाव जमिनीवर होतो आणि मग ती आपल्या पोटातून आमच्या पोटासाठी धान्य उगवते. रात्रीच्या काळोखाला सूर्याची किरणे दूर करतात आणि त्याच्याच उष्णतेने पिके तयार होतात. पृथ्वीची आकर्षणशक्ती आम्हाला जमिनीवर स्थिरता प्रदान करते. रात्र आमच्या विश्रामासाठी तर दिवस काम करण्यास पृथ्वीच्या अगदी योग्य व समतोल गतीशीलतेने बनत असतात. तात्पर्य, या व्यापक आणि योग्य सुव्यवस्थेमुळेच आमचे भुतलवार जीवन संभव झाले. आता प्रश्न हा आहे की ज्या अल्लाहने आम्हाला जीवित राहण्यास इतका सुनियोजित व सुव्यवस्थित बंदोबस्त केला, काय तो आम्हाला हे न सांगताच सोडून देईल की, हे सर्व कशासाठी? आम्हाला जीवन कोणत्या उद्देशपूर्तीसाठी प्रदान केले? या जीवनात आमची भूमिका व कर्तव्य कोणते? आमच्या जीवनाची संभावना कोणती? जीवित राहण्यापेक्षा जास्त महत्त्व जीवनलक्ष्य (उद्देश) चे असते. (कारण हेतूरहित जीवन पशुजीवनासमान होय.) मग अल्लाह या संबंधात आमच्या मार्गदर्शनाची व्यवस्था का बरे नाही करणार?

## ईशमार्गदर्शन

जर या भूतलावर मनुष्याची उपस्थिती एवढी रहस्यमय (सहज लक्षात न येणारी) घटना घडणे संभव हाऊ शकते तर मग आम्ही या गोष्टीच्या संभावनेला कसे नाकारू शकतो की, अल्लाह अगदी प्रारंभापासून आमचे मार्गदर्शन करत आला आहे. या मार्गदर्शनासाठीच मानवनिर्मितीच्या प्रारंभापासून अल्लाह आपले संदेशवाहक (पैगंबर) पाठवित राहिला. या जगात असंख्य पैगंबर आलेत आणि आपापल्या काळात त्यांनी मनुष्याचे मार्गदर्शन केले. पैगंबरांद्वारे हे मार्गदर्शन मनुष्याला चेतनास्तरावर करण्यात आले. या कार्याच्या पूर्तीसाठी अल्लाहने मानवाच्या भाषेत ईशवाणी आणि ईशग्रंथाच्या अवतरणाची नियोजनबद्ध योजना राबविली.

## पैगंबर मुहम्मद (स.) पूर्वीचे जग

पैगंबरांच्या आगमनाच्या माळेतील अगदी शेवटचे पुष्प म्हणजे पैगंबर मुहम्मद (स.) होय. या पुष्पाने गुंफल्यावर ही माळ आपल्या पूर्णत्वाला पोहचली. पैगंबरांचे आगमन अशा काळात (युगात) झाले, जेव्हा धर्म एक कोडे बनले होते. नाना प्रकारच्या कर्मकांडाच्या प्रचलनाने धर्म विकृत झाला होता. खरा ईशधर्म लुप्त पावला होता. परस्परविरोधी गोष्टीव्यतिरिक्त धर्म एक खेळ-तमाशाची वस्तू बनून राहिली होती. नाना प्रकारच्या कुप्रथा, रीती-रिवाजांनी थैमान घातले होते. यापैकी काहींनी तर ईशअस्तित्व आणि आत्म्यालाच नाकारले. काही लोकांच्या वैचारिक दृष्टिकोनाने धार्मिक आणि आध्यात्मिक वर्चस्व केवळ उच्च कुळात जन्मलेल्या लोकांच्या स्वाधीन झाले. काही लोकांनी प्राकृतिक एकेश्वरत्वाप्रति वाद घातला. परिणामातः पूजा, उपासना, भक्ती एकमेव अल्लाहव्यतिरिक्त असंख्य काल्पनिक देवी-देवतांची होऊ लागली. बहुदेववादाच्या या काल्पनिक विचारांनी समाजात आपली मुळे इतकी खोलवर रोवली की, खऱ्या निर्मिक अल्लाहचे अधिकार आणि हक्क काय आहेत व त्या बाबतीत आमचे नैतिक कर्तव्य काय आहे, याला आमच्या स्मृती पटलावर सुप्त केले. परिणामातः मानव विभाजीत झाला आणि मनुष्य मनुष्यामध्ये भेदभावाच्या भिंती उभ्या झाल्या होत्या. धर्मात पुरोहितवाद बोकाळला आणि एक वर्ग विशेष धर्माचा कार्यकारी संचालक किंवा ठेकेदार बनला आणि ही धारणा झाली होती की पुरोहिताच्या मध्यस्थीशिवाय ईशप्राप्ती असंभव आहे.

मुक्तीची धारणा सुस्पष्ट नव्हती. मानवातील एका समुदायाने मुक्तीवर आपली मक्तेदारी कायम केली. धर्माने आपली सहजता व पवित्रता हिरावली होती. त्याच्यामध्ये आता धर्माचा वास्तविक भाव अर्थात धार्मिकता उरली नव्हती. काही कुप्रथा आणि कर्मकांडाचे नाव धर्म होते. धार्मिक पेशवा अधर्मी कृत्यात अग्रेसर होते आणि दानधर्माचे अधिकारी तेच समजले जात.

पारलौकिक जीवनाविषयी नाना प्रकारच्या धारणा प्रचलित होत्या ज्यांची उदाहरणे आजही समाजात बघायला मिळतात. तात्पर्य, धर्माने पूर्णपणे ऐच्छिकवाद, स्वार्थपरता आणि भौतिकतेचे स्वरूप धारण केले होते. आता ज्ञानाऐवजी अज्ञान आणि बोधाऐवजी अंधविश्वास हाच धर्म झाला होता. आता तेथे सहज तर्क आणि विवेक यांना

कोणतीही जागा नव्हती अर्थात सच्चा आध्यात्मिकतेचा लवलेशही शिल्लक राहिला नाही. धर्ममार्ग गुंतागुंतीचा झाला होता. खडतरतेमुळे मनातील कोमल आणि मधुर भाव नष्ट होऊन धर्म नितांत निरस झाला होता. ईशसमर्पण आणि भक्तीचे शब्द केवळ पुस्तकाच्या पानाची शोभा बनून राहिले. व्यावहारिक जीवनाशी त्याचा संबंध पूर्णपणे तुटला. (धर्म व्यक्तीगत बाब बनला.) महान संत आणि धर्मगुरूसुद्धा धर्माच्या वास्तविकतेपासून अनभिज्ञ होते. काही लोक धर्माच्या पारिभाषिक शब्दाचे ज्ञाता अवश्य होते, परंतु ते धर्माच्या वास्तविकतेपासून अनभिज्ञच होते. जसे आंधळ्या माणसाला प्रकाश शब्दाचे ज्ञान तर आहे, परंतु प्रकाशाचा अनुभव त्याला कधी झाला नाही. कोणताही धर्म आपला मूळ व प्रमाणित स्वरूपात उपलब्ध नव्हता. ईशधर्मामध्ये अनुचित मिश्रण आणि असत्य गोष्टींची भरमार होती, सत्य हरवले होते. अशा अज्ञानरूपी अंधकारमय वातावरणात अल्लाहने (या जगाच्या निर्माणकर्त्याने) पैगंबर मुहम्मद (स.) यांना आपला अंतिम पैगंबर संपूर्ण जगासाठी पाठविला. आपले कर्तव्य निश्चित करीत सांगितले की, केवळ अरबस्तान नव्हे तर संपूर्ण जगातील लोकांचे मार्गदर्शन करा. त्यांना सांगा जीवनाचा खरा उद्देश काय आहे? ईश्वर त्यांच्यापासून काय अपेक्षा बाळगतो? मानवाने आपले जीवन सफल कसे करावे? ईशप्राप्ती कशी होऊ शकेल?

## व्यक्तीत्व आणि कार्य - एक झलक (दर्शन)

पैगंबरीचे दायित्व पार पाडत असताना पैगंबर मुहम्मद (स.) यांना प्रत्येक कठोरता व कष्टाचा सामना करावा लागला. लोक आपले शत्रू झाले. आपणावर श्रद्धा बाळगणाऱ्या आपल्या अनुयायांनाही त्रास दिला गेला. येथपर्यंत की आपणास आपले जन्मस्थान सोडून मदीनेत स्थलांतरित व्हावे लागले. परंतु आपण आपल्या कर्तव्यपालनापासून यत्किंचितही विचलित झाले नाही. नि:संशय अल्लाहकडून आपणास महानता प्राप्त होती. आपले हृदय अत्यंत विशाल होते. आपण निर्मळ व कोमल स्वभावाचे धनी होत. आपले हृदय करूणासागर होते. अल्लाह आपला सहाय्यक होता. आपण जे महान कार्य केले ते एका आश्चर्यापेक्षा कमी नाही.

कोणाचीही महानता आणि उच्चतेचे अनुमान दोन कारणांनी केले जाते. यापैकी एक आहे दानशीलता. पैगंबरांनी स्वत: सांगितले, "जर माझ्याजवळ उहुद पर्वताएवढे

सोने असले तरी मला हे पसंत पडणार नाही की तीन दिवस गेल्यावर माझ्याकडे त्यापैकी एक दिनार शिल्लक राहावा, फक्त तो दिनार सोडून जो कर्ज देण्यास ठेवला आहे.''

पैगंबरांच्या जीवनयात्रेच्या अंतिम क्षणी घरात सोन्याचा एक तुकडा होता. त्यांनी सांगितले, ''याला दान करा.'' शुद्धीवर आल्यावर विचारले, ''सदका (दान) केला किंवा नाही? मला हे कदापिही पसंत नाही की मी अल्लाहच्या भेटीला या अवस्थेत जावे की दुनिया माझ्या घरात पडली आहे.''

पैगंबरांची राहणी अत्यंत साधी होती. त्यांच्याजवळ एक जोडीच कपडे होते. ज्या कपड्यात त्यांनी या जगातून प्रस्थान केले, त्यात खाली वर ठिगळ लागले होते. घरात एक साधारण खाट, चामडाचा एक लहान मशक आणि थोडेसे जव्ह याशिवाय काही नव्हते. ही वस्तुस्थिती होती १० लक्ष चौरस मैल यमन ते सीरियापर्यंत पसरलेल्या इस्लामी राज्याच्या शासनाधिकाऱ्याची!

पैगंबर मुहम्मद (स.) यांनी आपल्या धर्मपत्नीसाठी ज्या खोल्या तयार केल्या होत्या त्या कच्या होत्या. त्यांची उंची इतकी होती की उभे राहून सहज छताला हात लागत असे. पुढे जेव्हा उमवी वंशाचे खलीफा अब्दुल मलिक यांनी मशिदीच्या विस्तारासाठी या घरांना पाडण्याचा प्रस्ताव सादर केला, तेव्हा मदीनानिवासी अक्षरश: रडू लागले. त्यांची इच्छा होती की ही घरे बाकी ठेवावी म्हणजे लोक त्यांना बघू शकतील की १० लक्ष चौरस मैल अधिक्षेत्राचा शासक किती साधे जीवन व्यतीत करत असे. पैगंबर म्हणालात, ''मी फक्त वाटणारा आहे देणारा अल्लाह आहे.''

महानतेचा दुसरा गुण क्षमाशीलता होय. या गुणात ईशकृपेने पैगंबर (स.) इतके संपन्न होते की या गुणांनी इति आपणावर येऊन समाप्त होते असे म्हटले तर वावगे होणार नाही. ताइफच्या लोकांना पैगंबरांचा अनादर केला. त्यांच्या शरीरावर दगडांचा मारा केला येथपर्यंत की रक्तबंबाळ झाले. त्यांच्या चरणपादुका (जोडे) रक्ताने माखल्या. परंतु त्यांनी अल्लाहशी प्रार्थना केली की, ''हे अल्लाह! ताइफवासियांना क्षमा कर! ते नादान आहेत.''

पैगंबरांची क्षमाशीलता आपल्या चरमसीमेवर पोहचते. ते क्षमाशीलतेची परिभाषा आपल्या जीवनातून घडवितात. अतोनात हालअपेष्टा कोणत्याही स्वार्थाविणा त्यांनी सहन केल्या आणि जेव्हा मक्कावर विजयी पताका फडकते तेव्हा प्रथम विजयी संभाषणास

पैगंबर (स.) जनतेसमोर उभे राहतात. इस्लामी राज्यव्यवस्थेची दिशा आज निश्चित होते. त्यांच्यासमोर ते लोकही उभे आहेत ज्यांनी त्यांना अतोनात त्रास दिला. त्यांच्या हत्येचा कट रचला, त्यांना शस्त्र उचलण्यास बाध्य केले. त्यांच्या काकांचे काळीज चावून फेकले. यांच्याशी दंडात्मक कार्यवाहीला कोणीही अन्याय म्हणू शकत नव्हते, परंतु इतिहास घडला. नव्या धोरणाचा, शांतीचा, समतेचा, दयेचा. निसर्गातील प्रत्येक वस्तू आपल्या जागी स्तब्ध झाली. जेव्हा ही गर्जना चारही दिशेने प्रस्फुटीत केली की, "जा! आज तुम्ही सर्व स्वतंत्र आहात." आज शत्रूत्व आणि दंडाचा दिवस नव्हे तर आज सन्मानाचा दिवस आहे. पैगंबरांनी शत्रूचाही या प्रसंगी सन्मान केला.

पैगंबर मुहम्मद (स.) यांनी हज यात्रेप्रसंगी अरफातच्या मैदानात जे भाषण दिले ते इतिहासात अंकित आहे. पैगंबर म्हणाले,

"लोक हो! मला वाटते यानंतर मी आणि तुम्ही अशा सभेत कधी एकत्र येऊ शकणार नाही. (कदाचित हा हज माझा अंतिम हज असेल!) लोकहो! ध्यानपूर्वक ऐका; तुमचे रक्त, तुमचा माल (संपत्ती) आणि तुमची प्रतिष्ठा (अब्रू, सन्मान) एक दुसऱ्यासाठी आदरपात्र आहेत, जसे तुम्ही आजच्या दिवसाचा आणि या शहर-मक्काचा आदर करता. लोक हो! (लक्षात ठेवा) तुम्हाला लवकरच तुमच्या निर्माणकर्त्या प्रभु (अल्लाह) समक्ष उपस्थित व्हायचे आहे आणि तो तुमच्या कर्माबाबतीत तुमच्याशी प्रश्न करेल. म्हणून सावधान राहा! माझ्यानंतर पथभ्रष्ट नका होऊ की एक दुसऱ्याच्या कत्तली करू लागाल.

ऐका, अज्ञानकाळातील प्रत्येक दुष्कृत्य मी माझ्या पायाखाली टाकून खुंदळतो. अज्ञानकाळातील हिंसक तंटे मी पूर्णपणे निरस्त करतो. पहिला खून जो माझ्या स्वत:च्या वंशाचा (कुळाचा) आहे, 'इब्ने रबिआ बिन हारिस'चा खून आहे, जो बनी साद या कबिल्यात दूध पीत होता आणि हुजैलने त्याची हत्या केली होती. मी हे रक्त (हत्या) क्षमा करतो. अज्ञानकाळातील व्याज समाप्त करण्यात आले आहे. पहिला व्याज माझ्या कुटुंबाचा मी संपवित आहे. ते अब्बास बिन अब्दुल-मुत्तलिब यांचे व्याज आहे, आणि ते सर्व माफ केले.

लोकहो! आपल्या पत्नीच्या विषयात अल्लाहची भीती बाळगा. अल्लाहच्या संरक्षणात तुम्ही त्यांना आपली पत्नी बनविले आणि ईशशब्दांद्वारे तुम्ही त्यांना

शारीरिक संबंधाला आपल्यासाठी वैध केले आहे. स्त्रियांवर तुमचा हा अधिकार आहे की तुमच्या बिछान्यावर कोण्या तिसऱ्याला येऊ देऊ नये. परंतु जर ते हा अपराध करतील तर त्यांना अगदी सौम्य मार द्या, ज्याचे कोणतेही चिन्ह शरीरावर प्रगट होणार नाही. महिलांचा हक्क तुमच्यावर हा आहे की, तुम्ही योग्य रीतीप्रमाणे त्यांना अन्न आणि कपडे द्या. लोकहो! मी तुमच्याजवळ ती वस्तू सोडून जात आहे, तिला जर तुम्ही मजबुतीने अगदी घट्ट पकडून ठेवाल तर कदापिही पथभ्रष्ट होणार नाही. ती वस्तू आहे अल्लाहचा ग्रंथ (अर्थात कुरआन).

हे लोकहो! माझ्यानंतर जगात कोणताही ईशसंदेष्टा (पैगंबर) येणार नाही. तसेच कोणताही नवीन समुदाय (उम्मत) येणार नाही. ऐका! आपल्या पालनकर्त्याची बंदगी करा. पाचही वेळेची नमाज अदा करत राहा. एक महिना (रमजान) रोजे धरा. आपल्या संपत्तीची जकात स्वेच्छापूर्वक द्या. आपल्या अधिकाऱ्यांची आज्ञा पाळा, आणि आपल्या पालनकर्त्याच्या स्वर्गात प्रवेश प्राप्त करा.

लोक हो! प्रलयानंतर हिशेबाचे दिवशी तुम्हाला माझ्याविषयी विचारले जाईल तेव्हा तुम्ही काय सांगाल?

लोकांनी सांगितले, "आम्ही साक्ष देतो की, आपण अल्लाहचा संदेश आमच्यापर्यंत पोहचता केला. आपण पैगंबरीचे कर्तव्य चोखपणे पार पाडले. आपण हितेच्छूचा हक्क पूर्ण अदा केला."

पैगंबर मुहम्मद (स.) यांनी आपल्या हाताचे तर्जनी बोट उचलले व नंतर आकाशाकडे बोट उठवित व लोकांकडे झुकवित म्हणाले, हे अल्लाह ! साक्ष राहा! असे त्यांनी तीन वेळा केले. पुढे सांगितले, "बघा! जे लोक उपस्थित आहेत ते अनुपस्थित लोकांपर्यंत संदेश पोहचवून द्या. संभव आहे तुम्हा ऐकणाऱ्यांपेक्षा ते या संदेशाचे जास्त चांगले संरक्षक सिद्ध होतील ज्यांच्यापर्यंत हा संदेश पोहचविला जाईल."

# अध्याय ८
# पैगंबर मुहम्मद (स.) यांच्या पैगंबरीचे स्पष्ट प्रमाण (पुरावा)

पैगंबर मुहम्मद (स.) अल्लाहचे पैगंबर आणि पैगंबरी शृंखलेची अंतिम कडीसुद्धा आहे त्यांच्यावर पैगंबरनियुक्ती अल्लाहकडून समाप्त झाली. त्यांच्या पैगंबरीचे असंख्य पुरावे आहेत. त्यांच्या जीवनाचा प्रत्येक क्षण आणि त्यांचे अस्तित्व सर्वथा साक्ष आहे की त्यांनी पैगंबर होण्याची घोषणा केली तेव्हा या घोषणेत ते शंभर टक्के खरे होते.

कोणी हे सांगू शकते की, पैगंबर मुहम्मद (स.) यांना पैगंबर होण्याचा केवळ भ्रम झाला असेल. प्रत्यक्षात त्यांना पैगंबरत्व प्रदान करण्यात आलेच नसावे. या बाबतीत ही गोष्ट विसरता कामा नये की, पैगंबरी सचोटीचा स्वतंत्र पुरावा असते. पुराव्याची गरज तिथे पडते जिथे कोणत्याही प्रकारचा संशय असतो. ज्या शक्ती आणि क्षमतांद्वारे आम्ही कार्य करतो, त्यांच्यावर विश्वास ठेवण्यास त्या क्षमता स्वत: पुरेशा असतात. त्यांना मान्य करण्यास अन्य पुराव्याची गरज नसते. हीच स्थिती पैगंबराची असते. जी वस्तू त्यांच्यासमोर येते व ज्याचा त्यांना अनुभव होतो त्यावर विश्वास करण्यास कोणत्याही बाह्य प्रमाणाची आवश्यकता नसते. वह्य (दिव्य प्रकटन) स्वप्न अथवा जागृतावस्थेत त्यांच्यावर अवतरित होतो, ते कोणत्याही संशयाशिवाय तिला ओळखतात. ते त्या स्वप्नाला ही जाणतात जे मात्र कल्पना असते, दिव्य प्रकटन नव्हे. स्वप्नाच्या माध्यमातून परोक्षाच्या गोष्टींच्या सूचनांचे द्वार त्यासाठीही उघडे आहे जो पैगंबर नाही आणि हे यासाठी असते की विद्वानांना हे कळून यावे की भौतिक साधनांव्यतिरिक्तही ज्ञानाचे दुसरे साधन संभव आहे. म्हणूनच पैगंबरांच्या दिव्य प्रकटनावर विश्वास न करण्याचे कोणतेही उचित कारण नाही.

## पैगंबर मुहम्मद (स.) यांचे जीवन

पैगंबर जीवनचरित्राच्या दृष्टीने अगदी निष्कलंक असतात. त्यांच्या जीवनात खोटेपणा, कपट आणि अशाच प्रकारच्या दुसऱ्या गोष्टी नसतात. अल्लाहचे अंतिम दूत पैगंबर मुहम्मद (स.) यांना वयाच्या ४० व्या वर्षी पैगंबरी प्राप्त झाली. ४० वर्षापर्यंतचे त्यांचे जीवन एका खुल्या पुस्तकाप्रमाणे लोकांच्या समक्ष, लोकांसोबत होते. लोकांना

पैगंबर (स.) यांच्यावर विश्वास होता. लोकांना चांगल्या प्रकारे माहीत होते की ज्या व्यक्तीने कोणत्याही बाबतीत, मग ती लहान असो किंवा मोठी छळ-कपटाने काम घेतले नाही, कधी कुणाला धोका दिला नाही, तसेच तो कोणत्याही प्रकारच्या षड्यंत्रात सामील झाला नाही. मग हे कसे शक्य आहे की इतका खरा व सच्चा व्यक्ती ज्याने कधी चुकूनही मिथ्या गोष्ट तोंडातून काढली नाही. अचानक एक असत्य घेऊन उभा होईल? मग हे असत्यही इतके मोठे की त्यापेक्षा मोठ्या असत्याची संभावनाच नाही की, तो अल्लाहचा पैगंबर होण्याचा दावा करून टाकेल? जेव्हा की तो अल्लाहकडून पाठविण्यात आला नाही आणि मग तो लोकांना ज्ञान, सभ्यतेची शिकवण देतो व सांगतो की ही शिकवण त्याची स्वत:ची निर्मिती नसून ईशअवतरित आहे. मग यांच्या जीवनाची तब्बल ४० वर्ष जी सामान्यांसोबत व्यतीत झाली, त्यात कोणतेही शिक्षण त्यांनी कोठूनही प्राप्त केले नाही, ऐतिहासिक माहिती कोठूनही गोळा केली नाही. मग हे कसे शक्य झाले की, सहसा ज्ञान आणि तत्त्वदर्शितेचे स्रोत फुटू लागले आणि एक निरक्षर व्यक्ती जीवनाच्या कठीण व दुर्बोध समस्या सोडवू लागतो, लोकांना आचार-विचार, नागरिकता इत्यादीविषयी शिकवण देऊ लागतो. इतके करूनही सांगतो की "सर्व मी केवळ अल्लाहने दिलेल्या प्रकाशात करीत आहे. (माझे स्वत:चे ज्ञान काहीच नाही.)" विरोधक म्हणायचे कोणी या व्यक्तीला या सर्व गोष्टी शिकवितो. परंतु त्यांना स्वत:लाही त्यांच्या आक्षेपात कधीही पूर्ण विश्वास वाटला नाही, कारण त्या काळी पूर्ण अरबमध्ये या योग्यतेचा कोणी एकही व्यक्ती नव्हता. दुसरीकडे जी वाणी पैगंबर मुहम्मद (स.) ईशवाणी म्हणून प्रस्तुत करीत होते तिच्याविषयी ज्यांना संशय आहे त्याने तशी वाणी प्रस्तुत करावी. या योग्यतेचा एकही व्यक्ती अरबच नव्हे तर पूर्ण जगात आजपर्यंत जन्माला आला नाही. जो ईशवाणीसमान एखादी कृती (रचना) प्रस्तुत करू शकेल जी पैगंबर मुहम्मद (स.) प्रस्तुत करीत होते.

## पैगंबरांची नि:स्वार्थता

हे तर सर्वविदीत आहे की कपट, फसवणूक करणाऱ्यांसमक्ष नेहमी त्याचा ऐहिक (भौतिक) फायदा असतो. त्या लाभासाठीच तर तो फसवा-फसवीचे कृत्य करतो आणि असत्य व मिथ्या दावे करतो. या विपरीत पैगंबर मुहम्मद (स.) यांच्या जीवनाचे शोधात्मक अध्ययन केल्यावरही अशा कोणत्याही लाभाच्या संकेताचा लवलेशही दिसत नाही. इतकेच नव्हे तर आपल्या नात्या-गोत्यातील अथवा वारसांकरिता असा कोणताही

प्रयत्न केल्याचा लवलेश आढळत नाही जो भौतिक हित साधणारा आहे. पैगंबर (स.) प्रत्येक पैलूने शंभर टक्के नि:स्वार्थ भावनेने नव्हे लोककल्याणाच्या भावनेने, ज्या कार्यावर अल्लाहने आपली नियुक्ती केली होती ते कर्तव्य बजावित होते. पुढे कोणालाही मतभेद निर्माण करून वाद घालण्यास संधी मिळू नये म्हणून पैगंबरांनी ही घोषणासुद्धा केली की पैगंबरांचा कोणी वारस नसतो ते जे काही आपल्या मागे सोडतात ते गरीब, गरजू मुस्लिमांमध्ये वितरित केले जाते.'' (हदीस : मुसनद अहमद)

पवित्र कुरआनने याची साक्ष देत सांगितले की प्रत्येक पैगंबराने आपल्या लोकसमुदायाला संबोधून सांगितले,

''मी या कामासाठी तुमच्याकडून कोणत्याही मोबदल्याचा इच्छुक नाही. माझा मोबदला तर सर्व जगांच्या पालनकर्त्याकडे आहे.'' (दिव्य कुरआन , २६ : १०९)

पैगंबरांची नि:स्वार्थता इतकी उज्वल व स्पष्ट आहे की कोणी त्यांच्यावर हा आरोप लावू शकला नाही की ते कोण्या व्यक्तीगत उद्देशाने परिश्रम करीत आहेत व कष्ट सहन करून राहिले. पैगंबरत्वाच्या घोषणेपूर्वी पूर्ण समुदाय पैगंबर मुहम्मद (स.) यांना आदरभावाने बघत होता. अमीन (अमानतदार) व सादीक (सत्यनिष्ठ) या टोपणनावाने ओळखल्या जाणाऱ्या पैगंबर मुहम्मद (स.) यांनी पैगंबरत्वाची घोषणा करताच पूर्ण अरब त्यांचा शत्रू होतो. आपलेच लोक आपल्याच रक्ताचे भुकेले झाले. एक स्वार्थी आणि भौतिकवादी व्यक्ती अशी भयंकर चूक कधीही करणार नाही की विनाकारण सर्वांना आपला शत्रू बनवेल. आपले सुख व शांती स्वत:च नष्ट करेल. असत्य आणि स्वार्थी व्यक्तीला सत्य व असत्याशी काहीएक घेणे-देणे नसते. त्याच्यासमोर केवळ आपला स्वार्थ व लाभ असतो. तो समुदायाच्या चुकीच्या भावनांनाही आघात पोहचवू शकत नाही. त्याला आपल्या कार्याशी संबंध असतो. भौतिक सुखासाठी प्रत्येक प्रकारची जोड-तोड ते करतात. बरे हे कसे योग्य होईल एक व्यक्ती ज्याच्यासमोर त्याचा भौतिक लाभ व सुख आहे, तो आपल्या कार्यपद्धतीने संकटाला आमंत्रण देईल, तेही येथपर्यंत की जीवालाही धोका निर्माण व्हावा.

जगातील मोठ्या विभूती सामान्यपणे त्या वातावरणाची निर्मिती असते ज्यामध्ये ते जन्म घेतात. कोणत्याही व्यक्तीत्वाला घडविण्यात आणि बिघाडण्यात वातावरण आणि परिस्थितीचा मोठा हात असतो. कोणत्याही ऐतिहासिक व्यक्तीचे सर्वेक्षण करून हे दाखविता येते की त्याच्या व्यक्तीत्वनिर्मितीमध्ये वातावरणातील कोणकोणत्या गोष्टीचा किती वाटा आहे. परंतु पैगंबर मुहम्मद (स.) यांच्या व्यक्तीत्वाची विशेषता ही आहे की,

वातावरणात आम्ही त्या तत्त्वांचे स्त्रोत शोधू शकत नाही, ज्या तत्त्वांनी त्यांचे व्यक्तीत्व निर्माण झाले व जी त्यांच्या व्यक्तीत्वामध्ये परिलक्षित होतात. केवळ अरबच नव्हे तर त्यांचा संबंध ज्या देशाशी होता ते देश व तेथील समाज कोठूनही ती तत्त्वे शोधून आणली जाऊ शकत नाहीत.

आदरणीय नूह (अ.) या पैगंबरांचे विस्तृत वृत्तांत प्रस्तुत केल्यावर सांगितले,

"हे पैगंबर (स.), या परोक्षाच्या वार्ता आहेत ज्या आम्ही तुमच्याकडे दिव्य प्रकटन करीत आहोत. यापूर्वी तुम्ही त्यांना जाणत नव्हता आणि तुमचे लोक देखील. म्हणून संयम बाळगा, कार्याचा शेवट तर ईशपरायण लोकांसाठीच आहे."

(दिव्य कुरआन, ११ : ४९)

याचप्रमाणे पवित्र कुरआनने अन्य कित्येक पैगंबर आणि त्यांच्या समुदायाचे वृत्तांत वर्णिले आहेत. घटनांच्या वास्तविकतेला पूर्णतः स्पष्ट केले गेले ज्यांचा संबंध बनीइस्त्राईलच्या इतिहासाशी आहे आणि ज्यांच्याविषयी बनीइस्त्राईलच्या विद्वानांत मतभेद व्याप्त आहे.[१] जर पवित्र कुरआन ईशवाणी नाही तर मग पैगंबर मुहम्मद (स.) यांना मागील विभिन्न समुदाय आणि त्यांच्या वृत्तांतांचे ज्ञान कोठून प्राप्त झाले, जे पवित्र कुरआनच्या आयातीत प्रस्तुत केले गेले आहे? शेकडो आणि हजारो वर्षापूर्वी घटित घटनांचे ज्ञान पैगंबर (स.) यांना कोठून प्राप्त झाले? आपणास लिहता वाचता येत नव्हते हे विशेष पवित्र कुरआन याचे उत्तर देतो-उदाहरणार्थ - इसा मसीह (येशू खिस्त)यांची आई मरयम आणि त्यांच्या पुत्राच्या जन्माचा वृत्तांत प्रस्तुत केल्यावर सांगितले,

"(हे पैगंबर (स.)!) या परोक्षाच्या वार्ता आहेत ज्या आम्ही तुम्हाला दिव्य प्रकटनाद्वारे कळवीत आहोत, एरव्ही तुम्ही त्यावेळी त्या ठिकाणी हजर नव्हता, जेव्हा हैकलचे सेवक हा निर्णय घेण्याकरिता की मरयमचा पालक कोण असावा, यासाठी आपापले फांसे फेकत होते. आणि त्यावेळी देखील तुम्ही हजर नव्हता जेव्हा त्यांच्या दरम्यान भांडण होत होते."

(दिव्य कुरआन, ३ : ४४)

आदरणीय युसूफ (अ.) यांचे विस्तृत वृत्तांत प्रस्तुत करून पवित्र कुरआन सांगतो,

---

१) पाहा दिव्य कुरआन २७ व्या अध्याय चा आरंभिक भाग.

"हे पैगंबर (स.), ही कथा परोक्षाच्या वार्तांपैकी आहे जी आम्ही तुमच्याकडे दिव्य प्रकटन म्हणून पाठवीत आहोत. एरव्ही तुम्ही त्यावेळी हजर नव्हता जेव्हा यूसुफ (अ.) च्या भावांनी आपापसांत संगनमत करून कट केला होता."

(दिव्य कुरआन, १२ : १०२)

## हे कसे संभव झाले?

पवित्र कुरआनमध्ये त्यांच्या पूर्वी अवतरित ईशग्रंथांची शिकवण, पैगंबरांचे वृत्तांत, विभिन्न समुदाय, धर्म प्रकार व त्यांच्या विचारांचे वर्णन, तसेच प्राचीन समुदायाचा इतिहास मिळतो. या व्यतिरिक्त त्यात नैतिकता, संस्कृती, अर्थ आणि राजनीती इत्यादी विषयावरील महत्त्वपूर्ण समस्येचे गंभीर, व्यापक आणि सखोल असे ज्ञान प्रदर्शित झाले आहे. या ज्ञानाचा स्रोत ईशप्रकाशना (वह्य) शिवाय दुसरा कोणताही होऊ शकत नाही. पवित्र कुरआनमध्ये प्राचीन समुदायांचे जे वृत्तांत वर्णिले गेले आहेत. त्याचा शोध प्राचीन इतिहासतज्ञांनी घेतला, तेव्हा त्यांना काही प्राचीन पुस्तके व दस्तावेजांत ते सत्य आढळले. त्यांनी केलेल्या शोधात जी पुस्तके त्यांना आढळली त्यापर्यंत अरबांची पोहचही नव्हती. या बाबतीत ज्या पुस्तकांचा अथवा स्रोताचा उल्लेख आला आहे त्यात इबरानी, सूर्यानी आणि युनानी पुस्तके आहेत. थोडा वेळ थांबून विचार करा की पैगंबर मुहम्मद (स.) यांच्याकडे अनुवादकांचे दल कोठे होते जे या पुस्तकातील विभिन्न ऐतिहासिक तथ्यांपासून पैगंबर (स.) यांना अवगत करतील? मक्का शहरात असे कोणतेही वाचनालय नव्हते की या पुस्तकांपासून फायदा घेतला जाईल. हे सत्य आहे की पैगंबर मुहम्मद (स.) पैगंबरत्व प्राप्त होण्यापूर्वी अरबच्या बाहेरचा प्रवास व्यापारासाठी केला, परंतु यासमयी ते विभिन्न वाचनालयांत जाऊन याचे ज्ञान प्राप्त करीत असत, असा कोणाताही पुरावा उपलब्ध नाही. पैगंबरत्व प्राप्त होण्याच्या एक क्षण आधीपर्यंत कोणीही त्यांच्या तोंडून अशी गोष्ट ऐकली नाही की, ज्यावरून हा अंदाज बांधता येईल की पैगंबर मुहम्मद (स.) पैगंबरांचे वृत्तांत आणि समुदायांविषयी वृत्तांताशी परिचित होते. पैगंबरांच्या व्यापारिक प्रवासादरम्यान जर त्यांनी कोणत्याही ख्रिस्ती अथवा ज्यू संत अथवा पंडितापासून हे ज्ञान प्राप्त केले असते तर पैगंबरीची घोषणा केल्यावर हे लोक गप्प बसले नसते. या लोकांनी नाना प्रकारे विरोध केला, परंतु कधीही हा आक्षेप घेतला नाही की हे ज्ञान तर पैगंबर मुहम्मद (स.) आमच्या येथून घेऊन गेलेत.

पैगंबर मुहम्मद (स.) यांच्या पैगंबरीचा हासुद्धा सुस्पष्ट पुरावा आहे की ते अशिक्षित असूनही पूर्वीच्या सर्व ईशधर्मग्रंथांचे तथ्य आणि सारांश जगासमोर प्रस्तुत केला. पैगंबर मुहम्मद (स.) यांनी मानवी मार्गदर्शनासाठी या ग्रंथात जी काही माहिती उपलब्ध होती ती केवळ एकत्रच केली नाही तर तिचे स्पष्टीकरणही केले. या पुस्तकात लोकांनी स्वार्थापायी जे अनुचित परिवर्तन केले होते ते सर्व त्यांनी स्पष्ट केले. काय हे अशा व्यक्तीचे कार्य असू शकते जी वाळवंटी प्रदेशात राहणारी आणि जगातील धर्म प्रकार व दर्शनशास्त्राशी काहीएक संबंध नसलेली आहे? पवित्र कुरआन पैगंबर मुहम्मद (स.) यांचा विरोध करणाऱ्यांचे म्हणणे प्रस्तुत करुन सांगतो,

"ते म्हणतात, हा इसम आपल्या पालनकर्त्याकडून एखादा संकेत (चमत्कार) का आणत नाही? आणि त्यांच्यापाशी पूर्वीच्या धर्मग्रंथाच्या सर्व शिकवणुकीचे वर्णन स्पष्टपणे आले नाही का?" (दिव्य कुरआन, २० : १३३)

अर्थात - काय हे कोणत्याही प्रमाण आणि निशाणीपेक्षा कमी आहे की मुहम्मद (स.) यांनी लोकांसमोर पूर्वीच्या ग्रंथांच्या शिकवणी स्पष्ट रूपाने प्रस्तुत केल्या? काय हे कार्य कोणत्याही अशा व्यक्तीसाठी संभव आहे जो ईशधर्मग्रंथांपासून अनभिज्ञ आहे आणि ज्याने कधी धर्मगुरूसोबत आपला वेळ घालविला नाही, मग अचानक जगाला धर्माची उच्च शिकवण देणे आरंभ केले. इतकेच नव्हे तर पूर्वीची धार्मिक पुस्तके आणि पैगंबरांविषयी अशा सूचना देणे ज्या सत्य आणि हृदयस्पर्शी होत्या? पैगंबर मुहम्मद (स.) यांनी पैगंबरत्व बहाल झाल्यानंतर जे महान कार्य (एक सर्वांगीण आदर्श क्रांती) केले आणि ज्या सत्य ईशज्ञानाने जगाला परिचित केले ते कार्य पैगंबर पदासंबंधी कार्य व कर्तव्यही आहे आणि ते आपल्या पैगंबरीचे प्रत्यक्ष अगदी खुले प्रमाण सुद्धा आहे.

## पैगंबर मुहम्मद (स.) यांची परीक्षा

मक्का येथील काही विरोधकांनी ज्यू लोकांच्या सांगण्यावरून पैगंबर मुहम्मद (स.) यांची परीक्षा घेण्याच्या हेतूने त्यांना विचारले की बनीइस्राईल यांचे इजिप्त जाण्याचे काय कारण आहे? इतिहासाच्या या भागाशी पूर्ण अरब अपरिचित होता, म्हणून त्यांच्या येथे या गोष्टीचा कधीही उल्लेख झाला नव्हता आणि पैगंबर मुहम्मद (स.) यांच्या तोंडून कोणी कधीही काही ऐकले नाही. म्हणूनच ज्यू लोकांचा हा समज होता की या प्रश्नाचे उत्तर देण्यास पैगंबर मुहम्मद (स.) आपली असमर्थता प्रकट

करतील. परंतु ज्यू लोक आपल्या या कटात तोंडघशी पडले. कारण अल्लाहने याच्या उत्तरात एक पूर्ण सूरह, नं.१२, यूसुफ अवतरित केला. आदरणीय यूसुफ (अ.) यांच्या सत्य कथनाच्या माध्यमातून अल्लाहने मक्कावासियांसमोर हे पण स्पष्ट केले की हे लोक ज्या प्रकारचा दुर्व्यवहार पैगंबर मुहम्मद (स.) सोबत करीत आहेत, असाच दुर्व्यवहार आदरणीय यूसुफ (अ.) या पैगंबरांच्या भावांनी त्यांच्या सोबत केला. आदरणीय यूसुफ (अ.) यांना अल्लाहने उच्चता (श्रेष्ठता) प्रदान केली आणि शेवटी त्यांच्या भावांना त्यांच्यासमोर लज्जित व्हावे लागले.

याचप्रमाणे पवित्र कुरआनचा सूरह नं. १८, अल-कहफ मक्काच्या अनेकेश्वरवाद्यांनी लोकांच्या तीन प्रश्नांच्या उत्तरात अवतरित झाला. पैगंबर मुहम्मद (स.) यांची परीक्षा घेण्याच्या उद्देशाने मक्काच्या अनेकेश्वरवाद्यांना ज्यू आणि ख्रिस्ती लोकांशी संगनमत करून तीन प्रश्न विचारले. या तिन्ही प्रश्नांचा संबंध ज्यू लोकांच्या इतिहासाशी होता.

१) कहफ (गुफा) वाले कोण होते?

२) जुलकरनैन कोण होता? त्याचा तपशील काय आहे?

३) खिज्रचा किस्सा काय आहे?

या प्रश्नांची उत्तरे देण्यात निश्चितच पैगंबर मुहम्मद (स.) अपयशी ठरतील आणि मग ही गोष्ट स्पष्ट होईल की पैगंबर मुहम्मद (स.) यांच्याजवळ ज्ञानाचे कोणतेही अलौकिक स्त्रोत नाही. अर्थातच त्यांचा पैगंबरीचा दावा निराधार आहे. परंतु विरोधक आणि ज्यू लोकांच्या या आशेच्या विपरीत अल्लाहने एक मोठा सूरह नं.१८, 'अल-कहफ' अवतरित करून या तिन्ही प्रश्नांची उत्तरे दिली. विरोधकांच्या या कुटनीतीने मुहम्मद (स.) यांच्या सत्यतेप्रति एक ज्वलंत पुरावा उपलब्ध झाला.

पवित्र कुरआनमध्ये ज्या भविष्यवाणी (पूर्वभाकित) करण्यात आल्या आहेत, त्या या गोष्टीचे प्रमाण आहे की अशा भविष्यवाणी तीच व्यक्ती करू शकते जिच्याजवळ ज्ञानाचे विश्वसनीय स्त्रोत आहे. अर्थात अल्लाह सत्यतेशी अवगत करतो. केवळ अंदाज व अनुमानच्या आधारावर भविष्यात घटित होणाऱ्या घटनांविषयी विश्वासपूर्वक कथन करण्याचा कोणतीही सूज्ञ व्यक्ती धोका पत्करू शकत नाही. कारण अनुमान चुकीचे निघाले तरी अल्लाह व पैगंबरी दोन्हींना धोका होता. कारण अल्लाहचे भाकीत चूक ठरूच शकत नाही. पवित्र कुरआनने जितक्या भविष्यवाणी केल्या आहेत, त्या सर्व

अक्षरश: सत्य सिद्ध झाल्या. उदाहरणार्थ, पवित्र कुरआनने घोषित केले होते की, रोम जो सध्या ईराणी शक्तीने परास्त झाला आहे, काही वर्षातच तो पुन्हा प्रभुत्व प्राप्त करील. ही भविष्यवाणी अशा परिस्थितीत करण्यात आली होती की, दूर-दूरपर्यंत याची संभावना नव्हती किंवा तशी कल्पनाही कोणी करू शकत नव्हता. परंतु ही भविष्यवाणी शंभर टक्के सत्य ठरली. एडवर्ड गिब्बन (Edward-Gibbon) सारखा प्रसिद्ध इतिहासकार या गोष्टीला आपले पुस्तक ' The History of the Decline and full of the Roman Empire' मध्ये स्वीकार करतो.

## एक विशेष पैलू

पैगंबर मुहम्मद (स.) यांना विभिन्न आणि अत्यंत कठीण अशा परिस्थितीतून जावे लागले. अशा परिस्थितीतून जात असताना कितीही मोठी व्यक्ती असली तरी काही न काही कटुपणाचा प्रभाव अवश्य बघायला मिळतो. आपली प्रतिष्ठा आणि मर्यादेवर जेव्हा आक्रमण होते, तेव्हा एक सामान्य माणूस प्रभावित झाल्याशिवाय राहत नाही. परंतु आम्ही बघतो की, पैगंबर मुहम्मद (स.) हे पवित्र कुरआन ईशवाणीच्या रूपात प्रस्तुत करीत होते ते अशा कटुपणा आणि प्रतिक्रियांपासून पूर्णपणे मुक्त होते. त्यांच्यामध्ये कोणत्याही क्षणी चीड किंवा मानसिक दुर्बलता शोधूनही सापडत नाही. या दृष्टिकोनाने बघितले तरी ही गोष्ट मान्य करावीच लागते की पवित्र कुरआन ईशवाणी आहे आणि हाच स्पष्ट पुरावा होय पैगंबर मुहम्मद (स.) यांच्या पैगंबरीचा, कारण ईशवाणी ही पैगंबरांवरच अवतरित होते.

## पैगंबरांची चेतावणी

पैगंबरांच्या सचोटीचा एक महत्त्वपूर्ण पुरावा त्यांची चेतावणीसुद्धा आहे. जेव्हा ईशसंदेश व पैगंबरांच्या विरोधात ते समुदाय ज्यामध्ये पैगंबर पाठविण्यात आले होते आपल्या विद्रोही नितीमध्ये हद्द पार केली आणि पैगंबरांजवळ ईशयातना व प्रकोपाची मागणी करू लागले, तेव्हा पैगंबरांनी त्यांना सूचित केले की लवकरच ते अल्लाहच्या प्रकोपात ग्रस्त होणार आहेत. थोडा वेळ अजून सुख-सुविधांचा लाभ घ्या. हे मात्र निश्चित की आता ईशप्रकोपापासून सुरक्षित राहण्याचा प्रश्नच नाही. इतिहास साक्ष आहे की पैगंबरांच्या सूचनेनुसार ते समुदाय नष्ट करण्यात आले. वास्तविक ज्या वेळी पैगंबरांनी कोण्या समुदायाला त्याच्या विनाशाची सूचना दिली त्या वेळी त्या समुदायात कोणत्याही पैलूने ईशप्रकोपाची चिन्हे दिसत नव्हती. पवित्र कुरआनमध्ये याची अनेक

उदाहरणे देण्यात आली आहेत.

या जागी मनात हा प्रश्न निर्माण होऊ शकतो की, अल्लाहची अवज्ञा आणि विद्रोही नीती अंगीकारल्यावरही आज अल्लाहचा प्रकोप का बरे येत नाही? याचे उत्तर असे आहे की, पैगंबरांच्या उपस्थितीत त्यांची आणि ते प्रस्तुत करीत असलेल्या ईशसंदेशाच्या नकाराच्या पाषाणतेची पराकाष्ठा झाली होती. कारण सरळ-सरळ त्यांचा विरोध करणे व त्यांचा संदेश रद्द करणे, त्यांना त्रास देणे आणि त्यांचे अस्तित्वही असहनीय होणे, तसेच त्यांच्याशी सरळ-सरळ ईशप्रकोपाची मागणी करणे; या अपराधात आणि नाकारण्याचा तो अपराध जो पैगंबराच्या अनुपस्थित केला जातो, यामध्ये मौलिक अंतर आहे. येथे पैगंबरांचे प्रत्यक्ष अस्तित्व लक्ष्य नसते. म्हणूनच पैगंबरांच्या पश्चात लोकांना अथवा त्या समुदायांना ज्यांना पैगंबरांनी प्रत्यक्षात संबोधन केले नाही, सावरण्यास वा स्वत:ला सुधारण्याची जास्त संधी मिळते आणि ते जगात ईशप्रकोपापासून जास्त काळ सुरक्षित राहतात. परंतु याचा अर्थ हा कदापिही नाही की, त्यांची कधी पकडच होणार नाही. कोणत्याही व्यक्ती किंवा समुदायासाठी अथवा त्याच्या यातनासाठी परलोकाची यातना पर्याप्त आहे.

याचा दुसरा पैलू हा आहे की; यातनांचे प्रकोपाचे अनेक प्रकार असतात. एखाद्या जाती-समुदायाला जिवंत तर राहू द्यावे, परंतु त्यांची अवस्था एका अत्यंत मलीन अथवा बहिष्कृत समुदायाची बनवून द्यावी. काय हे यातनेपेक्षा कमी आहे? एखादा समुदाय विद्वान असूनही सत्याच्या प्रकाशापासून वंचित होऊन पशुतुल्य जीवन जगतो आणि आपल्या जीवनाच्या श्रेष्ठतम मूल्यांपासून अपरिचितच राहतो. काय ही यातना काही साधारण दंड आहे? मग असे मुळीच नाही की, समुदायावर संकट व आपत्ती येणे बंदच झाले. आजही समुदायावर अजाब (प्रकोप) येतच असतात. हे संकट लहान अथवा मोठे दोन्ही असू शकतात. लहान-लहान संकट सूचना देण्यास असतात तर मोठे निर्णायक असतात. परंतु त्याकडे आमचे लक्ष त्या दृष्टीने जात नाही. तसेच आमचे लक्ष तिकडे केंद्रित करणारे लोकही नाहीत जे सांगतील की जगात केवळ प्राकृतिक नियमच कार्यान्वित नाही तर येथे नैतिक कायदासुद्धा कार्यान्वित आहे. थोडा गंभीरतेने जर आम्ही विचार केला तर स्पष्टत: दिसून येईल की, येथे दु:ख व संकटाच्या मागे केवळ प्राकृतिक नियमच नव्हे तर नैतिक नियमही क्रियाशील आहे. ईशसंकट आणि यातनांचे सर्वेक्षण करणारे त्याच्या कारणांचा शोध सामान्यपणे प्राकृतिक नियमामध्येच करतात. ते हा विचार कधी करतच नाहीत की, अल्लाह आहे जो

अत्याचारी व्यक्ती आणि समुदायांना विभिन्न प्रकारे चेतावनी देत असतो. उदाहरणार्थ, कधी एडस्‌सारख्या असाध्य रोगाच्या रूपात तर कधी अशांती आणि भयंकर युद्धाच्या रूपात चेतावणी दिली जात आहे. कधी असेही होते की चेतावणीच नव्हे तर पूर्ण शहरेच्या शहरे नष्ट केली जातात. त्यांचे काही अवशेष लोकांना शिकवण प्राप्त व्हावी म्हणून बाकी राहतात.

रोम राज्याचे शहर पोम्पीआई (Pompeii) लैगिक दुराचारात ग्रस्त होते त्याचा परिणाम तोच झाला जो आदरणीय लूत (अ.) या पैगंबरांच्या समुदायाचा झाला होता. ज्वालामुखी पर्वतातून निघणारा लावा आणि आग याने शहराच्या लोकांना वेढले आणि ही विनाशकारी आपत्ती दिवसा अचानक तेव्हा आली जेव्हा शहरात जीवन सामान्य होते. हे शहर अपराध आणि व्यभिचाराचे केंद्र बनले होते. लोक मस्तीमध्ये इतके गर्क होते की त्यांना ज्वालामुखीचा आवाज ऐकल्यावरही कोणी तेथून पलायन केले नाही. एका परिवाराचे लोक जेवण करीत होते, ते त्याच दशेत दगड बनले. लाव्यामुळे दगडात परिवर्तीत होणारे अधिकतर जोडे रति-क्रियेत व्यस्त होते, त्यापैकी जास्त समलिंगी होते. या जोड्यांमध्ये अधिक संख्या तरुणांची होती. खोदकामाच्या वेळी दगडात परिवर्तीत झालेले पिशाच चेहरे मिळाले ते त्यांच्या चेहऱ्यावर भीती आणि रागाची चिन्हे दिसत होती. ही चिन्हे दर्शवित होती की, हे लोक अचानक संकटात वेढले गेले. अशा संकटांना (विनाश) पवित्र कुरआन अचानक येणारा प्रकोप म्हणतो,

"त्यानंतर त्याच्या जातीबांधवांवर आम्ही आकाशांतून एखादे लष्कर उतरविले नाही. आम्हाला लष्कर पाठविण्याची काही गरज नव्हती. केवळ एक विस्फोट झाला आणि अकस्मात ते सर्व विझले." (दिव्य कुरआन, ३६ : २८-२९)

# अध्याय ९

# पैगंबर मुहम्मद (स.) यांची वैशिष्ट्ये

पैगंबर मुहम्मद (स.) हे अन्य पैगंबरांसारखेच अल्लाहचे पैगंबर होते. परंतु अल्लाहने त्यांना काही अशा विशेषता प्रदान केल्या होत्या ज्या दुसऱ्या पैगंबरांना दिल्या नव्हत्या. त्यापैकी काहींचा उल्लेख येथे करीत आहोत.

## संपूर्ण जगासाठी

पैगंबर मुहम्मद (स.) अख्ख्या विश्वासाठी पैगंबर म्हणून (बनवून) पाठविण्यात आले होते. त्यांची पैगंबरी केवळ अरबवासी लोकांपर्यंत मर्यादित नव्हती तर संपूर्ण जगाच्या जाती-सांप्रदायाचे ते पैगंबर होते. पवित्र कुरआन स्पष्ट शब्दांत सांगतो -

"अत्यंत समृद्धशाली आहे तो ज्याने हा फुरकान (निकष) आपल्या दासांवर अवतरला जेणेकरून सर्व जगवासियांसाठी खबरदार करणारा ठरावा."

(दिव्य कुरआन, २५ : १)

आणि घोषणा झाली की,

"हा तर सकल जगवासियांसाठी एक उपदेश आहे."

(दिव्य कुरआन, ८१ : २७)

दुसऱ्या जागी घोषित करण्यात आले,

"हे मुहम्मद (स.) सांगा की, "हे मानवांनो, मी तुम्हा सर्वांकडे त्या अल्लाहचा पैगंबर आहे जो पृथ्वी व आकाशांच्या राज्यांचा स्वामी आह."

(दिव्य कुरआन, ७ : १५८)

एका जागी या शब्दांत सांगितले,

"हे मुहम्मद (स.), आम्ही तुम्हाला लोकांसाठी पैगंबर बनवून पाठविले आहे आणि यासाठी अल्लाहची साक्ष पुरेशी आहे." (दिव्य कुरआन, ४ : ७९)

एका दुसऱ्या जागी सांगितले,

"आणि (हे पैगंबर (स.)), आम्ही तुम्हाला अखिल मानवजातीसाठी शुभवार्ता

देणारा आणि सावधान करणारा बनवून पाठविले आहे, परंतु बहुतेक लोक जाणत नाहीत.''
(दिव्य कुरआन, ३४ : २८)

अन्य जागी पवित्र कुरआनने घोषित केले,

''(हे मुहम्मद!) आम्ही तुम्हाला संपूर्ण जगवासियांसाठी कृपा (रहमत) बनवून पाठविले आहे.''
(दिव्य कुरआन, २१ : १०७)

पवित्र कुरआनव्यतिरिक्त स्वतः पैगंबर मुहम्मद (स.) यांनी सांगितले की त्यांना समस्त जगाच्या मानवांसाठी पैगंबर म्हणून पाठविण्यात आले आहे. पैगंबरांचे कथन आहे,

''मी काळे आणि गोरे सर्वांकडे पैगंबर बनवून पाठविण्यात आलो आहे.''
(हदीस : मुसनद अहमद)

पैगंबर (स.) यांनी सांगितले,

''आधी (यापूर्वी) एक पैगंबर विशेषकरून आपल्या समुदायाच्या लोकांकडेच पाठविले जात होते, परंतु मी सर्व (जगाच्या) मानवांकडे (पैगंबर म्हणून) पाठविण्यात आलो आहे.''
(हदीस : बुखारी, मुस्लिम)

''मी संपूर्ण जगवासियांकडे पाठविण्यात आलो आहे आणि माझ्यानंतर पैगंबरांच्या आगमनाचा क्रम बंद करण्यात आला.''
(हदीस : मुस्लिम)

ज्याप्रकारे सूर्याचा प्रकाश संपूर्ण जगासाठी पर्याप्त होतो, त्याचप्रमाणे पैगंबर (स.) यांचे मार्गदर्शन समस्त जगवासियांसाठी पर्याप्त होय. प्रत्येक वस्तीमध्ये वेगवेगळा एक-एक पैगंबर पाठविणेही अल्लाहला शक्य होते. परंतु सर्व जग एक झाले आहे तर मग संपूर्ण विश्वाच्या लोकांचा पैगंबर व मार्गदर्शकही एकच असावा म्हणजे लोकांत एकता आणि विश्वबंधुत्व स्थापित करण्यास साहाय्यक ठरेल. अल्लाहने पवित्र कुरआनमध्ये सांगितले की,

''जर आम्ही इच्छिले असते तर एक एक वस्तीत एक एक सावध करणारा उभा केला असता.''
(दिव्य कुरआन, २५ : ५१)

## मानवतेसाठी एक परिपूर्ण आदर्श

पवित्र कुरआनची स्पष्टोक्ती आहे,

"वस्तुत: तुम्हा लोकासाठी अल्लाहचे पैगंबर एक उत्कृष्ट आदर्श आहेत, त्या प्रत्येक माणसासाठी जो अल्लाह व मरणोत्तर जीवनातील मोबदल्याच्या दिवसाचा उमेदवार असेल आणि बहुतांशी अल्लाहचे स्मरण करीत असेल."

(दिव्य कुरआन, ३३ : २१)

उपरोक्त आयातीत अगदी स्पष्ट शब्दांत घोषित करण्यात आले की आदर्श मानवी जीवनासाठी उत्तम आदर्श पैगंबर मुहम्मद (स.) यांच्या जीवनचरित्राशिवाय कोठेही नाही. परंतु याचा लाभ तेच लोक घेऊ शकतात जे आपले जीवन ईशसन्मार्गावर व्यतीत करण्याची आकांक्षा बाळगतात. अर्थातच त्यांचा दृढ विश्वास आहे की त्यांची अल्लाहशी भेट होणे एक अकाट्य सत्य आहे. निश्चितच ती आनंदाची घटका येणार जी ईशमिलनची आमची मनोकामना पूर्ण करेल, त्यांना या गोष्टीची पूर्णपणे कल्पना असते की ईशमिलनाच्या सुखद क्षणाचा आनंद ईशप्रसन्नतेशिवाय शक्य नाही आणि ही प्रसन्नता तेव्हाच मिळू शकते जेव्हा मनुष्य आपल्या जीवनाला अल्लाहला नापसंत असलेल्या गोष्टींपासून सुरक्षित ठेवेल. म्हणजेच जो मनुष्य आपल्या जीवनात पैगंबरांच्या (पैगंबर मुहम्मद (स.)) माध्यमातून प्राप्त ईशआदेश आणि शिकवणीनुसार आचरण करून आपले व्यक्तीत्व घडविण्याचे व त्याला आकर्षक बनविण्यास सतत प्रयत्नशील राहील. ईशप्रसन्नता व पर्यायाने ईशमिलनचे सुखद क्षण त्याच्याकडे चालून येतील.

उत्तम आदर्श त्यालाच म्हणता येईल जो सुंदर व दोषरहित आहे. जो परिपूर्ण आहे आणि अपूर्णतेचा आभास जेथे होत नाही. पैगंबर मुहम्मद (स.) यांचे संपूर्ण जीवन, जीवनातील प्रत्येक क्षेत्रात उत्तमच नव्हे तर अत्युत्तम व पूर्ण आदर्श आहे. जीवनातील प्रत्येक क्षेत्रां (पैलू) विषयी त्यांची शिकवण, चरित्र व आचरणात पूर्ण असे मार्गदर्शन उपलब्ध आहे. परंतु हे मार्गदर्शन आत्मसात करण्यास मनुष्य समजदार व विवेकशील होणे आवश्यक आहे, त्याला या गोष्टीचे आकलन असावे की कोणाच्या जीवनचरित्रातून मार्गदर्शन कसे प्राप्त करता येईल?

ही गोष्ट अगदी अज्ञानपूर्ण व विवेकहीन आहे की कोणी हे म्हणत असेल की, पैगंबरांचे जीवन मनुष्यांसाठी एक उत्तम आदर्श तर आहे परंतु ते परिपूर्ण आदर्श नाही. कारण पैगंबर (स.) एका विशिष्ट काळ आणि स्थितीत जन्माला आले, आपली भाषा

एक विशिष्ट भाषा होती जी सर्व मानवांची भाषा नव्हती. पैगंबरांनी आपल्या वडिलांना बघितले नव्हते, केवळ आई, आजोबा आणि काका यांनाच बघितले होते. ते मुलीचे पिता तर होते परंतु त्यांचा एकही मुलगा जिवंत राहिला नाही. ते पुरुष तर होते, परंतु स्त्रियांसाठी ते आदर्श कसे? या आणि अशाच प्रकारच्या गोष्टी अत्यंत पोरकटपणाच्या नव्हेत तर काय?

पैगंबर मुहम्मद (स.) एक पूर्ण व आदर्श नमूना आहे याचा स्पष्ट अर्थच हा आहे की, आम्ही जीवनाच्या प्रत्येक क्षेत्रात आपल्या (स.) पासून मार्गदर्शन प्राप्त करू शकतो व हे मार्गदर्शन अगदी पर्याप्त आहे. मग या मार्गदर्शनाचा संबंध व्यक्तीगत जीवनाशी असो किंवा सामाजिक, आर्थिक व्यवस्थेशी संलग्न असो अथवा राजनीतिशी, विभिन्न विषय-धारणांशी आणि विचारांशी संबंधित असो अथवा भावना आणि मानसिकतेशी असो; मग हे मार्गदर्शन भौतिकता, आध्यात्मिकता अथवा नैतिकतेच्या बाबतीत असो. तात्पर्य हेच की जन्मापासून मृत्युपर्यंत जीवनातील प्रत्येक भागातच नव्हे तर मृत्युपश्चात जीवनाविषयी आम्ही पैगंबर मुहम्मद (स.) यांच्यापासून मार्गदर्शन प्राप्त करू शकतो ते ही सटीक व ईशप्रसन्नतेची हमी देणारे. येथे निराशा आमच्या पदरी पडणार नाही. हे सत्य आहे की, पैगंबर (स.) यांची भाषा अरबी होती व त्यांच्यावर अवतरित ईशमार्गदर्शक ग्रंथ अरबीत आहे. परंतु हे विसरता कामा नये की पूर्वार्धप्रमाणे या ग्रंथाची अथवा पैगंबरांची भाषा मृत भाषा नव्हे की तिला समजणारे, बोलणारे, वापरणारे लोक जगात नाहीत जेणेकरून आम्हाला समजणे किंवा सत्यतेपर्यंत पोहचणे असंभव होईल की पैगंबर मुहम्मद (स.) यांचा संदेश व शिकवण काय होती?

यात कोणतीही शंका नाही की पैगंबर (स.) यांचे आगमन एका विशेष काळात झाले होते. परंतु त्यांची शिकवण व मार्गदर्शन वैश्विक आणि सर्वकालिन आहे. पैगंबर (स.) वचन (कथन) आणि त्यांच्यावर अवतरित ईशग्रंथ पवित्र कुरआन यामध्ये अशा नियमांचा व सिद्धांताचा उल्लेख आहे की त्यांच्या आधारावर प्रत्येक गुण व प्रत्येक परिस्थितीत अगदी प्रलयापर्यंत उद्‌भवणाऱ्या नवनवीन आणि कठीण व दुर्बोध समस्या मनुष्य सोडवू शकतो. इतिहासाचे अध्ययन याला सिद्ध करते की, या बाबतीत इस्लाम त्यांच्या संगतीत यशस्वीपणे उभा राहिला जो त्याच्या मार्गदर्शनात आपल्या समस्यांचे समाधान अथवा निरसन करू इच्छित होता. या प्रकारे आम्ही बघतो की जणू काही पैगंबर मुहम्मद (स.) आजही आमच्यासोबत आहेत आणि आमचे मार्गदर्शन करीत आहेत, जरी पैगंबर (स.) यांच्या जीवनकाळात आणि आजच्या युगात बरेच अंतर

दिसते. विभिन्न प्रकारच्या समस्या आ-वासून उभ्या ठाकलेल्या दिसतात. संपूर्ण जग आज एका गावाप्रमाणे झाले आहे. मनुष्य ब्रह्मांडातील दुसऱ्या ग्रहावर अधिकार प्राप्त करण्यास प्रयत्नशील आहे. परंतु वास्तविकता ही आहे की मौलिक समस्या नेहमी एकसमान होत्या - आहेत आणि भविष्यातही राहतील. केवळ त्यांचे बाह्य स्वरूप बदलते.

पैगंबर मुहम्मद (स.) यांनी आपल्या पित्याला बघितले नाही, परंतु पैगंबरांचा व्यवहार जो आपले काका आणि अन्य वडीलधाऱ्या लोकांसोबत होता, तसेच त्यांना दूध पाजणाऱ्या आईचा त्यांनी ज्या प्रकारे आदर केला काय, आम्हाला हा बोध होत नाही की, आम्ही माता-पिता आणि वडिलधारी मंडळींशी कसा व्यवहार करावा? मग या बाबतीत मौखिक रुपाने आपण जी शिकवण दिली आणि पवित्र कुरआनने या संबंधात जे आदेश दिलेत काय ते आमच्या मार्गदर्शनास पर्याप्त नाहीत? आता या पोरकट आक्षेपाकडे बघा की पैगंबर मुहम्मद (स.) यांचा कोणताही मुलगा जिवंत राहिला नाही, तर पिता-पुत्र संबंधाची शिकवण कशी मिळेल? वास्तविक ही गोष्ट जिचा बुद्धी व ज्ञानाशी काही संबंध नाही. पैगंबर मुहम्मद (स.) यांचे दत्तकपुत्र माननीय जैद (रजि.) यांच्याशी आपला व्यवहार काय एका सूज्ञ व्यक्तीला पुत्राशी संबंधाचे ज्ञान प्राप्त होत नाही?

पैगंबर मुहम्मद (स.) पुरुष होते, मग स्त्रियासाठी आदर्श कसे? या हास्यास्पद विचारांच्या लोकांनी हे विसरता कामा नये की, पैगंबर मुहम्मद (स.) हे एक आदर्श पतीच्या रूपात आमच्या समक्ष येतात. ते आपल्या धर्मपत्नींशी संबंध व त्यांना दिलेली शिकवण याशिवाय स्त्री समुदायाविषयी जे काही आपण सांगितले ते सर्व अगदी प्रामाणिक आणि मूळ रूपात उपलब्ध आहे. यांच्या अध्ययनाने जेथे आम्हाला हे कळते की एक आदर्श पती कसा असावा तेथे पूर्णत: हा बोधही होतो की आदर्श पत्नी आणि महिला कशा असाव्यात. पैगंबर (स.) यांच्या शिक्षण व प्रशिक्षणाने त्यांच्या धर्मपत्नीं एक आदर्श रूप धारण केले होते, ज्याची पुष्टी पवित्र कुरआनने होते. पवित्र कुरआन सांगतो,

"नबी (स.) च्या पत्नींनो! तुम्ही सामान्य स्त्रियांप्रमाणे नाहीत."

(दिव्य कुरआन, ३३ : ३२)

वास्तविकता ही आहे की पैगंबरांचे (स.) जीवन केवळ उत्तमच नव्हते तर ते पूर्णत: एक आदर्श जीवन होते आणि याच दृष्टिकोनाने त्याचे अध्ययन करायला पाहिजे.

पैगंबर (स.) यांचे जीवन एका अशा अथांग समुद्रासमान आहे ज्याचे टोक (किनारा) दिसून येत नाही. पैगंबरांच्या जीवनाचे गुण आणि विशेषतांचे वर्णन केल्यानंतरही असा भास होतो की यासंबंधी बरेच काही वर्णन करावयाचे शिल्लक राहिले आहे.

सोबतच ही गोष्टही दृष्टीसमोर असावी की, धर्माच्या मौलिक शिकवणीचा स्त्री व पुरुष दोघांशीही समान संबंध आहे. उदाहरणार्थ, इमान, ईशपरायणता, सुशीलता आणि सद्व्यवहार इत्यादीशी संबंधित शिकवणी स्त्री व पुरुष दोघांसाठी एक समान आहेत. मानवी जीवनात आस्था आणि चरित्र यांनाच मौलिक महत्त्व प्राप्त आहे. पैगंबर मुहम्मद (स.) यांनी सांगितले, मला याकरिता पैगंबर बनवून पाठविले की मी नैतिक सद्गुणांना त्यांच्या उच्च शिखरापर्यंत पोहचवून द्यावे. अगदी त्याच्या शेवटच्या हद्दीपर्यंत. पवित्र कुरआननेसुद्धा ही गोष्ट स्पष्ट होते की स्त्री आणि पुरुष दोघांमध्ये बघण्याची मौलिक वस्तू इमान (श्रद्धा) आणि सत्कर्मच आहे. लिंगभेद तर एक गौण बाब आहे. वास्तविक मूल्य तर मानवी आत्म्याला प्राप्त आहे. अट फक्त हीच आहे त्याची विश्वस्त भाव भूमी हवी. (श्रद्धा-इमान) पवित्र कुरआनची स्पष्टोक्ती आहे,

"जो दुराचार करील त्याला तेवढाच बदला मिळेल जितका याने दुराचार केला असेल आणि जो सत्कर्म करील, मग तो पुरुष असो अथवा स्त्री, तो श्रद्धावंत असावा, असे सर्व लोक स्वर्गामध्ये प्रविष्ट होतील. तेथे त्यांना अमाप उपजीविका दिली जाईल."

(दिव्य कुरआन, ४० : ४०)

उपरोक्त विवेचनात ही गोष्ट अगदी स्पष्ट होते की, स्त्रियांच्या मार्गदर्शनासाठी वेगळ्या स्त्री-पैगंबराची काही आवश्यकता नाही. जो पैगंबर पुरुषांसाठी मार्गदर्शक म्हणून पाठविण्यात आला आहे तोच स्त्रियांचेही मार्गदर्शन करतो.

## प्रलयापर्यंत

पैगंबर मुहम्मद (स.) हे कोणत्याही विशिष्ट युगासाठी पैगंबर नसून या सृष्टीच्या अंतापर्यंत म्हणजेच प्रलयापर्यंत पैगंबरी ही त्यांचीच राहणार. अर्थातच त्यांचे समकालिनच नव्हे तर प्रलयापर्यंत येणारे सर्व लोक त्यांच्या पैगंबरीपासून लाभान्वित होतील. परंतु ते दुर्दैवी लोक लाभान्वित होणार नाही जे आपल्या हृदयाची वक्रता अथवा खोडसाळ प्रवृत्ती आणि पक्षपात, पूर्वाग्रह किंवा दुसऱ्या कोणत्याही नैतिक रोगामुळे पैगंबर (स.) यांच्या मार्गदर्शनाचा स्वीकार करणार नाही. हेच लोक नेहमी करिता अल्लाहच्या कृपेपासून वंचित राहतील. पवित्र कुरआन सांगतो,

"तोच आहे ज्याने निरक्षर लोकांत एक पैगंबर खुद्द त्यांच्यापैकीच उभा केला

जो त्यांना त्याची वचने ऐकवितो, त्यांचे जीवन सावरतो आणि त्यांना ग्रंथाची आणि बुद्धिमत्तेची शिकवण देतो, वास्तविक पाहता यापूर्वी ते उघड पथभ्रष्टतेत पडलेले होते.'' (दिव्य कुरआन, ६२ : २)

यावरून हे सिद्ध होते की प्रलयापर्यंत येणारे भाग्यशाली लोक पैगंबर मुहम्मद (स.) यांच्या पैगंबरीवर इमान (श्रद्धा) धारण करून त्यांच्या मार्गदर्शनापासून प्रलयापर्यंत लाभान्वित होत राहतील. मुहम्मद (स.) यांचे मार्गदर्शन जर प्रलयापर्यंत पर्याप्त नसते तर मग पैगंबरीचा क्रम त्यांच्यावर समाप्त झाला नसता.

## अंतिम पैगंबर

पैगंबरी शृखंलेची अंतिम कडी पैगंबर मुहम्मद (स.) होय. अल्लाहने याची घोषणा पवित्र कुरआनमध्ये केली,

''(लोकहो!) मुहम्मद (स.) तुमच्या पुरुषांपैकी कोणाचे पिता नाहीत परंतु ते अल्लाहचे पैगंबर आणि अंतिम पैगंबर आहेत, आणि अल्लाह प्रत्येक वस्तूचे ज्ञान राखणारा आहे.'' (दिव्य कुरआन, ३३ : ४०)

पैगंबर मुहम्मद (स.) यांच्या आगमनानंतर निरंतर अशी परिस्थिती निर्माण होत गेली की, त्यांचा संदेश संपूर्ण जगात पोहचू लागला. पैगंबरांच्या आगमनानंतर वेगवेगळ्या संप्रदायात पैगंबर नियुक्त करण्याची आवश्यकता राहिली नाही. याशिवाय पैगंबर मुहम्मद (स.) यांनी भविष्यवाणी केली की त्यांची शिकवण व कथन आणि त्यांच्यावर अवतरित ईशग्रंथ (कुरआन) कोणत्याही फेरफार अथवा बदलाशिवाय आपल्या मूळ स्वरूपात सुरक्षित राहील. असे शासक आणि सुधारक निरंतर येत राहतील जे संघटनची व्यवस्था सांभाळतील व जो बिघाड निर्माण झाला असेल त्याला दूर करतील. पैगंबर मुहम्मद (स.) म्हणाले,

''माझी अनेक नावे आहेत. मी मुहम्मद आहे, मी अहमद आहे, आणि मी 'माही' (संपविणारा किंवा मिटविणारा) आहे की अल्लाह माझ्याद्वारे कुफ्र संपवेल आणि मी 'हाशिर' आहे, तो 'हाशिर' की त्याच्यानंतर लोक हश्र (प्रलयक्षेत्र, कयामत) च्या मैदानात एकत्रित केले जातील आणि मी 'आकिब' (मागील शेवटचा येणारा) आहे की ज्याच्या पश्चात कोणी पैगंबर नाही.'' (हदीस : बुखारी, मुस्लिम)

पैगंबर (स.) यांनी सांगितले,

''मी पैगंबरांचा समापक आहे. माझ्यानंतर कोणताही पैगंबर नाही.''

(हदीस : मुस्लिम)

"मला अशा समयी पाठविण्यात आले आहे की मी आणि कयामतचा दिवस (हिशेबाचा दिवस) या बोटाप्रमाणे आहे. (दोन बोटे दाखवित सांगितले अर्थात अत्यंत जवळ.)" (हदीस : बुखारी, मुस्लिम)

तात्पर्य आता प्रलयापर्यंत कोणत्याही पैगंबराच्या आगमनाची संभावना मुळीच नाही आणि त्याची आवश्यकताही नाही.

पवित्र कुरआन सांगतो -

"जवळ येऊन ठेपली आहे लोकांच्या हिशोबाची घटका आणि ते गाफील आहेत." (दिव्य कुरआन, २१ : १)

## सुरक्षित जीवनचरित्र

अल्लाहचे अंतिम पैगंबर मुहम्मद (स.) यांच्या जीवनाची विशिष्टता ही आहे की त्यांच्या जीवनाचा प्रत्येक भाग (पैलू) अत्यंत विस्तारपूर्वक सुरक्षित आणि ज्ञात आहे. हे म्हणणे कदापिही वावगे होणार नाही किंवा ती अतिशयोक्तीही ठरणार नाही की जगात केवळ त्यांचेच जीवनचरित्र विस्तारपूर्वक सुरक्षित आहे. पैगंबरत्व प्राप्त होण्यापूर्वी त्यांचे जीवन कसे होते? त्यांच्यावर दिव्य प्रकाशना (वह्य) चे अवतरण कधी आणि कसे झाले? त्यांनी लोकांना सत्याकडे कशा प्रकारे आमंत्रित केले? विरोधक व शत्रूंची भूमिका आणि त्यांचा सामना कसा केला? त्यांनी आपल्या अनुयायांना कशाप्रकारे शिक्षण व प्रशिक्षण दिले? कोणत्या गोष्टी करण्याचा आदेश दिला व कोणत्या गोष्टी न करण्यास बजावले? ते ईशभक्ती व प्रार्थना कशा प्रकारे करायचे? अल्लाहचे निरंतर स्मरण कशा प्रकारे करायचे? अल्लाहची भीती त्यांना किती व कशी असायची? परलोकाविषयी चिंता व जाब द्यावयाच्या संकल्पनेचा प्रभाव त्यांच्या जीवनावर कसा होता? लोकांनी सन्मार्गावर यावे आणि अल्लाहच्या प्रकोपापासून सुरक्षित रहावे यासाठी ते किती चिंतीत असायचे? अल्लाहची जी विशेष कृपा त्यांच्यावर होती तिचा किती आभास होता? अल्लाहचे आभार ते कशाप्रकारे प्रगट करायचे? त्यांच्या रात्री कशा असायच्या? ईशप्रशंसा आणि महानता व्यक्त करणारे कथन काय नेहमीकरिता महावाक्य सिद्ध झाले? त्यांचा स्वभाव कसा होता? त्यांचे चालणे, बोलणे, प्रबोधनपद्धती कशी होती? त्यांना युद्ध करावे लागले तर आपली युद्धनीती कशी होती? त्यांनी जर संधी केली तर तिचा निर्वाह (पालन) कशा प्रकारे केला? त्यांनी राज्य चालवले तर त्यांची शासनप्रणाली कशी होती? लोकांच्या तक्रारी अथवा

खटल्यांचे निर्णय ते कसे करायचे? घेवाण-देवाण, क्रय-विक्रयाच्या बाबतीत त्यांची भूमिका व आचरण कसे असायचे? घरात पत्नीशी त्यांचा व्यवहार कसा असायचा? अल्लाहने सोपविलेल्या कर्तव्याचे पालन त्यांनी कसे केले? मुले-मुली, शेजारी, दीन-दुबळे, अनाथ-विधवा यांच्याशी त्यांचा व्यवहार कसा होता? शरीराची निगा ते कशी राखायचे?

तात्पर्य, जीवनाच्या प्रत्येक क्षेत्राविषयी त्यांनी जे मार्गदर्शन केले, जे आदेश दिले ते विस्तृत रूपात अगदी सुरक्षित आहेत. अल्लाहची अवतरित वाणी जी त्यांनी प्रस्तुत केली ती आपल्या मूळ शब्दांत अगदी सुरक्षित आहे. तिचा क्रम अगदी मुळ रुपात म्हणजे ज्या क्रमाने पैगंबर (स.) यांना ईशसंकेताने प्रस्तुत केले होते त्यातही परिवर्तन झाले नाही. मुस्लिम विद्वानांनी पवित्र कुरआन आणि पैगंबर मुहम्मद (स.) यांचे कथन आणि आचरणावर जे शोधात्मक आणि व्याख्यात्मक कार्य केले ते इतके असाधारण आहे की त्याचे दुसरे उदाहरण जगातील कोणत्याही जाती-संप्रदायाने प्रस्तुत केले नाही.

## पैगंबर मुहम्मद (स.) यांच्या शिकवणींची प्रामाणिकता

अंतिम पैगंबर मुहम्मद (स.) यांचे जीवनचरित्र, त्यांचे आदेश व शिकवण केवळ विस्तारपूर्वक मूळ स्वरूपात उपलब्धच नाही तर याचे न भूतो न भविष्यति असे अप्रतिम वैशिष्ट हे आहे की ज्या माध्यमातून पैगंबर (स.) यांची शिकवण व आदेश आमच्यापर्यंत पोहोचले ते अत्यंत प्रामाणिक आहेत. ज्या लोकांनी पैगंबर (स.) यांची दिनचर्या आणि त्यांची शिकवण एकदुसऱ्यापर्यंत पोहचविण्याचे महान कार्य केले त्यांची संख्या एका लाखापेक्षा कमी नाही. काही आदेश असेही आहेत जे पैगंबरांनी (स.) स्वतः समक्ष लिहून घेतले व दुसऱ्या लोकांपर्यंत पोहचविले. पैगंबरांच्या अनुयायांमध्ये कमीतकमी ६ व्यक्ती अशा आहेत ज्यांनी पैगंबरांच्या कथनाला लिपीबद्ध करून पैगंबर मुहम्मद (स.) यांच्या समक्ष प्रस्तुत करून त्याची खात्रीही केली. हा ज्ञान-भंडार जो पैगंबरांच्या समोर लिपीबद्ध झाला होता. तो नंतर येणाऱ्या योग्य विभूतीपर्यंत पोहचला ज्यांनी हदीस (पैगंबर (स.) कथन कार्य) एकत्रित करून त्यांना ग्रंथरुपात प्रस्तुत करण्याचे अप्रतिम व महत्त्वपूर्ण कार्य संपन्न केले.

या संकलनाचे हे वैशिष्ट आहे की अगदी प्रारंभापासून यासाठी वैज्ञानिक प्रक्रिया अंमलात आणली. ती पद्धत अशी की कोणतीही व्यक्ती ज्या व्यक्तीच्या माध्यमाने पैगंबर

मुहम्मद (स.) यांचे कथन सांगायचा त्याला हे स्पष्ट करावे लागत असे की पैगंबर मुहम्मद (स.) यांचे हे कथन त्यांच्यापर्यंत कोणकोणत्या व्यक्तीच्या माध्यमातून पोहचली. पैगंबर मुहम्मद (स.) आणि तो व्यक्ती या दरम्यान कोणकोणते उल्लेखनकर्ते आहेत आणि ते किती विश्वासपात्र आहेत? पैगंबरांच्या कथनाच्या सत्यतेवर शिक्कामोर्तब करण्यापूर्वी कथन व कथनकर्त्याची श्रृंखला थेट पैगंबर मुहम्मद (स.) यांच्यापर्यंत पडताळण्यात येत असे. जर दरम्यान एखादी कडी अदृष्य अथवा लुप्त असेल तर ते कथन संदिग्ध कथनाच्या सूचित समाविष्ट करण्यात यायचे. तसेच जर उल्लेखकर्ता लोकांच्या श्रृंखलेत कोणी कोणत्याही कारणास्तव पूर्णपणे विश्वासपात्र नसला तर अशा कथनाला अस्वीकृत करण्यात येत असे. हदीसकथनकर्ता लोकांच्या जीवनावर विस्तृत ग्रंथ लिहण्यात आली. या ग्रंथांत नमूद करण्यात आले की उल्लेखकर्ता ज्या व्यक्तीच्या हवाल्याने उल्लेख करतो आहे त्याच्याशी भेटला किंवा नाही? त्याची स्मरणशक्ती कशी आहे? त्यांचे चरित्र कसे आहे? अशा प्रकारे हा एक चमत्कारच म्हणावा लागेल की पैगंबर मुहम्मद (स.) यांच्या कथनाची पुष्टी करण्यास हजारो लोकांचे जीवनचरित्र लिपीबद्ध होऊन सुरक्षित झाले. अरबांच्या या संशोधात्मक प्रक्रियेला "अस्माउर रिजाल"[१] म्हणतात.

जगातील अन्य पैगंबर अथवा धार्मिक गुरु यांच्याविषयी अध्ययन करतो तेव्हा मामला याच्या अगदी विपरीत दिसतो. आदरणीय मूसा (अ.) यांच्यावर अवतरित मूळ

१) 'अस्माउर रिजाल' ते शास्त्र आहे ज्यात त्या सर्व लोकांचे सविस्तर वर्णन केले गेले आहे. ज्यांच्या माध्यमातून पैगंबर मुहम्मद (स.) यांचे कथन इत्यादी आमच्यापर्यंत पोहचले. हदीस उल्लेखकर्त्यांच्या अनेक श्रृंखला आहेत. ज्यांचे शेवटचे टोक पैगंबर मुहम्मद (स.) यांच्याशी अवश्य मिळते. दरम्यान एखादी कडी सुटली तर या क्रमाने पोहचलेली हदीस संदिग्ध होते. याचप्रमाणे उल्लेखकर्ता लोकांमध्ये जर कोणी कोणत्याही दृष्टीने विश्वास करण्यायोग्य नाही राहिला तर या अवस्थेतही हदीससुद्धा संदिग्ध समजली जाईल. मजबूत आणि विश्वसनीय हदीस तीच आहे जी अशा श्रृंखलेच्या माध्यमाद्वारे आमच्यापर्यंत पोहचली की त्यामधील एकही कडी लुप्त नाही किंवा उल्लेखकर्त्यापैकी कोणाच्याही चारित्र्यामध्ये कोणताही दोष नाही. 'अस्माउर रिजाल' मध्ये हदीसच्या उल्लेखकर्तामधील प्रत्येक व्यक्ती विषयी विस्तृत माहिती गोळा करण्यात आली आहे. यात जन्म, मृत्यू तिथी, स्मरणशक्ती, सत्यता, धार्मिकता इत्यादीविषयी सविस्तर वर्णन मिळते.

'तौरात' आज उपलब्ध नाही. तसेच अन्य पैगंबरांवर अवतरित ग्रंथ आज आपल्या मूळ स्वरूपात उपलब्ध नाही. बायबलमध्ये ज्या पुस्तकांचा समावेश आहे त्यापैकी एकाही पुस्तकाची सनद (पुरावा, प्रमाण) त्या पैगंबरांपर्यंत पोहचत नाही, ज्यांच्या नावाने ही पुस्तके प्रसिद्ध आहे. जी इंजिले (Gospel) आज प्रचलित आहेत त्यात इसा मसीह (येशू ख्रिस्त) यांच्या जीवनवृत्तांत आणि इंजिलची आयते (श्लोक) यांची अशी भेसळ करण्यात आली की त्यांना वेगळे करणे असंभव झाले. मग इंजिले लिहलीच गेली नव्हती तर त्यांचा प्रचार मौखिक होता. लिपीबद्ध करण्याचे कार्य त्या इसाई लोकांद्वारे संपन्न झाले ज्यांची भाषा 'यूनानी' होती आणि इसा मसीह (येशू ख्रिस्त) आणि त्यांच्या अनुयायांची भाषा 'सूर्यानी' किंवा आरामी होती. बायबलचे नवीन नियम (New Testaments) च्या पुस्तकाच्या हजारो प्रती ज्या युनानी भाषेत लिहिल्या गेल्या आहेत. त्यामध्ये एकही चार इतके इसवी पूर्वीची नाही. जवळपास ७० इंजिले लिहण्यात आलीत. त्यामध्ये केवळ चौघांनाच स्वीकृती प्रदान करण्यात आली. परंतु स्वीकृती आणि अस्वीकृतीचे कोणतेही उचित कारण प्रस्तुत करण्यात आले नाही.

जवळपास अशीच स्थिती अन्य धर्मगुरुंच्या वृत्तान्त आणि शिकवणींची आहे. जर कोणी यांच्या प्रामाणिकतेविषयी संतुष्टी करण्याचा प्रयत्न करेल तर निराशाच पदरी पडेल.

## अंतिम पैगंबरांच्या समुदायाची विशेषता

पैगंबर मुहम्मद (स.) यांना ही विशेषता प्राप्त आहे की काही अन्य समुदायांप्रमाणे यांचा समुदाय पूर्णपणे असा नष्ट होणार नाही की नाव-निशाणही शिल्लक राहिले नाही. तसेच हेसुद्धा कधीही होणार नाही की पैगंबर मुहम्मद (स.) यांचा समुदाय पूर्णच्या पूर्ण पथभ्रष्ट झाला. अर्थात कितीतरी अनेक समुदायांप्रमाणे हा समुदाय जिवंत तर आहे परंतु सन्मार्गापासून दूर व अलिप्त आणि सत्याच्या जागी असत्य स्वीकार करेल. पैगंबर मुहम्मद (स.) म्हणाले,

"माझ्या समुदायात एक समूह नेहमी (सत्यावर) कायम आणि प्रभावी राहील."

(हदीस : बुखारी, मुस्लिम)

आपण अल्लाहने प्रदान केलेल्या विशेष कृपेला स्पष्ट करीत सांगितले,

"अल्लाहने तुम्हाला तीन वस्तूंची (गोष्टीची) सुरक्षा प्रदान केली आहे. (त्या म्हणजे) तुमच्या विनाशाची तुमच्या पैगंबराकडून अभिशाप (बद्दुआ), दुसरे असे की मिथ्यावादी सत्यवादीवर प्रभावी होवोत आणि तिसरे असे की तुम्ही सर्वच्या सर्व पथभ्रष्ट व्हावे."

(हदीस : अबू दाऊद)

यावरून हे स्पष्ट होते की धर्मविरोधी ज्ञान आणि तर्काच्या दृष्टीने कधीही सत्य आणि त्याच्या अनुयायांना परास्त करू शकत नाही. जर धर्म (सत्य) विरोधकांनी सत्याच्या विरुद्ध युद्ध केले तर अंतत: विजय सत्याचाच होईल. अर्थातच सत्याच्या अनुयायांमध्ये इमान (श्रद्धा)ची पूर्ण शक्ती व युद्ध सत्यासाठी केवळ ईशमार्गात असावे आणि एकता राखून अल्लाहने प्रदान केलेल्या भौतिक साधनांचा पुरेपूर लाभ घ्यावा.

पैगंबर (स.) यांच्या उपरोक्त कथनाने हेसुद्धा अगदी स्पष्ट होते की, आपला समुदाय पूर्णच्या पूर्ण कधीही पथभ्रष्ट होणार नाही. कितीही कठीण परिस्थिती निर्माण झाली तरीही आपल्या समुदायाचा कोणता न कोणता समूह हा सत्यावर दृढ राहील.

## एक भविष्यवाणी

पैगंबर मुहम्मद (स.) यांना एक विशेषता ही प्रदान करण्यात आली की अरब प्रायद्वीपला त्यांच्या आगमनाने अनेकेश्वरत्व आणि मूर्तीपूजेपासून नेहमीकरिता (कायमस्वरूपी) पवित्र करण्यात आले. परस्पर असहयोग इत्यादी बिघाड तर निर्माण होतील परंतु सैतान यापासून नेहमीकरिता निराश झाला आहे की, येथे आता तो पुन्हा अनेकेश्वरत्व व मूर्तीपूजेचा पाया घालू शकणार नाही.

## स्पष्ट धर्म आणि स्पष्ट मार्ग

पैगंबर मुहम्मद (स.) द्वारे सत्य-धर्मा (मानवी-धर्म) ला पूर्ण रूप देऊन जगासमक्ष प्रस्तुत केले. विशाल मर्मरहित कोणतीही गोष्ट यामध्ये आढळून येत नाही. अल्लाह आणि त्याचे दास यांच्या दरम्यानचे सर्व अडथळे या धर्माद्वारे संपविण्यात आले. आता पुरोहितगिरीची कल्पना तसेच तथाकथित पवित्र वर्गाचे (ज्याच्या साहाय्यतेशिवाय अल्लाहशी सामीप्य प्राप्त होऊच शकत नाही.) वर्चस्व पूर्णपणे संपले. पैगंबर (स.) यांनी प्रस्तुत केलेले धर्मविधान त्या साहसी विद्वान व्यक्तीसाठी आहे जे

पवित्र कुरआन आणि पैगंबर मुहम्मद (स.) यांच्या जीवनपद्धतीला दृढतेने अंगीकारून आचरणातून त्याचे प्रतिबिंब प्रगट करतात. हे ते लोक आहेत ज्यांनी बुद्धीविवेक आणि समज यांना तिलांजली दिली नाही तर त्यापासून लाभान्वित होतात. आपल्या समस्या व महत्त्वपूर्ण विषयावर परस्पर चिंतन व परामर्शाने काम घेतात. हे लोक संघटनांचे महत्त्व चांगल्या प्रकारे समजतात आणि त्यांच्या सुरक्षतेप्रति सतर्क राहतात.

सन्मार्गाच्या स्पष्ट निर्देशनास्तव सत्य धर्माला अगदी सुस्पष्ट रूप देऊन त्याच्या सुरक्षतेसाठी जो ग्रंथ या जगाच्या निर्मिक अल्लाहने अवतरित केला तो पवित्र कुरआन आहे. तो एकमेव ईशग्रंथ आज जगात अगदी मूळ स्वरूपात उपलब्ध आहे आणि भविष्यातही प्रलयापर्यंत पूर्णतया सुरक्षित राहील. अल्लाहने तशी घोषणाही आपल्या वाणीद्वारे केली आहे.

"उरले हे स्मरण, तर हे आम्ही अवतरले आहे आणि आम्ही स्वत: याचे संरक्षक आहोत." (दिव्य कुरआन, १५ : ९)

पुढील अध्यायात आम्ही पवित्र कुरआनच्या काही वैशिष्ट्यांवर प्रकाश टाकू.

# अध्याय १०

# पवित्र कुरआनच्या काही विशेषता

अगणित विशेषतांचा स्वामी व असीम वैशिष्ट्यांनी परिपूर्ण असा अनुपम ग्रंथ म्हणजे पवित्र कुरआन होय. पवित्र कुरआन ईशवाणी असल्यामुळे सर्वगुणसंपन्न होणे हीच त्याची ओळख आहे. नि:संशय पवित्र कुरआन ईशवाणी आहे, अर्थातच सत्य व आकर्षक आहे. समस्त सत्कर्माचे प्रतीक आहे. पवित्र कुरआनच्या काही महत्त्वपूर्ण विशेषतांची चर्चा येथे अपेक्षित आहे.

## १) ईशवाणी

हा ग्रंथ मानवरचित नसून नि:संशय ईशवाणी आहे. हा ग्रंथ स्वत: वारंवार हा दावा करतो की तो अल्लाहतर्फे अवतरित आहे. कोणत्याही मनुष्याच्या बुद्धीची उत्पत्ति नव्हे. यासाठी हा ग्रंथ बौद्धिक तर्कही प्रस्तुत करतो व अनेक वेळा मानवाला आवाहन करतो की जर कोणाला याच्या ईशवाणी होण्यात शंका असेल तर त्याने यासमान वाणीची रचना करून प्रस्तुत करावी आणि या कार्यासाठी एकमेव अल्लाहला सोडून वाटेल त्याची मदत घ्यावी. त्याचे हे आवाहन आजही जिवंत आहे परंतु कोणत्याही विरोधकाला ते पेलने अथवा त्याचे उत्तर देणे संभव झाले नाही.

## २) सत्य आंदोलनाचे पूर्ण विवरण

पवित्र कुरआन एकमेव असा ग्रंथ आहे ज्याचे विभिन्न अंश विभिन्न परिस्थितीत व वेळोवेळी अवतरित झालेत. हा ग्रंथ एकाच वेळी पूर्णपणे संकलित रूपात जगासमोर आला नाही. परंतु तरीही याची भाषा, रस आणि ज्ञानाच्या उच्यतर स्तरामध्ये कोठेही अंतर आलेले नाही. हा ग्रंथ २३ वर्षाच्या कालावधीत पूर्णत्वाला पोहचला. पैगंबर मुहम्मद (स.) यांना ईश सत्यधर्माचा प्रचार करत असता ज्या कठीण अवस्थेतून (पडाव) आणि परिस्थितीतून जावे लागले त्या सर्वांचे विवरण पवित्र कुरआनने सामावून घेतले. पवित्र कुरआनच्या अध्ययनाने आम्हाला सहजच ज्ञात होऊ शकते की ज्या आदर्श इस्लामी आंदोलनाचा प्रारंभ पैगंबर मुहम्मद (स.) यांनी केला होता, तो कोणकोणत्या परिस्थितीतून प्रवास करीत कशा प्रकारे सफलतेच्या अंतिम पडावावर पोहचला? एकेश्वरत्वाची समता, न्याय, विश्वबंधुत्व शांतीची ज्योत प्रज्वलित करणारी ईशसत्ता मनुष्याच्या प्रतिनिधित्वात (पैगंबर) स्थापित झाली. अल्लाहचे कथन सत्य सिद्ध झाले

आणि असत्य तोंडघशी पडले. (अनादरित झाले) सत्य आले आणि असत्य संपले आणि असत्य तर नष्ट होण्यासाठीच असते. हे दृष्य जगाने उघड्या डोळ्यांनी बघितले. पवित्र कुरआन सत्यमार्गी प्रवाशी तांड्याच्या यात्रेचा पूर्ण वृत्तांत आहे. हा तो तांडा (काफिला) आहे. जो पैगंबर मुहम्मद (स.) यांच्या नेतृत्वात सत्य मार्गाचा प्रवास आरंभ करतो आणि अंततः आपले लक्ष्य प्राप्त करतो. पवित्र कुरआन केवळ विवरणच नव्हे तर ईश साहित्याचा ग्रंथरत्न आहे, जो स्वतःच आपले उदाहरण आहे. याच्यासमान कोणतेही साहित्य प्रस्तुत करणे तर फार दूरचे मनुष्याला तर हे सामर्थ्यही प्राप्त नाही की पवित्र कुरआनच्या वाङ्मय (साहित्यिक) सुंदरतेचे पूर्ण वर्णनही करू शकेल आणि त्याच्या अथांग व उच्चतम भावार्थाचा अंदाज लावणेही त्याला शक्य नाही.

## ३) सुरक्षित ग्रंथ

पवित्र कुरआन अगदी आपल्या मूळ स्वरूपात जसा अवतरित झाला होता अगदी तसाच काना-मात्राचाही बदल न होता उपलब्ध आहे. कारण या ग्रंथाच्या सुरक्षिततेची जबाबदारी अल्लाहने स्वतः घेतली आहे.[१] आणि म्हणूनच याचा कोणताही भाग लुप्त अथवा दूषित होण्याची संभावना मुळीच नाही. याच्या प्रामाणिकतेविषयी आवाहन करता येणार नाही. सर विल्यम म्युर इस्लामविरोधक असूनही हे मान्य करण्यास बाध्य होतो की आज जो पवित्र कुरआन आमच्या हातात आहे तो अक्षरशः तोच आहे जो पैगंबर मुहम्मद (स.) यांनी प्रस्तुत केला होता.

## ४) सर्वात जास्त वाचला जात असलेला ग्रंथ

जगात पवित्र कुरआनच्या इतके वाचण्यात येणारे दुसरे कोणतेही पुस्तक नाही. याच्या वारंवार अध्ययनाने वाचनाचा रस कमी होण्याऐवजी वाढतो आणि हे वैशिष्ट्य दुसऱ्या कोणत्याही ग्रंथाला प्राप्त नाही. आम्ही जितके त्याच्या जवळ जाऊ तितके जास्त सान्निध्य (आसक्ती) व जवळीक वाढत जाते. याचा सूर इतका प्रभावी आहे की केवळ मस्तिष्कच नव्हे तर आत्माही संम्मोहित होतो. याच्या स्वरमाधुर्यात व त्यातील संगीतमयता आमच्या सौंदर्यबोधाला तृप्त करण्यास बहुमूल्य सामग्री आहे. यामध्ये चित्र चित्रण आणि सुक्ष्म व अदृष्य भाव व तथ्यांना चित्रित करण्याची जी अप्रतिम शक्ती आहे तिचे दुसरे उदाहरण दुर्लभ आहे. तात्पर्य एक समुद्र आहे जो कोणत्याही अडथळ्याविणा वाहतो आहे; एक स्वर आहे ज्याच्या संगीत सौंदर्यात संपूर्ण जग मग्न झालेले दिसते.

---

१) दिव्य कुरआन - १५ : ९

## ५) जीवनभाषा

या ग्रंथाची भाषा जिवंत आणि श्रेष्ठ भाषा आहे. अरेबिक देशाची राष्ट्रीय भाषा आहे. पवित्र कुरआन सुस्पष्ट अरबी भाषेत अवतरित झाला आहे. यात गूढता तर आहे परंतु हा ग्रंथ कोडे कदापिही नाही. याला एक खेडूतही वाचू शकतो व त्याला कोणत्याही पेचात पडल्यासारखे होणार नाही. याचे अध्ययन एक चिंतक, दार्शनिक व साधारण व्यक्तीही करू शकतो आणि त्याला हाच ग्रंथ त्याच्या स्तरापेक्षा उच्च स्तराचा भासेल. ही विशिष्टता (एकाच वेळी ग्रामीण आणि दार्शनिक दोघांनाही तृप्त करण्याची समान क्षमता बाळगणारा) अन्य कोणत्याही ग्रंथाला अथवा पुस्तकाला प्राप्त नाही. केवळ पवित्र कुरआनलाच हे वैशिष्ट्य प्राप्त आहे की जनसामान्य आणि शिक्षित व दार्शनिक, चिंतक सर्वांसाठी समान लाभकारी आहे. प्रत्येक जन आपल्या बौद्धिक क्षमतेनुसार यापासून लाभान्वित होऊ शकतो.

हा ग्रंथ आपल्या अद्भूत वर्णनशैली व शब्दावली आणि वाक्यसंयोजनात एक असा अथांग मर्मगर्भित आहे, जे सुयोग्य लोक आहेत तेच त्या मर्मापर्यंत पोहचतात आणि अशा लोकांच्या दृष्टीला तेथपर्यंत जाण्याची अनुमती अल्लाहकडूनच प्राप्त होते. साधारण वाचकांना याची मुळीच खबर होत नाही. ते ग्रंथाचा पाठ करीत पुढे निघून जातात. त्यांना पवित्र कुरआन आपल्या बुद्धी व समज यांच्या अनुकूल प्रतित होतो. आणि त्यांच्यासाठी हेच योग्यही आहे कारण ते रहस्य आणि तत्त्वज्ञान त्यांच्या आकलन शक्तिच्या बाहेर आहे. जर पवित्र कुरआनने या तत्त्वज्ञानाला स्पष्ट शब्दांत प्रस्तुत केले असते तर ज्या लोकांचे बौद्धिक स्तर त्या पातळीचे नाही आणि जे अनुभवहीन आहेत, अर्थातच त्यांचे ज्ञानबोध त्या सूक्ष्मतम तथ्यांच्या आधारे त्यांचे मूल्यांकन त्यांच्यासाठी एक समस्या ठरली असती.

पवित्र कुरआनच्या अवतरणाला बराच काळ लोटला आहे, परंतु आजही त्याचे वाङ्मय ज्या उच्च आदर्शावर आहे. त्या साहित्यिक मूल्याच्या दृष्टीने कोणतेही पुस्तक त्याच्या जवळ पोहचण्याचेही धाडस करू शकला नाही. समानतेचा तर प्रश्नच नाही. यद्यपि इतक्या दीर्घकाळात भाषा बदलून त्याचे वाङ्मयही आपले स्वरूप बदलून टाकते. पवित्र कुरआनच्या व्यतिरिक्त कोणतीही भाषा अथवा पुस्तक असे नाही जे साहित्यिक गुण, म्हणी, व्याकरण आणि शब्दप्रयोगच्या दृष्टीने एकाच थाटात व

भव्यतेने कायम आहे. पवित्र कुरआनमध्ये एकच विषय वारंवार येतो परंतु प्रत्येक वेळेस नवीन व भिन्न वर्णनशैली असते. यामुळे पुनरावृत्तीचा दोष निर्माण होत नाही. उलट प्रत्येक वेळी तोच विषय एक नवीन विषय वाटतो. प्रत्येक वेळेस एकाच विषयाचा कोणता न कोणता नवीन अंश घेऊन समोर येत असतो त्यामुळे त्याची टवटवी व आधुनिकता सतत कायम राहते आणि वाचकाला विटण्याचा (कंटाळण्याचा) आभासही होत नाही.

## ६) विरोधाभासापासून मुक्त

हा ग्रंथ वैचारिक, ज्ञानात्मक आणि प्रत्येक दृष्टीने विरोधाभासापासून मुक्त आहे. यामध्ये विसंगती आढळून येत नाही. अप्रासंगिक गोष्टीपासून हा ग्रंथ सुरक्षित आहे. यामध्ये कोणतीही चूक अथवा दोषाची मुळीच संभावना नाही. हा ग्रंथ शाब्दिक अथवा अर्थसंबंधी कोणत्याही दोषापासून पूर्णपणे विरक्त आहे. या ग्रंथाचा साहित्यिक स्तर (वाङ्मय) कोठेही खालावलेला दिसत नाही.

## ७) तथ्यानुकूल (सत्याच्या अनुकूल)

पवित्र कुरआनचा जो विषय आहे त्याने या संपूर्ण विश्वाला अगदी आरंभापासून त्याच्या अंतापर्यंत आपल्या कक्षेत (परिधि) घेतले आहे. त्याने तथ्याच्या रूपात वर्णिलेली कोणतीही गोष्ट आजतागायत असत्य सिद्ध झालेली नाही. तो जग आणि मानव यांच्याविषयी जी धारणा प्रस्तुत करतो, त्यांच्यावर प्रत्येक दृष्टीने प्रकाश टाकतो, यामध्ये कोणत्याही पैलूने कमतरता भासत नाही. दर्शन समस्या असो की सामाजिक सर्वांचे उत्तर यात मिळेल. याद्वारे एक दोषरहित संग्रहात्मक व्यापक दर्शन समोर उभे राहते. सोबतच तो आमच्या व्यावहारिक जीवनातही आमचे मार्गदर्शन करतो. आजपर्यंत ते अत्यंत बुद्धीसंगत, न्याययुक्त आणि लाभकारी ठरले आहे.

## ८) अनुपम शैली

पवित्र कुरआनची भाषा व त्याची शैली ही पैगंबर मुहम्मद (स.) यांची भाषा व शैलीपासून वेगळी आहे. यद्यपि पैगंबर मुहम्मद (स.) यांची भाषा उच्च स्तराची आणि अत्यंत सरस व अर्थगर्भित आहे. परंतु पवित्र कुरआनची भाषा, त्याचे वाङ्मय आणि ज्ञानात्मक श्रेष्ठता इतकी अनुपम आहे की कोणत्याही व्यक्तीला तेथपर्यंत पोहचणे केवळ

अशक्यच नव्हे तर सर्वथा असंभव आहे. स्वत: पैगंबर मुहम्मद (स.) बोलत असता किंवा प्रवचन करत असताना पवित्र कुरआनचा अंश उद्धृत करायचे तेव्हा दोन्ही भाषेतील अंतर अगदी स्पष्ट कळत असे. काही अज्ञानी लोकांच्या या विकृत विचाराला मान्य केले की पवित्र कुरआन पैगंबर मुहम्मद (स.) यांची वाणी आहे, तर मग पर्यायाने हे मान्य करावे लागेल की आपल्या दोन भाषाशैली होत्या. अर्थात आपल्या प्रबोधनात अथवा दैनंदिन व्यवहारात जेव्हा ईशवाणी प्रस्तुत करायचे तेव्हा तिची शैली आणि स्तर अगदी भिन्न वापरायचे जी आपल्या सामान्य स्थितीतील भाषाशैलीशी सुसंगत नाही.

विचारात्मक बाब ही आहे की काय हे कधी संभव झाले आहे अथवा होऊ शकते की एक व्यक्ती आकाश व पाताळाचे अंतर असलेल्या दोन भाषा ज्यांचे स्तर व शैलीही भिन्न आहे त्या एक, दोन दिवस नव्हे तब्बल २३ वर्षापर्यंत अशा प्रकारे वापरतो की कधी कोणाला किंचीतही संशय होत नाही? असत्य आणि षड्यंत्र हे प्रगट झाल्याशिवाय राहत नाही.

## ९) ज्ञानभंडार

पवित्र कुरआन ज्ञानाचे भांडारगृह होय. इतिहास, दर्शनशास्त्र, मनोविज्ञान, जीव-विज्ञान, खगोलशास्त्र इत्यादी सर्व विषयांसंबंधी सविस्तर विवरण यात आढळून येते. पैगंबर (स.) यांचा काळ तर सोडा आजच्या प्रगतीशील आधुनिक युगातही ज्ञानाचे इतके भव्य भांडार (तेही तथ्यानुकूल) कोणाजवळही उपलब्ध नाही. पवित्र कुरआन स्वत:ला 'मुहैमिन'[१] म्हणतो. 'मुहैमिन' या शब्दाचा अर्थ होतो, रक्षक, साक्षी, समर्थक, अमानतदार अर्थात पवित्र कुरआन रक्षक आहे या पूर्वीच्या ईशग्रंथांची त्या ग्रंथातील ईशशिकवणीला अथवा संदेशाला पवित्र कुरआनने आपल्या अंतर्गत सामावून सुरक्षित केले. पूर्व ग्रंथाचा जो अंश आज उपलब्ध आहे, पवित्र कुरआन त्याची पुष्टी करतो. म्हणजे तो साक्ष आहे, या ग्रंथातील संदेशाला मानवी विचारांच्या संगतीमधून वेगळे करून पवित्र कुरआनने त्यांना सुरक्षित केले. पवित्र कुरआन रक्षक आहे. म्हणून पूर्ववत पुस्तकातील ईशसत्य आता नष्ट होऊ शकणार नाही. कारण त्यांना पवित्र कुरआनचे सुरक्षित कवच प्राप्त झाले.

---

१) दिव्य कुरआन, ५ : ४८

## १०) संपूर्ण मानवतेसाठी

पवित्र कुरआन समस्त मानवजातीला संबोधित करतो, कारण त्याचे आगमन सर्व मनुष्यांच्या मार्गदर्शनासाठीच झाले आहे. त्याने मानवाला सत्य धारणांचे ज्ञान देऊन त्यांनाच स्वीकारण्यास बजावले. जगातील प्रत्येक देश, जाती-संप्रदाय सर्वांसाठी सर्वसमयी समान रूपाने व्यावहारिक व प्रत्येक मनुष्याच्या व्यक्तीगत व सामाजिक कल्याणाची हमी देणारे नैतिकतेचे सिद्धांत आणि जीवनाचे नियम, कायदे तसेच विधिविधान याचे विवरण म्हणजेच पवित्र कुरआन होय. तात्पर्य पवित्र कुरआनची प्रत्येक शिकवण 'सार्वभौमिक' ही आहे व 'सर्वकालिक'ही आहे. पवित्र कुरआनची घोषणा ही आहे,

"वास्तविकत: हा तर सर्व जगवासियांसाठी एक उपदेश आहे."

(दिव्य कुरआन, ६८ : ५२, ८१ : २७)

## ११) संग्राहक ग्रंथ

पवित्र कुरआनची एक विशिष्टता ही आहे की त्याने त्या सर्व तथ्यांना, ज्ञान आणि तत्त्वदर्शितेला एकत्र केले जी यापूर्वीच्या ईशग्रंथात वर्णिली होती. आता कोणत्याही पुस्तकातून असे सत्य आणि कल्याणकारी ज्ञानबोध कोणी प्रस्तुत करू शकत नाही, ज्याचा उल्लेख पवित्र कुरआनने केला नसावा. तात्पर्य, पवित्र कुरआन असा संग्राहक ग्रंथ आहे की मनुष्याला अन्य पुस्तकाची अथवा ग्रंथाची अनिवार्यताच राहिली नाही. पूर्वकालिक ईशग्रंथ आमच्या हातात का नाहीत याचा खेद मनुष्याला आता मुळीच नसावा. त्याच्या याच विशिष्टतेमुळे त्याला 'मुहैमिन' (रक्षक) म्हटले आहे. पवित्र कुरआनच्या रूपात पूर्वकालिक सर्व ईशग्रंथ सुरक्षित झाले. (जे पूर्वग्रहाने दूषित नाही, द्वेष व कपट यापासून सुरक्षित आहे आणि ज्यांची नैतिक चेतना जागृत आहे त्यांना पवित्र कुरआन आपलाच ग्रंथ वाटेल यात कोणतीही शंका नाही.)

## १२) ईशशिकवणींची सुधारित आवृत्ती

पवित्र कुरआनपूर्वी अवतरित ईशग्रंथ त्या त्या जाती-संप्रदायाच्या मार्गदर्शनापुरते सीमित होते आणि म्हणून या ग्रंथांमध्ये काही शिकवणी प्रचलित काळ व परिस्थितीनुसार होत्या ज्या अल्पकालिक होत्या. परंतु पवित्र कुरआन संपूर्ण जगासाठी व प्रत्येक युग व काळामध्ये अनुकूल सिद्ध व्हावे. म्हणून यात काही शिकवणी अशाही आहेत ज्या यापूर्वीच्या ग्रंथात नव्हत्या. कारण हा ग्रंथ संपूर्ण विश्वासाठी आणि प्रलयापर्यंत मार्गदर्शनास

उपयुक्त रहावा म्हणून काही नवीन शिकवणीही यात समाविष्ट करण्यात आल्या. परंतु ते आदेश असहजातीय आहेत, असे मुळीच म्हणता येणार नाही. ते आदेश सत्य-धर्माच्या अंतर्मना (आत्मा) विरुद्ध कदापिही नाहीत. तात्पर्य हेच की, पवित्र कुरआन ईशआदेशाची सुधारित आवृत्ती आहे. कारण यात पूर्वीच्या ग्रंथातील सर्व ईशआदेशांव्यतिरिक्त काही नवीन आदेशही आहेत अर्थात ही प्रलयापर्यंत कायम राहणारी सुधारित आवृत्ती होय.

## १३) एक विशिष्ट गुण

पवित्र कुरआन आज जगाच्या सर्वच जाती-संप्रदायांची मूलभूत आवश्यकता आहे. पवित्र कुरआन अकारण हे आव्हान करत नाही की लोकांनी त्याच्यावर दृढ विश्वास (इमान) बाळगून त्याला जीवनाची आचारसंहिता बनवावे. त्याचे हे आमंत्रण त्या जाती-संप्रदायांनाही आहे, ज्यांच्याजवळ ईशग्रंथ आहे आणि जे असा दावा करतात त्यांनाही पवित्र कुरआन सांगतो की त्याच्यावर गाढ श्रद्धा बाळगा (इमान स्वीकारा) आणि पवित्र कुरआनच्या आदेशाचे पालन करा. याचे कारण अगदी स्पष्ट आहे, ज्यांच्याकडे पूर्वीची ईशग्रंथ आहेत ते आपली प्रामाणिकता सिद्ध करण्यात असमर्थ आहेत. आता त्यांच्या प्रामाणिकतेला सिद्ध करण्यास पवित्र कुरआनशिवाय दुसरा पर्याय नाही. पवित्र कुरआनच त्यांना पूर्णता बहाल करू शकतो. त्या पुस्तकातील सत्याच्या रोपट्याला अनुचित हस्तक्षेपामुळे अवांछित काटेरी झाडे-झुडपांनी अशा प्रकारे वेढले आहे की पवित्र कुरआनच्या प्रकाशाशिवाय ईशआदेश ईश्र्वरी हस्तक्षेपापासून वेगळे करणे असंभव आहे. अंतिम ईशग्रंथ पवित्र कुरआनच सांगू शकतो की त्यात सत्याचा अवशेष किती आहे आणि असत्याचा समावेश किती आणि कोठे केला गेला आहे. पवित्र कुरआनची स्पष्टोक्ती,

"हे ग्रंथधारकांनो! आमचा पैगंबर तुमच्यापाशी आला आहे जो दैवी ग्रंथातील पुष्कळशा त्या गोष्टी तुमच्यासमोर स्पष्ट करीत आहे ज्यावर तुम्ही पडदा टाकीत आहात आणि तुमच्या कित्येक गोष्टी माफही करतो. तुमच्यापाशी अल्लाहकडून प्रकाश आणि एक असा सत्यदर्शी ग्रंथ आला आहे, ज्याच्याद्वारे सर्वश्रेष्ठ अल्लाह त्या लोकांना जे त्याच्या प्रसन्नतेचे इच्छुक आहेत, शांती व सुरक्षिततेच्या पद्धती दाखवितो आणि आपल्या आदेशाने त्यांना अंधारातून बाहेर काढून प्रकाशाकडे आणतो आणि सरळ मार्गाकडे त्यांचे मार्गदर्शन करतो." (दिव्य कुरआन, ५: १५-१६)

## १४) सत्य ग्रंथ

पवित्र कुरआनांची एक विशेषता ही आहे की तो सत्य आहे सत्यच राहणार,

"हे पैगंबर (स.), ज्ञान राखणारे चांगलेच जाणतात की जो काही तुमच्या पालनकर्त्याकडून तुमच्यावर अवतरला गेला आहे तो पूर्णपणे सत्य आहे आणि प्रभुत्वसंपन्न व स्तुत्य ईश्वराचा मार्ग दाखवितो." (दिव्य कुरआन, ३४ : ६)

ईशवाणीच्या या स्पष्टोक्तीने स्पष्ट आहे की पवित्र कुरआन सत्य असल्यामुळे सत्याच्या सर्व विशेषता त्यात विद्यमान आहेत. ईशमार्ग प्रस्तुत करणारा पवित्र कुरआन ईशवाणी आहे, अंतः सत्य तेच आहे. सौंदर्य, तेजस्विता, प्रकाश इत्यादी सर्व विशेषता सत्याची लक्षणे असून पवित्र कुरआन यांनी परिपूर्ण आहे. तो कोणत्याही परिस्थितीत असत्याचे समर्थन करीत नाही. असत्याशी त्याचा दूरचाही संबंध नाही. वास्तविक असत्याचे समर्थन उदारता नसून लोकांना पथभ्रष्ट करणे होय आणि यापेक्षा मोठे दुसरे कोणतेही पापकर्म नाही. पवित्र कुरआन सांगतो,

"हे ते लोक आहेत ज्यांच्यासमोर उपदेशवाणी आली तर यांनी ती मानण्यास नकार दिला, परंतु वस्तुस्थिती अशी आहे की हा एक जबरदस्त ग्रंथ आहे, असत्य समोरूनही याच्यावर येऊ शकत नाही आणि पाठीमागूनसुद्धा. ही एका बुद्धिमान व स्तुत्यकडून अवतरलेली वस्तू आहे." (दिव्य कुरआन, ४१ : ४१-४२)

# अध्याय ११

# ग्रंथधारकांची[१] कुचेष्टा आणि पवित्र कुरआनची प्रतिक्रिया

बायबलमध्ये पैगंबरांशी संबंधित ज्या घटनांचे विवरण आले आहे त्यात अनेक गोष्टी अशा आहेत ज्या मनात सलत असतात आणि सत्य कळणे दुर्मिळ होते. बायबलने काही पैगंबरांच्या चरित्राला अशा प्रकारे रेखाटले आहे की त्याचा पैगंबरांची प्रतिष्ठा आणि पवित्रतेशी काडीमात्रही संबंध होऊ शकत नाही. याव्यतिरिक्त कित्येक इस्राईली धारणा व विचित्रता आहेत. पवित्र कुरआन त्यांचे खंडण करून सत्य काय आहे ते प्रस्तुत करतो. अशा प्रकारे तो ईशग्रंथधारकांच्या धर्माधिकाऱ्यांचे अयोग्य (अनुचित) धाडस आणि कुचेष्टेवरून पडदा बाजूला सारून हे दाखवतो की मनुष्य जेव्हा पतित (मलिन) होतो तेव्हा तो किती खालपर्यंत जातो. त्याच्या या पतनाला कोणतीही सीमा राहत नाही. येथपर्यंत की तो आपल्याच महापुरुषांच्या व पूर्वजांच्या प्रतिष्ठेशी खेळण्यासही चुकत नाही. केवळ इस्राईली इतिहासातच नव्हे तर अन्य लोकसमुहातही हा अपराध व हे मानवी पतन दिसून येते. आवश्यकता केवळ संशोधन आणि काळजीपूर्वक अध्ययन व मनन करण्याची आहे, इस्राईली धर्मगुरुंनी आपल्या महापुरुषांसोबत केलेल्या अन्यायाची काही उदाहरणे प्रस्तुत करीत आहोत की, त्यांनी केलेल्या चरित्र्यहन्नाच्या घाणीला त्यांच्या महापुरुषांच्या अंगरख्यावरून पवित्र कुरआनने कशा प्रकारे स्वच्छ केले.

## पहिले उदाहरण

बायबलमध्ये रचलेल्या काल्पनिक कथेनुसार अल्लाहने पृथ्वी व आकाशाला सहा दिवसांत बनवून सातव्या दिवशी विश्राम केला. (उ.२/२) ख्रिस्ती पादरींना जेव्हा आपल्या चुकीचा आभास झाला, तेव्हा बायबलच्या उर्दू अनुवादामध्ये 'विश्राम केला' या शब्दाच्या जागी 'फारिग हुवा' (काम करून मोकळा झाला.) लिहले. परंतु किंग जेम्सची (Revised Standard Version ) प्रामाणिक इंग्रजी बायबलमध्ये हे शब्द आहेत,

"And he Rested on the seventh day" (आणि अल्लाहने ७ व्या दिवशी आराम केला.) इसवी सन १९२४ मध्ये ज्यू लोकांनी बायबलचा जो अनुवाद

---

१) यहुदी (ज्यू) आणि ईसाई

प्रकाशित केला त्यातही हेच शब्द आले आहेत. बायबलच्या अरबी अनुवादातही हेच आहे की त्याने सातव्या दिवशी विश्रांती घेतली.

बायबलच्या उपरोक्त कथनानुसार ईश्वराला काम करून थकवा येतो आणि विश्रामाची गरजही असते. वास्तविक हे ईशगुणाच्या अगदी विपरीत आहे. पवित्र कुरआन बायबलच्या या चुकीकडे संकेत करून स्पष्ट करतो,

"आम्ही पृथ्वी व आकाशांना आणि त्यांच्या दरम्यानच्या साऱ्या वस्तूंना सहा दिवसांत निर्माण केले. आणि आम्हाला थकव्याने स्पर्शसुद्धा केला नाही."

(दिव्य कुरआन, ५० : ३८)

## दुसरे उदाहरण

बायबलमध्ये आहे,

"जेव्हा मूसा, हारून, नादाब, अबीहू आणि इस्राईली यांचे सत्तर धार्मिक वृद्ध वर गेले आणि इस्राईलच्या परमेश्वराचे दर्शन घेतले; त्याच्या चरणाखाली नीलमणीचा चबुतरासारखे काही होते, जो आकाशासमान स्वच्छ होता. त्याने इस्राईलीयांच्या प्रधानावर हात वाढविला नाही, तेव्हा त्यांनी परमेश्वराचे दर्शन केले आणि खाल्ले-व-प्याले."

(निर्गमन २४ : ९,११)

याच निर्गमन पुस्तकात पुढे नमूद आहे,

"मूसाने म्हटले, मला आपला तेज (दीप्ती, चमक) दाखव. प्रभूने सांगितले, मी तुझ्यासमक्ष चालत-चालत तुला माझी सर्व भलाई दाखविल, आणि तुझ्या सन्मुख प्रभुनामचा प्रचार करेन. ज्याच्यावर मी कृपा करू इच्छिल, त्यावरच मी कृपा करेन आणि ज्याच्यावर मी दया करू इच्छिल, त्याच्यावर मी दया करेन. मग त्याने पुढे सांगितले, तू माझ्या मुखाचे दर्शन घेऊन जिवंत राहू शकत नाही."

(निर्गमन ३३ : १८-२०)

ईशदर्शनाविषयी बायबलचा विरोधाभास स्पष्ट आहे. एकीकडे तो सांगतो की, इस्राईली यांच्या ७० धार्मिक वृद्धांनी उघड्या डोळ्यांनी अल्लाहचे दर्शन केले आणि दुसरीकडे हे सांगत आहे की आदरणीय मूसा (अ.) यांच्या याचनेवर अल्लाहने सांगितले, तुम्ही माझ्या चेहऱ्याचे दर्शन करू शकत नाही, कारण दर्शन करून मनुष्य जीवित राहू शकत नाही. अर्थात मनुष्यामध्ये ती शक्ती नाही की तो अल्लाहचे तेज (चमक) व सौंदर्याला सहन करू शकेल. या संबंधात पवित्र कुरआन निर्णायकाच्या

भूमिकेत समोर येतो आणि सांगतो की सांसारिक जीवनात अल्लाहला उघड्या डोळ्यांनी बघणे संभवच नाही. आदरणीय मूसा (अ.) यांच्या याचनेवर अल्लाहने हेच सांगितले होते की तुम्ही मला बघू शकत नाही. पवित्र कुरआनची साक्ष,

"जेव्हा तो आमच्या ठरविलेल्या समयी पोहोचला आणि त्याच्या पालनकर्त्याने त्याच्याशी संभाषण केले, तेव्हा त्याने विनंती केली की, "हे पालनकर्त्या! मला सक्षम दृष्टी दे की मी तुला पाहावे." त्याने फर्माविले, "तू मला पाहू शकत नाहीस."

(दिव्य कुरआन, ७ : १४३)

अर्थात सांसारिक जीवनात मनुष्याला अशी शक्ती आणि सामर्थ्य प्रदानच करण्यात आले नाही की उघड्या डोळ्यांनी तो ईश्वराला बघू शकेल. मनुष्याची परीक्षा यामध्येच आहे की त्याने परोक्षात राहून ईश्वराच्या अस्तित्वाचा स्वीकार करावा. कारण त्याच्या अस्तित्वाचे प्रमाण या सृष्टीत विखुरलेले आहे. मनुष्याचे स्वत:चे व्यक्तीत्वही ईश्वराच्या अस्तित्वाचे स्पष्ट प्रमाण आहे. उघड-उघड अल्लाहला बघण्याची मागणी करणे त्याच्या प्रतिष्ठेचा अपमान होय. पवित्र कुरआन सांगतो, अशा अयोग्य साहसामुळे लोक ईशप्रकोपात ग्रस्त झाले.

"आठवण करा जेव्हा तुम्ही मूसाला सांगितले होते की, आम्ही तुमच्या सांगण्यावर कदापि विश्वास ठेवणार नाही जोपर्यंत आमच्या डोळ्यांनी उघडपणे अल्लाहला (तुझ्याशी बोलताना) पाहात नाही. त्यावेळी एका कडकडाटाने तुम्हाला गाठले"

(दिव्य कुरआन, २ : ५५)

## तिसरे उदाहरण

बायबलमध्ये आहे,

"आणि प्रभुने बघितले की मनुष्याचे दुष्कर्म पृथ्वीवर वाढले आहे आणि त्याच्या मनात जे विचार येतात ते सतत वाईटच असतात आणि प्रभुला पृथ्वीवर मनुष्याला निर्माण करून पश्चात्ताप होतो आहे आणि मन अतिशय दु:खी झाले. तेव्हा प्रभुने सांगितले, मी ज्या मनुष्याची रचना केली त्याला पृथ्वीवरून नष्ट करून देईन. काय मनुष्य, काय पशु, काय रेंगणारे जंतु, काय आकाशाचे पक्षी, सर्वांना नष्ट करून देईन. कारण मला त्यांच्या बनविण्याचा पश्चात्ताप होतो आहे." (उत्पत्ति ६ : ५-७)

"आणि (आठवण करा) जेव्हा तुमच्या पालनकर्त्याने दूतांना सांगितले की, "मी पृथ्वीवर एक खलीफा (माझा प्रतिनिधी) बनविणार आहे." (तेव्हा त्या दूतांनी) विचारले,

"काय, तू धरतीच्यामध्ये त्याला बनविणार आहेस, जो हिच्यामध्ये अनाचार घडवील आणि रक्तपात करील? (पण) आमच्याकडून तर तुझे स्तवनासह गुणगान होत आहे, पावित्र्यगान होत आहे. (तेव्हा अल्लाह) म्हणाला, "मी जाणतो जे तुम्ही जाणत नाही."

(दिव्य कुरआन, २ : ३०)

पवित्र कुरआनमध्ये आहे की, "अल्लाहला आरंभापासून अंतापर्यंत प्रत्येक वस्तूचे ज्ञान आहे. तो कोणत्याही वस्तूपासून अनभिज्ञ नाही. कोणतीही वस्तू अशी नाही जी त्याच्या ज्ञान-कक्षाच्या बाहेर आहे. आपल्या कोणत्याही कार्याचा त्याला पश्चात्ताप होतो याचा तर प्रश्नच निर्माण होत नाही. पवित्र कुरआन मध्ये आहे,

"आणि आपल्या (या कृत्याच्या) कोणत्याही दुष्परिणामाची कोणतीही भीती नाही."

(दिव्य कुरआन, ९१ : १५)

## चौथे उदाहरण

इसाई धर्मात अशा अनेक गोष्टी प्रचलित झाल्या ज्या सत्याच्या सर्वथा विरुद्ध आहेत.

पवित्र कुरआनमध्ये इसाई लोकांच्या काही मौलिक धारणांचा उल्लेख करून स्पष्ट केले की त्या सत्याच्या सर्वथा प्रतिकूल आहेत. इस्राईल संप्रदायातून निघालेली एक शाखा इसाई संप्रदाय होय. आदरणीय इसा (अ.) चे आरंभिक अनुयायी त्यांना केवळ पैगंबर मान्य करायचे आणि आदरणीय मूसा (अ.) या पैगंबरांनी आणलेल्या शरीयत (धर्मशास्त्र) वर आचरण करीत असत. यहुदी (ज्यू) लोकांशी त्यांचे मतभेद केवळ यासाठी होते की ते आदरणीय इसा (अ.) यांना पैगंबर मान्य करण्यास (त्यांच्यावर इमान ठेवण्यास) तयार नव्हते. यद्यपि इसाई त्यांना अल्लाहचा पैगंबर मानायचे. जेव्हा सेंट पॉल मसीही संप्रदायात दाखल झाला तेव्हा त्याने मसीही धर्माचा प्रचार रोमी, यूनानी आणि इस्त्राईलितरांमध्ये आरंभ केला. यासाठी त्याने इसाई धर्माला अक्षरशः विकृत करून टाकले. त्याने पवित्र दर्शन (Vision) आणि अद्‌भूत (अलौकिक) संकेताच्या आधारावर एक नवा धर्म अविष्कृत केला. त्याने यहुदी शरीयतलाच निरस्त (रद्द) केले. त्याने मसीह हे ईश्वर आणि ईशपुत्र होण्याच्या धारणेला प्रचलित केले. मसीहने फासावर लटकून आपल्या प्राणाच्या आहुतीने आदम संततीसाठी जन्मजात प्रायश्चित बनले. मसीहच्या आरंभिक अनुयायांनी या गोष्टींचा विरोध केला. परंतु पॉलच्या निरंतर वाढत्या अनुयायांच्या संख्येपुढे या विरोधकांचा जोर (प्रतिकार) निष्क्रिय ठरला. तरीही तिसऱ्या शताब्दीच्या अंतापर्यंत अनेक असे

लोक होते जे मसीह ईश्वरत्वाच्या गुणाने युक्त असत्याच्या पॉलच्या प्रस्तुत केलेल्या धारणला नाकारायचे. परंतु चौथ्या शताब्दीच्या आरंभिक काळात (३२५ इसवी.) निसीयाच्या कॉन्सीलने पॉलच्या घडलेल्या धारणेला इस्राईलचा स्वीकृत धर्म घोषित केला. रोमी राज्याच्या सम्राटने इसाई धर्माचा स्वीकार केल्यावर कालांतराने राज्याचा राजकीय (सरकारी) धर्म म्हणून मान्यता प्राप्त झाली.

पहिल्या तिन्ही इंजील (मत्ता, मरकुस, लुका)मध्ये कोठेही हा आभास होत नाही की या इंजील लिहणाऱ्या मसीहला 'मनुष्या'शिवाय काही वेगळा समजत होता. या इंजिलचे लेखक मसीहला अल्लाहचा विशेष कृपापात्र मनुष्य समजत होते, जो ईश्वराशी अखंड संबंध ठेवत असे. मत्ता आणि मरकुसच्या इंजीलमध्ये मसीहसाठी 'खुदावन्द (प्रभु)' शब्द प्रयुक्त झाला नाही. हा शब्द या इंजीलमध्ये ईश्वरासाठी अधिकताने प्रयुक्त झाला आहे. या इंजीलमध्ये ही कल्पित कथाही नाही की मसीहने मानवांच्या (गुन्ह्यांचा) पापाचे प्रायश्चित आपले प्राण देऊन केले. पवित्र कुरआन सांगतो,

"हे ग्रंथधारकांनो, आपल्या धर्मात अतिरेक करू नका. आणि अल्लाहशी सत्याखेरीज इतर कोणतीही गोष्ट जोडू नका. मसीह, मरयमपुत्र इसा याव्यतिरिक्त इतर काहीच नव्हता की तो अल्लाहचा एक पैगंबर होता. आणि एक आदेश होता की जो अल्लाहने मरयमकडे पाठविला. आणि एक आत्मा होता अल्लाहकडून (ज्याने मरयमच्या गर्भात मुलाचे रूप धारण केले) म्हणून तुम्ही अल्लाह व त्याच्या पैगंबरावर श्रद्धा ठेवा आणि असे म्हणू नका की, "तीन" आहेत. परावृत्त व्हा. हे तुमच्याच हिताचे आहे. अल्लाह तर फक्त एकच आहे. तो पवित्र आहे यापासून की त्याचा कोणी पुत्र असावा. पृथ्वी व आकाशांतील साऱ्या वस्तू त्याच्या मालकीच्या आहेत, आणि त्यांच्या पालनासाठी व देखरेखीसाठी केवळ तोच पुरेसा आहे. मसीह आणि निकटवर्ती ईशदूतांना तो (मसीह) अल्लाहचा दास असल्याबद्दल मुळीच संकोच वाटला नाही. जो कोणी (अल्लाहच्या) दास्यत्वास संकोच करण्यायोग्य गर्व करेल तर अल्लाह सर्वांना आपल्यासमोर हजर करण्याची वेळ लवकरच आणील.

(दिव्य कुरआन, ४ : १७१- १७२)

आदरणीय इसा (अ.) (पैगंबर येशू ख्रिस्त) यांना पवित्र कुरआनात 'कलिमा' म्हटले आहे. येथे कलिमा या शब्दाशी अभिप्रेत आदेश किंवा आज्ञा आहे. म्हणजे आदरणीय इसा (अ.) यांचे पिताविना जन्माला येण्याच्या रहस्याचे सत्याला स्पष्ट करीत सांगितले की हा अल्लाहचा आदेश होता की पुरुषाच्या विर्याशिवाय मरयम गर्भवती झाली, आणि आदरणीय इसा (अ.) यांचा जन्म झाला. परंतु युनानी दर्शनाने पथभ्रष्ट

होऊन इसाई लोकांनी 'कलिमे'ला कलाम अथवा वाणीचा समानार्थी समजून याला अल्लाहचे व्यक्तीगत गुण घोषित केले. मग या चुकीच्या गाभाऱ्यातून ही कल्पना जन्म घेते की अल्लाहच्या या व्यक्तीगत गुणाने मरयमच्या आत प्रवेश केला व शारीरिक रूप धारण करून अल्लाहचा व्यक्तीगत गुण 'मसीह'च्या रूपात प्रगट झाला. अशा प्रकारे इसाई संप्रदायात 'इसा' (अ.) यांचे ईशप्रभुत्वामध्ये संमिलित होण्याच्या धारणेने जन्म घेतला.

पवित्र कुरआनमध्ये इसा (अ.) यांना अल्लाहकडून एक 'रूह' म्हटले आहे. कुरआनचे या संदर्भातील स्पष्टीकरण असे आहे,

"शेवटी मरयमपुत्र इसाला स्पष्ट संकेत देऊन पाठविले. आणि पवित्र आत्म्याद्वारे त्याला मदत केली.." (दिव्य कुरआन, २ : ८७, २५३)

दोन्ही कथनाचा अर्थ हा आहे की अल्लाहने आदरणीय इसा (अ.) यांना वाईट अथवा दुष्प्रवृत्तीने विरक्त असा पवित्र आत्मा प्रदान केला. आपल्या या विशेषतेने त्यांच्या अनुयायांनाही सूचित करण्यात आले होते. परंतु त्यांनी अतिशयोक्ति करीत अल्लाहकडील एका आत्म्याला प्रमुख (तथ्यत:) ईशआत्मा घोषित केले आणि पवित्र आत्माचा हा अर्थ घेण्यात आला की तो ईश्वराचा स्वत:चा आत्मा (ईशात्मा) होता जो मसीहच्या आत प्रविष्ट झाला. अशा प्रकारे अल्लाह आणि मसीह व त्यांच्यासोबत तिसरा अल्लाह पवित्र आत्म्याला बनविण्यात आले. ही इसाई लोकांची दुसरी अतिशयोक्ती होती.

## पाचवे उदाहरण

पवित्र कुरआन सांगतो की सैतानाने आदरणीय आदम (अ.) व त्यांच्या पत्नी हव्वा यांना प्रलोभनाद्वारे धोका देऊन असे कार्य करण्यात प्रवृत्त केले, ज्यापासून अल्लाहने सक्तीने मनाई केली होती. अल्लाहचे हे सत्य 'बायबल' उत्पत्ति अध्याय ३ च्या कथनाचे खंडण करणारे आहे. बायबलच्या या कथनात आहे की सैतानाने आदरणीय आदम (अ.) यांना पसरविण्यास (आणि अल्लाहच्या आज्ञेशी अकृतज्ञ होण्यास) आदरणीय हव्वाला साधन बनविले. हव्वा सैतानाच्या धोक्यात आली आणि त्यांनी आदरणीय आदम (अ.) यांनाही त्या कामासाठी प्रेरित केले, ज्यापासून त्यांना अल्लाहने रोखले होते. परंतु पवित्र कुरआन अगदी स्पष्टपणे सांगतो की गुन्हा जर झाला आहे तर दोघेही जबाबदार आहेत असे मुळीच नाही की दोष केवळ स्त्रीचा आहे.

पवित्र कुरआनचे कथन,

"मग आम्ही आदमला सांगितले, "हे आदम, तू आणि तुझी पत्नी दोघेही स्वर्गामध्ये राहा आणि इथे मनसोक्त हवे ते खा. परंतु ह्या झाडाच्या जवळ जाऊ नका. अन्यथा तुम्ही अत्याचारी व्हाल." (पण) शेवटी शैतानाने त्यांना त्यापासून मार्गभ्रष्ट केले आणि ज्या स्थितीत ते होते तिथून बाहेर काढविले."

(दिव्य कुरआन, २ :३५-३६)

## सहावे उदाहरण

बायबलमध्ये आहे की जेव्हा आदरणीय नूह (अ.) या पैगंबरांच्या वेळेस तुफान आले होते. तेव्हा त्यामध्ये नूह, त्यांची पत्नी आणि त्यांची तीन मुले व मुलांच्या पत्न्यांव्यतिरिक्त कुणीही जलमग्न होण्यावाचून राहिला नाही. याप्रमाणे यानंतरचे मानववंश केवळ नूहचीच संततींपैकी आहे. (उ. ६/१८: ७/७ : ९/९ : ९/१९)

पवित्र कुरआन बायबलच्या या कथनाचे खंडण करतो आणि सांगतो की आदरणीय नूहच्या नावेत केवळ आदरणीय नूह (अ.) आणि त्यांची मुले व सुनाच नव्हे तर काही दुसरे आस्थावान लोकही होते, मग मानवसंततीला केवळ आदरणीय नूह (अ.) ची संतान घोषित करणे सत्य नाही. पवित्र कुरआन सांगतो,

"तुम्ही त्या लोकांचे वंशज आहात ज्यांना आम्ही नूह (अ.) सह नावेवर स्वार केले होते आणि नूह (अ.) एक कृतज्ञ दास होता." (दिव्य कुरआन, १७ : ३)

एका दुसऱ्या जागी पवित्र कुरआन सांगतो,

"हे ते पैगंबर आहेत ज्यांना अल्लाहने इनाम बहाल केले. आदम (अ.) च्या संततीपैकी, आणि त्या लोकांच्या वंशापासून ज्यांना आम्ही नूह (अ.) च्या समवेत नौकेत स्वार केले होते." (दिव्य कुरआन, १९ : ५८)

ज्यू लोकांनी पसरविलेल्या चुकीच्या सूचनाने प्रभावित होऊन अनेक इतिहासकार मनुष्यांच्या वंशावळीला आदरणीय नूह (अ.) च्या तीन मुलांपर्यंतच पोहचवतात.

प्राचीन इतिहास आणि नविन संशोधनाने पवित्र कुरआनच्या कथनाची पुष्टी होते. वर्तमान युगात आदरणीय नूह (अ.) यांच्या नावेचा सांगाडा शोधला आणि तो 'जूदी' या पर्वताच्या शिखरावर आढळला. पवित्र कुरआन नुसार आदरणीय नूह (अ.) यांची नाव 'जुदी' पहाडावर थांबली होती."

आज्ञा झाली, "हे पृथ्वी, आपले संपूर्ण पाणी गिळून टाक आणि हे आकाशा, थांब." यावर पाणी जमिनीत ओसरले, निर्णय लावण्यात आला, नौका जुदीवर ठेपली आणि म्हटले गेले की दूर झाला अत्याचाऱ्यांचा समूदाय.

(दिव्य कुरआन, ११ : ४४)

## सातवे उदाहरण

आदरणीय इब्राहीम (अ.) यांच्या जीवनवृतांतासंबंधित एक महत्त्वपूर्ण घटना अशी आहे की विरोधकांनी अग्निकुंडात फेकून आदरणीय इब्राहीम (अ.) यांना जाळण्याचा प्रयत्न केला, परंतु अल्लाहने त्यांची ही योजना उद्ध्वस्त केली याचप्रमाणे सम्राट नमरूद आणि आदरणीय इब्राहीम (अ.) यांच्या दरम्यान भरल्या दरबारात एक महत्त्वपूर्ण संवाद झाला होता. यामध्ये सम्राटला पराजित व्हावे लागले. तसेच ईशप्रसन्नतेसाठी आदरणीय इब्राहीम (अ.) यांना स्वदेश त्याग (हिजरत) करावी लागली होती. परंतु आश्चर्य हे आहे की या अत्यंत महत्त्वपूर्ण घटनांचा बायबल मध्ये कोठेही उल्लेख नाही.

पवित्र कुरआनने या सत्य घटनांचे वर्णन करून ज्यू (यहुदी) लोकांची निंदा केली की तुम्ही आपल्या पूर्वजांचे नाव तर मोठ्या अभिमानाने (गर्वाने) घेता, परंतु त्यांच्या जीवनातील घटना व त्यांच्या कार्याला, तसेच त्यांच्या जीवनपद्धतीला महत्त्व देत नाही.

बायबलने सांगितले की आदरणीय इब्राहीम (अ.)यांनी आपल्या ज्या मुलाला बलिदानासाठी अल्लाहच्या सेवेत प्रस्तुत केले होते ते आदरणीय इसहाक (अ.) होते. (उ. २२ / १-२) दुसरीकडे बायबल हेसुद्धा सांगतो की ही बलिदान आदरणीय इब्राहीम (अ.) यांच्या एकुलत्या एका पुत्राचे होते. (उ. १६ / १-४) वास्तविक आदरणीय इब्राहीम (अ.) यांचे एकुलते एक पुत्र इस्माईल होते इसहाक नव्हे पवित्र कुरआनने हा विरोधाभास दूर केला.

## आठवे उदाहरण

बायबलच्या कथनानुसार मिस्त्र सोडून जात असता, इस्त्राईली कुटुंबाच्या स्त्रिया व पुरुषांनी आपल्या शेजाऱ्यांचे दागिने मागून घेतले परंतु त्यांचा हा एक बहाणा मात्र होता. वास्तविक त्यांनी ज्यू लोकांना लुटले आणि रात्रीच तेथून प्रस्थान करून गेले. या अनैतिक कार्याला संपन्न करण्यात आदरणीय मूसा (अ.) यांनी त्यांना साथ दिली. कारण तशी शिक्षा अल्लाहकडून आदरणीय मूसा (अ.) यांना दिली होती.

पवित्र कुरआन बायबलच्या कथनाचे समर्थन करीत नाही. पवित्र कुरआनच्या दृष्टीत पैगंबरचरित्र आणि आचरण इतक्या उच्च पातळीवर असतात की त्यांच्याविषयी हा विचारसुद्धा केला जाऊ शकत नाही की पैगंबरी प्रतिष्ठेच्या प्रतिकूल कोणतेही अनैतिक कृत्य अथवा तशी योजना ते आखू शकतात.

अंत: बायबलच्या असत्य कथनाला कोणतेही प्रमाण देण्याची गरज नाही.

बायबल सांगतो,

"मग प्रभुने त्यांना (आदरणीय मूसा (अ.) यांना) हे पण सांगितले की आपले हात छातीवर ठेवून झाकून घे. तेव्हा त्याने हात छातीवर ठेवून झाकले. मग जेव्हा त्याने काढला (हात) तर काय बघतो की, त्याचा हात कुष्ठरोगामुळे बर्फासारखा पांढरा झाला आहे." (नि. ४/६)

पवित्र कुरआनने बायबलच्या असत्य कथनाचे खंडन करीत म्हटले,

"आणि जरा आपला हात आपल्या काखेत दाब, तळपत निघेल कोणत्याही त्रासाविना. हा दुसरा संकेत आहे यासाठी की आम्ही तुला आपले मोठे संकेत दाखविणार आहोत." (दिव्य कुरआन, २० : २२-२३)

हा दुसरा चमत्कार आहे जो अल्लाहने आदरणीय मूसा (अ.) पैगंबरांना दिला होता.

बायबल आदरणीय हारून (अ.) या पैगंबराविषयी सांगतो की त्यांनी वासरू तयार करून त्याला इस्राईलचा पूज्य देव घोषित केले." (नि. ३२ / २-६)

पवित्र कुरआन मध्ये अल्लाहने बायबलच्या एका पैगंबराविषयी केलेल्या असत्य आक्षेपाचे खंडन करीत साक्ष दिली की आदरणीय हारून (अ.) हे बहुदेववाद अथवा मूर्तीपूजासारख्या अपवित्रतेपासून पूर्णपणे पवित्र होते. वासरू तर सामरी नावाच्या तांत्रिकाने बनविले होते आणि त्यानेच बनीइस्राईल (इस्राईलची संतती) ला सांगितले होते की हा तुमचा पूजनीय इष्ट देव आहे. आदरणीय हारून (अ.) यांनी तर वासराच्या पूजेपासून रोखण्याचा प्रयत्न करीत सांगितले,

"मूसा (अ.) तीव्र रागाच्या व दुःखाच्या स्थितीत आपल्या लोकांकडे परतला. जाऊन त्याने सांगितले, "हे माझ्या समुहबांधवांनो, तुमच्या पालनकर्त्याने तुम्हाला चांगले वचन दिले नव्हते काय? तुम्हाला खूप दिवस लागले आहेत काय? अथवा तुम्ही आपल्या पालनकर्त्याचा प्रकोपच आपल्यावर ओढवून घेऊ इच्छित होता की तुम्ही माझ्याशी वचनभंग केला?." (दिव्य कुरआन, २०: ८६)

## नववे उदाहरण

बायबलने आदरणीय मूसा (अ.) यांच्या पैगंबरत्वप्राप्तीचे वर्णन अशा प्रकारे रेखाटले की आदरणीय मूसा (अ.) आपल्या सासऱ्याच्या शेळ्या चारत-चारत एक दिवस पर्वताजवळ आले असता अल्लाहने त्यांना संबोधित करून पैगंबरी पद बहाल केले आणि मिस्र देशात जाण्याची आज्ञा दिली. आदरणीय मूसा (अ.) आपल्या सासऱ्याची परवानगी घेऊन तेथुन निघाले. (नि. ३/१ - ४, १८)

पवित्र कुरआनने बायबलच्या या कथनाची दुरुस्ती करीत सांगितले,

"आणि तुम्हाला काही मूसा (अ.) ची वार्ताही मिळाली आहे का? जेव्हा त्याने एक अग्नी पाहिला आणि आपल्या कुटुंबियांना सांगितले की, "थोडे थांबा, मी एक अग्नी पाहिला आहे. कदाचित मी तुमच्यासाठी एखादा निखारा आणावा अथवा या अग्नीवर मला (रस्त्याविषयी) एखादे मार्गदर्शन प्राप्त व्हावे." तेथे पोहचला तेव्हा हाक दिली गेली, "हे मूसा (अ.)! मीच तुझा पालनकर्ता आहे. पादत्राणे काढून ठेव. तू 'तुवा' या पवित्र खोऱ्यात आहेस आणि मी तुला निवडले आहे. ऐक, जे काही दिव्य प्रकटन केले जात आहे." (दिव्य कुरआन, २० : ९-१३)

## दहावे उदाहरण

बायबलमध्ये नमूद आहे की आदरणीय जकरिया (अ.) त्यांचा मुलगा याहया यांच्या जन्मापर्यंत मुके होते. लुकाच्या कथनानुसार हे कोणत्यातरी चुकीबद्दल एक दंड होते.

परंतु पवित्र कुरआन सांगतो की

"(उत्तर दिले गेले), "हे जकरिया, आम्ही तुला एका मुलाची सुवार्ता देतो ज्याचे नाव 'याहया' असेल, आम्ही या नावाचा कोणी मनुष्य यापूर्वी निर्माण केला नाही." सांगितले, "हे पालनकर्त्या! माझ्या येथे पुत्र कसा बरे होईल, ज्याअर्थी माझी पत्नी वांझ आहे आणि मी वयोवृद्ध झालो आहे?" उत्तर आले, "असेच घडेल. तुझा पालनकर्ता फर्मावितो की ही तर माझ्यासाठी क्षुल्लकशी गोष्ट आहे. बरे यापूर्वी तर मी तुला निर्माण केलेच आहे जेव्हा तू काहीच नव्हतास." जकरियाने सांगितले, "हे माझ्या पालनकर्त्या, माझ्याकरिता एखादी खूण निश्चित कर." फर्माविले, "तुझ्यासाठी खूण ही आहे की तू सतत तीन दिवस लोकांशी बोलू शकणार नाहीस." त्याप्रमाणे तो कमानीमधून निघून आपल्या लोकांसमोर आला आणि त्याने संकेताने त्यांना सूचना दिली की सकाळ संध्याकाळ पावित्र्यगान करा." (दिव्य कुरआन, १९ : ७ - ११)

## अकरावे उदाहरण

बायबलने आदरणीय अय्युब (अ.) पैगंबरांना धैर्यरहित व्यक्तीच्या रुपात प्रस्तुत केले आहे. बायबल म्हणतो, ते नेहमी तक्रारच करीत असायचे. त्यांच्यावर कोसळणाऱ्या कोणत्याही संकटात ते सर्वथा तक्रार करणारे, दु:खाचे गाऱ्हाणे गाणारे म्हणून प्रसिद्ध झाले. (अय्युब १९/१-२२) या विपरीत पवित्र कुरआनमध्ये अल्लाहची साक्ष आहे की, आदरणीय अय्युब (अ.) असे कदापिही नव्हते. ते तर इतके धैर्यवान होते की ज्या कष्टात ते असायचे, त्याचा स्पष्ट शब्दांत उल्लेखही करत नव्हते की अल्लाहने ती व्यथा दूर करावी.

"आणि हीच (सुजाणपणा आणि अधिकार व ज्ञानाची देणगी) आम्ही अय्यूब (अ.) ला दिली होती. आठवा, जेव्हा त्याने आपल्या पालनकर्त्याचा धावा केला की, मी यातनाग्रस्त आहे. आणि तू सर्वाधिक दयावान आहेस."

(दिव्य कुरआन, २१ : ८३)

उपरोक्त कथन स्पष्ट करते की आपण कष्टाचा उल्लेख अत्यंत संक्षिप्त शब्दांत केला तत्पश्चात एकदम 'तू अत्यंत दयावान आहे' हे सांगून गप्प झाले. पुढे तक्रारही नाही आणि फिर्याद व विनंतीही नाही. त्यांची ही प्रार्थना त्यांच्या धैर्याचे जिवंत उदाहरण आहे. हे दर्शविते की ते सज्जन व समाधानी व्यक्ती होते.

## बारावे उदाहरण

बायबलमध्ये आदरणीय दाऊद (अ.) या पैगंबरावर अनैतिक मिथ्या आरोप लावण्यात आला. बायबल अनुसार या पैगंबरांनी उरीयाद हिट्टीच्या पत्नीशी व्यभिचार केला आणि हा खोटा आरोपही लावला की त्यांनी एका युद्धात योजनाबद्ध पद्धतीने उरीयादची हत्या करविली आणि त्यांच्या पत्नीशी स्वत: विवाह केला. ही घोषणासुद्धा केली की ही तीच स्त्री आहे जी सुलैमानची जन्मदाती होती.

(दे. २ शमूएल अध्याय ११, १२)

पवित्र कुरआनने या आरोपांना निराधार सांगितले आणि स्पष्ट केले की, दाऊद (अ.) हे अल्लाहचे पैगंबर आणि पवित्र आचरणाचे स्वामी होते. अशाच प्रकारचा खोटा आरोप आदरणीय दाऊद (अ.) ,लूत (अ.) या पैगंबरांवरही थोपण्यात आला की ते व्यभिचारी होते.(उ. १९/३१-३८)

पवित्र कुरआनचे हे महान उपकार आहेत की त्याने पैगंबरांच्या उज्वल चारित्र्यावरील हेतुपुरस्सर फेकलेली घाण स्वच्छ करून पैगंबरांच्या चारित्र्याची पवित्रता

कायम राखली. ज्यू (यहुदी) ऋषि मुनीनी (विद्वानांनी) तर आदरणीय दाऊद (अ.), सुलैमान (अ.) यांच्यावरही व्यभिचारासारखा अनैतिक मिथ्या आरोप लावला की त्यांनी सबाच्या महाराणीशी कुकर्म केले आणि या अवैध संबंधातून जो वंश चालला त्या वंशातूनच सम्राट बुख्त नस्त्र जन्माला आला, ज्याने बैतुल मकदिस (एक प्रसिद्ध उपासनागृह) ला नष्ट-भ्रष्ट केले. (Jewish Encyclopeadia, Volume II, Page - 443)

वास्तविकता ही आहे की यहुदी (ज्यू) विद्वानांचा एक समूह आदरणीय दाऊद (अ.), आदरणीय सुलैमान (अ.) यांचा पैगंबरांचा कट्टर विरोधक होता. या समूहाने आदरणीय सुलैमान (अ.) वर नाना प्रकारे मिथ्या आरोप लावले. उदाहरणार्थ, ते सांगायचे की, आदरणीय सुलैमान (अ.) विलासी व्यक्ती होते, ज्यांना आपले शासन आणि आपली बुद्धी व विवेक या प्रति गर्व होता. त्यांनी तौरातच्या आदेशाचे उल्लंघन केले. याशिवाय या समूहाने त्यांच्यावर मूर्तीपूजा व बहुदेववादाचे खोटे लांछनही लावले. (Jewish Encyclopeadia Volume II Page - 439-443)

या खोट्या आरोपाचा प्रभाव बायबलवर स्पष्ट दिसतो, कारण त्याने आदरणीय सुलैमान (अ.) यांना पैगंबरांना एक सम्राट म्हणून प्रस्तुत केले, तोही असा सम्राट जो ईशआदेशाचे उल्लंघन करतो आणि बहुदेववाद व स्त्रियांच्या भ्रामक जाळ्यात फसला होता. खऱ्या अल्लाहशी विसंगत होऊन ईश्वराव्यतिरिक्त दुसऱ्या आराध्य देवांकडे आकर्षित झाला होता. (१ राजा ११/१-११)

पवित्र कुरआनने त्यांचे प्रामाणिक चारित्र्य प्रस्तुत करून सांगितले की सुलेमान (अ.) यांचा बहुदैववादाशी काडीमात्रही संबंध नव्हता. (२:१०२), एक सुचरित्र पैगंबर होते (४: १६३). आम्ही (अल्लाहने) आदरणीय सुलैमान (अ.) आणि त्यांचे वडील आदरणीय दाऊद (अ.) यांना ज्ञान व तत्त्वदर्शिता प्रदान केली होती. (२१:७९) आदरणीय सुलेमान (अ.) श्रेष्ठ ईशभक्त आणि अल्लाहकडे जास्त आकर्षित होणारे होते. (३८ : ३०)

## तेरावे उदाहरण

पैगंबर यूसुफ (अ.) यांचा वृत्तांतही बायबलने वर्णिला आहे आणि पवित्र कुरआननेसुद्धा त्यांचे सविस्तर विवरण प्रस्तुत केले आहे. पवित्र कुरआनने जागोजागी बायबलच्या चुकांचा सुधार करीत आदरणीय यूसुफ (अ.) यांचे वृत्तांत अशा पद्धतीने रेखाटले की ते मात्र एक कहाणी बनून राहत नाही, तर मानवजीवनासाठी एक उज्वल मार्गदर्शन सिद्ध होते.

बायबलमध्ये आहे की जेव्हा आदरणीय यूसुफ (अ.) यांनी आपल्या एका अद्‌भुत स्वप्नाचे वर्णन आपल्या पितासमोर केले तेव्हा ते रागावले व त्यांना चांगलाच दम दिला. परंतु पवित्र कुरआनचे विश्लेषण यापेक्षा अगदी भिन्न आहे.

"हे त्यावेळचे वर्णन आहे जेव्हा युसूफ (अ.) ने आपल्या वडिलांना सांगितले, "हे पिता, मी स्वप्न पाहिले आहे की अकरा तारे आहेत व सूर्य आणि चंद्र आहे आणि ते माझ्यापुढे नतमस्तक होत आहेत." उत्तरात त्याच्या पित्याने सांगितले, "बाळा, आपले हे स्वप्न आपल्या भावांना सांगू नकोस अन्यथा ते त्रास देत राहतील. वस्तुस्थिती अशी आहे की शैतान माणसाचा उघड शत्रू आहे. आणि असेच घडेल (जसे तू स्वप्नांत पाहिले आहेस की) तुझा पालनकर्ता तुझी (आपल्या कार्यासाठी) निवड करील."

(दिव्य कुरआन, १२ : ४-६)

बायबल आणि तलमूदमध्ये आहे की आदरणीय यूसुफ (अ.) यांची भावंडे पशु चारावयास शेकेम शहराच्या दिशेने गेले होते. पिता आदरणीय यूसुफ (अ.) यांना त्यांच्या शोधास पाठविले होते. या विपरीत पवित्र कुरआनची स्पष्टोक्ति आहे की, आदरणीय यूसुफ (अ.) ची भावंडे स्वत:च यूसुफ (अ.) यांना आपल्या सोबत घऊन गेले होते आणि यासाठी त्यांना आपल्या पित्याला विश्वासात घ्यावे लागले होते आणि तेथे त्यांनी आदरणीय यूसुफ (अ.) यांना एका विहिरीत टाकले.

इस्राईली कथन आहे की, आदरणीय यूसुफ (अ.) यांना त्यांच्या भावांनी विकले. पवित्र कुरआनने याचे खंडण केले.

अशा प्रकारे पवित्र कुरआनने नमूद केलेले अनेक वृत्तांत बायबलपेक्षा अत्यंत भिन्न आहे. जणूकाही सूरह यूसुफचे अवतरण करून अल्लाहने पवित्र कुरआनच्या माध्यमातून बायबलचा सुधार केला. परंतु यहुदी (ज्यू) आणि इसाई यांना आपल्या पक्षपाती धोरणामुळे या महान कार्याच्या महत्तेचा थोडाही आभास नाही.

## चौदावे उदाहरण

पवित्र कुरआन तालूत व जालूतचे वृत्तांत अशा प्रकारे आले आहे,

"ही अल्लाहची वचने आहेत जी आम्ही तुम्हाला ठीक-ठीक ऐकवीत आहोत."

(दिव्य कुरआन, २ : २५२)

ही ईशवाणी आहे म्हणून यावर विश्वास न बाळगण्याचा तर प्रश्नच नाही आणि यामध्ये लोकांसाठी मार्गदर्शनही आहे. पवित्र कुरआनने वर्णिलेल्या वृत्तांत विरोधाभास कुठेही नाही; तसेच अनावश्यक विवरणही नाही आणि आवश्यक भाग सुटलेलाही

नाही. परंतु तालूतचे हेच वृत्तांत बायबलच्या शमूएल या पुस्तकात बघितला तर पवित्र कुरआनच्या महानतेचे महत्त्व पटल्याशिवाय राहत नाही. शमूएलमध्ये अवाजवी व अनावश्यक गोष्टीची भरमार आहे. कित्येक विवरण चुकीचेसुद्धा आहेत आणि वृत्तांत विरोधाभासही आहे. बघा -

लेखकाला तालूतचे नावही स्मरण नाही म्हणून त्याला साऊल संबोधण्यात आले. याचा स्पष्ट अर्थ हा आहे की घटना घटीत होण्याच्या दीर्घ काळानंतर लिपीबद्ध करण्याचा हा प्रयत्न होय. या पुस्तकात एका जागी आहे की साऊल (तालूत) हे दाऊद या पैगंबरांशी अपरिचित होते. त्यांचा परिचय जालूतच्या मृत्युपश्चात झाला. दुसऱ्या जागी लिहले की पूर्वीपासून तालूत (बायबलचा साऊल) आदरणीय दाऊद (अ.) यांच्याशी परिचित होता आणि समजत असे की आदरणीय दाऊद (अ.) जालूत चा निश्चितच वध करतील.

या पुस्तकात लिहले आहे की साऊल अल्लाहचा तारक आणि भाग्यशाली दास होता. शमूएल नबीने त्यांना विशेष समृद्धी देऊन त्यांचे चुंबन घेतले होते आणि याच भाग्यशाली ईशदास साऊलवर हा आरोप लावला जातो की जालूतच्या मृत्यूपश्चात आदरणीय दाऊद (अ.) पैगंबरांची लोकप्रियता तो सहन करू शकला नाही आणि आदरणीय दाऊद (अ.) पैगंबराच्या हत्येचा कट रचत होता. जालूतच्या मृत्युनंतर तालूतने आदरणीय दाऊद (अ.) सोबत आपल्या मुलीचे लग्नही लावले. तालूतवर जो आरोप लावण्यात आला त्याच्यावर विश्वास करणे शक्य नाही. काय शमूएल अशा व्यक्तीला सम्राट नियुक्त करतील? काय अल्लाहकडून त्यांना तशी अनुमती प्राप्त होऊ शकत होती.?

## पंधरावे उदाहरण

पवित्र कुरआनचे हे मोठे उपकार आहे की त्याने या रहस्यावरून पडदा हटविला की आदरणीय मसीह (अ.) यांना त्यांच्या शत्रूतर्फे कोणतीही हानी पोहचली नाही. ते आदरणीय मसीह (अ.) यांना बंदिस्त करू शकले नाही. तसेच ते त्यांची हत्या करण्यातही सफल झाले नाही. ते त्यांना फासावर लटकवू शकले नाही आणि हात व पायाला मेख (खुंटी) ठोकू शकले नाहीत. अल्लाहने आपल्या पैगंबराला प्रत्येक अपमानापासुन सुरक्षित ठेवले. आपल्या प्रतिष्ठेला कोणत्याही प्रकारे आघात अथवा हानी पोहचली नाही.

परंतु बायबलच्या अनुसार त्यांना (आदरणीय मसीह (अ.)) अपमानित

करण्यात आले आणि धिक्कारलेल्या अवस्थेमध्ये फासावर चढविण्यात आले.

याचप्रमाणे बायबलचे वक्तव्य आहे की जेव्हा आदरणीय मसीह (अ.) वर संकट आले (अशा कठीण समयी) तेव्हा त्यांचे अनुयायी त्यांना सोडून पळाले. यापैकी एकाने तर त्यांना पकडण्यात आल्याच्या दिवशी कोंबडा आरवण्यापूर्वी तीन वेळा आपला नकार केला. एका अनुयायाने तर आपणास पकडविण्यासाठी हेरगिरीही केली आणि त्याचा मोबदला घेण्यासही त्याला संकोच वाटला नाही. परंतु हे सर्व आदरणीय मसीह (अ.) यांच्या अनुयायांवर असत्य आरोप आहे. हे मिथ्या आरोप ज्यू लोकांच्या अनुचित साहसाचेच प्रतीक आहे. सेन्ट पॉल जो यहुदी आणि इसाई दोघांचा शत्रू राहिला आहे; त्याने आदरणीय मसीह (अ.) यांच्या अनुयायामध्ये इसाईयतला विकृत करून टाकले. याच कारणास्तव आदरणीय इसा (अ.) यांचे हवारी (अर्थात शिष्य व अनुयायी) विषयी व्यर्थ गोष्टींचा प्रचार केला आहे. येथपर्यंत की त्यांना बायबलमध्येही समाविष्ट करून टाकले. परंतु पवित्र कुरआनने सांगितले की इसा (अ.) चे शिष्य असे नव्हते जसे बायबल त्यांना दर्शवित आहे. ते तर प्रामाणिक आणि चरित्र्यवान होते. त्यांचा इमान (श्रद्धा) दृढ होता. इतका दृढ की कुरआनने इमान आणि धर्मसेवेप्रति त्यांचे संकल्प व आचरणाला मुस्लिमांसमक्ष आदर्श नमूना म्हणून प्रस्तुत केला आहे. पाहा दिव्य कुरआन (६१ : १४)

# पवित्र कुरआनच्या महत्त्वपूर्ण सूचना

पैगंबरांच्या वृत्तांतसंबंधी अनेक महत्त्वपूर्ण गोष्टी ज्या पवित्र कुरआनने स्पष्ट केल्या त्यांचा उल्लेख बायबलमध्ये मिळत नाही. जसे -

१) पवित्र कुरआनमध्ये आहे की जेव्हा आदरणीय मूसा (अ.)ची प्रथम भेट फिरऔन (बादशहा) शी झाली होती त्या प्रसंगी जो वार्तालाप झाला त्याचा संबंध एकेश्वरत्व आणि ईशप्रभुत्व व महानता आणि आचरणाशी होता. मार्गदर्शन आणि सत्याच्या प्रसाराच्या दृष्टिने या चर्चेचे अत्यंत महत्त्व आहे. पाहा दिव्य कुरआन - (२० : ४३-५६)

२) अशाच प्रकारे पैगंबर मूसा (अ.) यांच्यासमोर (मुकाबल्यासाठी) आपल्या राज्यातील सुप्रसिद्ध जादूगारांना उभे केले तेव्हा त्यांनी मूसा (अ.) यांच्यातर्फे दाखविलेल्या चमत्काराला बघून त्यांच्यावर इमान आणले. (त्यांच्या आदेशांचा स्वीकार केला) या वेळी या जादूगारांनी या गोष्टीची मुळीच पर्वा केली नाही की त्यांच्या या आचरणाने फिरऔन क्रोधित होऊन त्यांना मृत्युदंडही देऊ शकतो. जेव्हा फिरऔनने

तशी धमकी देत घोषणाही केली तेव्हा ते आपल्या श्रद्धेवर दृढ राहिले. वास्तविक ते येथे संपत्ती व सन्मानाच्या आशेनेच पैगंबर मूसा (अ.) च्या समोरासमोर आले होते. परंतु आता ते फिरऔनसमक्ष ही साक्ष नोंदवितात की स्पष्ट निशाणी बघितल्यानंतर (अल्लाहला सोडून) हे फिरऔन आम्ही तुला प्राथमिकता देऊच शकत नाही. पाहा दिव्य कुरआन (२०: ६५-७५)

या इमानवर्धक घटनांचा बायबलमध्ये कोणताही संकेत नाही. वास्तविक सत्याच्या विजयाची ही अमर घटना होती.

३) पवित्र कुरआनने स्पष्ट केले की ईशप्रकोपामुळे जेव्हा फिरऔन यातनाग्रस्त झाला आणि पाण्यात बुडू लागला तेव्हा ओरडून सांगितले की, 'मी आदरणीय मूसा (अ.) आणि हारून (अ.) यांच्या रब (पालनकर्त्या अल्लाहवर) वर इमान आणले, परंतु आता इतका उशीर झाला होता की इमान स्वीकारून आपली नीती बदलण्याची वेळ संपली होती. आता त्याला ही संधी प्राप्त नव्हती की आपल्या कृत्याच्या प्रायश्चित्तासाठी आपला विद्रोह त्यागून अल्लाहला समर्पित हाऊ शकेल. भूतलावरील जीवनकर्माची निर्धारित वेळ संपल्यावर सत्याच्या साक्षी अथवा समर्पणाला अल्लाह स्वीकृत करीत नाही.

या मानवी हृदय हेलावणाऱ्या प्रेरणादायक घटनेचा उल्लेख बायबलमधून वगळण्यात आला. पवित्र कुरआनच्या वृत्तांताची पुष्टी 'तलमूद'ने होते. तलमूद सांगतो, जलमग्न होत असता फिरऔन म्हणाला, "हे प्रभो! मी तुझ्यावर इमान आणतो (स्वीकार करतो) की, तुझ्याशिवाय दुसरा कुणीही अल्लाह नाही."

४) पवित्र कुरआनने आदरणीय मूसा (अ.) यांच्या एका विशेष यात्रेचे चित्र रेखाटले आहे. (१८ : ६०-८२) या प्रवासाप्रसंगी आदरणीय मूसा यांना (अ.) यांना नाना प्रकारचे अनुभव झाले व मानवजीवनातील अनेक रहस्य उलघडली. परंतु बायबलने यालाही आपल्या येथे जागा दिली नाही. तलमूदमध्ये या यात्रेचे विवरण आहे, परंतु यात्रेचे मुख्य पात्र आदरणीय मूसा (अ.) यांच्या जागी दुसऱ्या व्यक्तीला बनविले.

पवित्र कुरआनने फिरऔनच्या दरबारातील एका सहृदयी, प्रामाणिक आणि साहसी व्यक्तीचे वर्णन करीत सांगितले की, फिरऔन आणि मूसा (अ.) दरम्यान झालेल्या चर्चेनंतर आपली आस्था प्रगट करीत धैर्याने या इमानधारक व्यक्तीने सांगितले, काय तुम्ही अशा व्यक्तीची हत्या करू इच्छिता जो तुमच्यासमोर सांगतो की माझा प्रभु अल्लाह आहे आणि तो तुमच्या समक्ष स्पष्ट प्रमाण प्रस्तुत करीत आहे. त्या

व्यक्तीने आपल्या लोकसमुहाचे प्रबोधन करीत सांगितले, ईशप्रकोपापासून सावध राहा आणि त्यांना एकमेव अल्लाहच्या आज्ञापालनाची ताकीद केली. तो व्यक्ती म्हणाला, मी जे काही तुम्हाला सांगत आहे ते तुम्ही निश्चितपणे आठवाल! मी तर माझे प्रकरण ईश्वराच्या स्वाधीन केले आहे. तो आपल्या दासांवर निगाह (दृष्टी) राखून आहे. पाहा दिव्य कुरआन ( ४० : २६-४५)

त्या व्यक्तीचे हे प्रबोधन अत्यंत प्रभावी, करूणा आणि दु:खाने व्याप्त होते. त्याच्या हृदयाची ही हाक मानवकल्याणाची खंत प्रगट करीत होती. परंतु या साहसी व्यक्तीचा वृत्तांत बायबल अथवा दुसऱ्या ग्रंथात वर्णिलेला नाही.

५) पवित्र कुरआनमध्ये कारून नावाच्या एका ऐतिहासिक व्यक्तीचा सविस्तर वृत्तांत वर्णिला आहे. कारून हा त्या काळचा इतका धनाढ्य व्यक्ती होता की तो कुबेर म्हणून प्रसिद्ध झाला. (देवाचा खजिनदार) तो अनेक खजान्यांचा मालक होता. परंतु आदरणीय मूसा (अ.) पैगंबरांचा विरोधी आणि ईशप्रति खिन्न (विमुख) होता. त्याच्या अंत:करणात ईशआदेशाप्रति कसलाही आदर नव्हता. त्याला स्वत:वर गर्व होता आणि तो सांगायचा, मला जी धन-संपत्ती प्राप्त आहे, ती माझा विवेक (बुद्धी) आणि परिश्रमाचा परिणाम आहे. सरतेशेवटी अल्लाहने त्याला जमिनीत धसवले आणि त्याचे जीवन लोकांसाठी एक प्रेरणादायक कहाणीच्या रूपात सुरक्षित झाले. पाहा दिव्य कुरआन ( २६ : ७६-८३)

बायबल आणि तलमूदमध्ये काहीही उल्लेख या महत्त्वपूर्ण घटनेचा वर्णिला नाही.

६) आदरणीय याकूब (अ.) यांनी आपल्या मुलांना जी वसीयत (अंतिम समयी केलेले मृत्युपत्र) केली होती त्याचे प्रभावी पद्धतीने वर्णन पवित्र कुरआनने केले आहे. त्यांनी मुलांना प्रश्न केला होता की, "तुम्ही माझ्या पश्चात कुणाची (बंदगी) गुलामी व भक्ती कराल? त्यांनी उत्तर दिले आम्ही त्या अल्लाहची बंदगी (दास्यता) करू जो आपला व आपले पिता आदरणीय इब्राहीम (अ.), इस्माईल (अ.) आणि इसहाक (अ.) यांचा आराध्य आहे. आदरणीय याकूब यांनी आपल्या मुलांना ताकीद केली होती की, ईश आज्ञापालना शिवाय अन्य कोणत्याही दशेत (स्थितीत) तुम्हाला मृत्यू यायला नको. म्हणजे जीवनाच्या अंतिम क्षणापर्यंत निर्मिक अल्लाहचे आज्ञापालक बनून रहा. हीच वसीयत आदरणीय इब्राहीम (अ.) यांनी आपल्या मुलांना केली होती. पाहा दिव्य कुरआन ( २ : १३२-१३३)

अशा महत्त्वपूर्ण मौलिक वसीयतपासूनही बायबलने आपला संबंध ठेवला नाही तथापि तलमूदने याची पुष्टी होते.

७) कारागृहात दोन तरुण कैद्यांसमक्ष आदरणीय यूसुफ (अ.) यांनी केलेले एका महत्त्वपूर्ण प्रबोधनाचे वर्णन पवित्र कुरआनने केले. त्यांचे हे भाषण एकेश्वरानवर अत्यंत अर्थ गर्भित, तर्कयुक्त आणि हृदयस्पर्शी आहे. परंतु बायबलने त्यालाही वगळले.

८) पवित्र कुरआन आदरणीय यूसुफ (अ.) यांच्या उच्चकोटीच्या चारित्र्याचा नमूना प्रस्तुत केला. अजीज (त्या वेळचा मिस्त्रचा बादशहा) च्या पत्नीने मिस्त्रच्या स्त्रियांना आपल्या घरी आमंत्रित केले, ते हे दाखविण्यास की ती ज्या युवकावर आसक्त झाली आणि त्याला आपल्याकडे आकर्षित करण्यात असफल झाली, यामध्ये तिच्या सौंदर्याची कमतरता कारणीभूत नव्हे तर आदरणीय यूसुफ (अ.) यांचे व्यक्तीत्व आणि चरित्र्य इतक्या उच्च दर्जाचे आहे की त्याला दुष्कृत्याकडे प्रवृत्त करणे कोण्या सौदर्यवतीसाठीही अत्यंत दुर्लभ आहे. या चरित्र्यवर्धक घटनेचीही बायबलने दखल घेतली नाही.

तात्पर्य, बायबल आणि पवित्र कुरआनचे तुलनात्मक अध्ययन केले तर अगदी स्पष्टपणे हे तथ्य समोर येते की पवित्र कुरआन एक प्रामाणिक ईशग्रंथ आहे, ज्याने मानवी जगताच्या धर्म प्रकारांवर अतोनात उपकार केले, जे अविस्मरणीय आहे. या अध्ययनाने इतिहासातील महान विभूति आणि पैगंबरांच्या चारित्र्याला कशा प्रकारे मलीन करण्यात आले याचेही ज्ञान होते. स्वार्थी लोकांनी कशा प्रकारे त्यांना आपल्या स्वत:च्या चारित्र्यहीन पातळीवर आणण्याचा प्रयत्न केला, याचे उदाहरण आम्हाला भारतीय दंतकथेतही मिळते.

# अध्याय १२
# धर्मग्रंथांची भविष्यवाणी

## पैगंबर मुहम्मद (स.) यांच्या आगमनाविषयी

पैगंबर मुहम्मद (स.) यांच्या आगमनाविषयी प्राचीन धर्मग्रंथांमध्ये भविष्यवाणी केली गेली की अंतिम क्षणी एक असा व्यक्ती या सृष्टीवर पदार्पण करेल जो महानतेच्या उच्च शिखरावर सुशोभित होईल. धर्मग्रंथामध्ये या येणाऱ्या व्यक्तीच्या गुणांचे आणि विशेषता यांचेच वर्णन केले नसून हेसुद्धा सांगण्यात आले आहे की त्याचा जन्म कोठे आणि केव्हा होईल आणि कोणत्या नावाने व उपाधीने त्यास भुशविले जाईल. जास्त विस्तारात न जाता येथे आम्ही काही भविष्यवाणींचा उल्लेख यासाठी करीत आहोत की, पैगंबर मुहम्मद (स.) यांचे आगमन काही आकस्मिक नव्हते तर ईशयोजने अंतर्गत झाले होते हे स्पष्ट व्हावे. त्यांचे आगमन आणि महान कार्याचे मानवी इतिहासात इतके महत्त्व आहे की त्यांच्या आगमनाची पूर्ववत सूचना देण्यात आली. म्हणजे जगाला त्यांना ओळखता यावे, त्या मार्गदर्शनाद्वारे मनुष्यजीवनाला नैतिकता आणि आध्यात्मिकतेच्या उच्च पातळीवर स्थापित करण्यास सोयीस्कर व्हावे.

## हिंदू धर्मग्रंथांची भविष्यवाणी

भारतीय धार्मिक ग्रंथात वेदांना विशिष्ट स्थान प्राप्त आहे. हिंदू धर्मामध्ये वेदांना मूळग्रंथ म्हणून स्वीकारण्यात आले आहे. या वेदांमध्ये पैगंबर मुहम्मद (स.) विषयी भविष्यवाणी केली गेली आहे. यामध्ये एक महान व्यक्तीत्व नराशंसचा उल्लेख वारंवार केला गेला आहे. याविषयी जे काही नमूद करण्यात आले आहे व ज्या गुणांनी त्यांना विभूषित करण्यात आले आहे. मानव इतिहासात पैगंबर मुहम्मद (स.) शिवाय अन्य कोणी वेद निर्देशित चिन्हे आणि गुणांत पूर्णपणे उतरत असलेला दिसत नाही.

डॉ. वेदप्रकाश उपाध्याय[१] यांनी या विषयावर संशोधनात्मक कार्य केले आहे. त्यांनी वेद, पुराणे आणि पैगंबर मुहम्मद (स.) यांचे जीवनचरित्र आणि शिकवणींचे

१) संस्कृत भाषेचे एक महान विद्वान यांनी अनेक शोधकार्ये केले आहेत. त्यांची अनेक पुस्तके प्रकाशित झाली आहेत. वेद आणि हिंदू धर्मशास्त्रावर त्यांच्या शोधकार्याला लोकप्रियता प्राप्त आहे. 'हिंदू-विधी', 'नराशंस' और 'अंतिम ऋषि' त्यांचे प्रसिद्ध ग्रंथ आहेत.

सखोल अध्ययन केल्यानंतर सिद्ध केले की हिंदू धर्मग्रंथांत 'नराशंस' आणि 'कल्कि' अवतारासंबंधी केलेली भविष्यवाणी पैगंबर मुहम्मद (स.) यांच्या रूपात चरितार्थ झाली आहे. अर्थात नराशंस व कल्कि अवतार, पैगंबर मुहम्मद (स.) हेच आहेत. डॉ. वेदप्रकाश उपाध्याय यांची पुस्तके 'नराशंस आणि अंतिम ऋषि' आणि 'कल्कि अवतार और मुहम्मद साहब' यांच्या आधारे काही तथ्य प्रस्तुत करीत आहोत.

'नराशंस और अंतिम ऋषि' या शोधग्रंथात (पान क्रमांक ७-१२) आदरणीय उपाध्यायजी वेदामधील नराशंसविषयी लिहतात -

१) "लोक हो ऐका! नराशंसची प्रशंसा केली जाईल."

(अथर्ववेद २०/१२७/१)

२) तो उंटावर स्वार होईल. (अथर्ववेद २०/१२७/२)

३) तो बारा पत्नीवाला असेल (अथर्ववेद २०/१२७/२)

४) तो शंभर निष्कांनी युक्त असेल (अथर्ववेद २०/१२७/३)

५) तो १० हातांनी सुशोभित केला जाईल (अथर्ववेद २०/१२७/३)

६) ३०० अर्वनाने युक्त असेल (अथर्ववेद २०/१२७/३)

७) दहा हजार गो (गाया) ने युक्त असेल (अथर्ववेद २०/१२७/३)

८) तो आपल्या महत्त्वाने घर घर प्रकाशित करेल (ऋग्वेद २/३/२)

९) पापांचा विनाशक असेल (ऋग्वेद १/१०६/४)

संशोधनात्मक विचाराअंती हे तथ्य समोर येते की नराशंसशी अभिप्रेत पैगंबर मुहम्मद (स.) हेच होय. मुहम्मदचा अर्थ होतो ज्याची प्रशंसा केली गेली आहे, नराशंसचाही हाच अर्थ होतो. दोन्ही शब्द समानार्थी आहे. नराशंस या शब्दाने ही गोष्टही स्पष्ट होते की प्रशंषित व्यक्ती मनुष्यांपैकीच असेल. हा बोधही होतो की नराशंस भूतकाळातील विभूतीचे नाव नसून भविष्यात प्रगट होणाऱ्या व्यक्तीचे नाव होय.

पैगंबर मुहम्मद (स.) विषयी कुरआनची स्पष्टोक्ती आहे,

"आणि तुमच्याखातर तुमच्या लौकिकाचा नाद दुमदुमला."

(दिव्य कुरआन, ९४ : ४)

हे अगदी अकाट्य सत्य आहे की जगात कोणत्याही व्यक्तीला इतकी ख्याती व सन्मान प्राप्त नाही जितका पैगंबर मुहम्मद (स.) यांना अल्लाहने प्रदान केला.

नराशंसविषयी वेदाचे हे भाकित की ते १२ पत्नीवाले असतील ही गोष्ट पैगंबर मुहम्मद (स.) यांच्यावरच चरितार्थ होते. नराशंसची सवारी उंटाची असेल हा स्पष्ट संकेत आहे की येणारा महान व्यक्ती अरब देशाचा असेल. अरबमध्येच उंटाची सवारी प्रचलित होती. पैगंबर मुहम्मद (स.) उंटावर स्वार होऊनच मक्केहून मदीनेला गेले होते. पैगंबर मुहम्मद (स.) यांना संस्कृतमध्ये महामद म्हटले आहे. वास्तविक महामद हे संस्कृत रूप पैगंबर मुहम्मद (स.)चेच आहे. भाषेच्या प्रकृतीनुसार नावामध्ये काही ना काही बदल होतच असतो. 'महामद' नावाचा कोणी ऋषि झालाही नाही. यावरूनही हेच स्पष्ट होते की हे नाव पैगंबर मुहम्मद (स.) यांच्यासाठीच प्रयुक्त झाले आहे.

मंत्रामध्ये ज्या १० हातांचा उल्लेख आला आहे त्यापासून अभिप्रेत आपले ते १० सहकारी आहेत ज्यांचे सत्यासाठी अद्भूत बलिदान आहे. ज्यांना भौतिक जीवनातच स्वर्गाची शुभ-सूचना देण्यात आली होती. ३०० अर्वन अर्थात घोडे हा संकेत आहे त्यांच्या त्या महायोद्धांकडे ज्यांनी बदरच्या युद्धात आपल्या पराक्रमाचा परिचय दिला होता, दहा हजार गायीपासून अभिप्रेत आहे. ते १० हजार पवित्रात्मा जे मक्का विजयासमयी त्यांच्या सोबत होते. गायीची उपमा देण्याचा अर्थ हा आहे की, धैर्य, एकता इत्यादी गुण पर्याप्त प्रमाणात त्यांच्यात उपलब्ध आहेत. संस्कृत ग्रंथात गोचा रूपक प्रयुक्त झाला आहे. वेद मंत्रात पैगंबर मुहम्मद (स.) साठी 'रम्य' शब्द प्रयुक्त झाला आहे, त्याचा अर्थ होतो 'प्रशंसा करणारा', हा आपले विशेष नाव 'अहमद'चा पर्यायवाची आहे. त्यांना सत्याच्या प्रचाराची आज्ञा देण्यात आली. त्यांनी पूर्णतया या आदेशाचे पालन केले. वेद मंत्रानुसार ते सर्वोत्तम मनुष्य आणि जगनायक होते. ते जो संदेश घेऊन आले होते तो कोणत्याही विशेष जाती, देश व वर्गासाठी नव्हता, तर समस्त जगवासियांसाठी होता. सामवेदाच्या मंत्रात तर स्पष्टपणे त्यांचे नाव अहमदकडे संकेत आहे. यद्यपि लोकांनी याला समजण्यास चूक केली. यात संदेह नाही त्यांना जे धर्मविधान प्रदान करण्यात आले ते दृढ विशेषताने परिपूर्ण आहे.

नराशंससाठी ऋग्वेदमध्ये 'प्रिय' शब्द प्रयुक्त झाला आहे. नि:संशय पैगंबर मुहम्मद (स.) सर्वांसाठी प्रिय होते व आजही आहेत.

वेदांच्या अतिरिक्त भविष्य पुराण आणि कल्किपुराणमध्येसुद्धा पैगंबर मुहम्मद (स.) संबंधी भविष्यवाणी उपलब्ध आहे. कल्कि-पुराण आणि भागवत पुराणामध्ये अंतिम अवताराचे जे गुण वर्णिले आहेत ते सर्व पैगंबर मुहम्मद (स.) यांच्यावर

चरितार्थ होतात. (पूर्णपणे जुळतात) भागवत पुराणमध्ये आहे की तो पापी लोकांना पराजित करेल, परंतु सत्कर्मी लोकांना सुरक्षित ठेवेल. तो तलवारीचा धनी असेल व त्यात सर्व चांगले गुण विद्यमान असतील आणि तो जगरक्षक होईल. (भागवत पुराण १२/२/१९). कल्कि पुराणमध्ये आहे की त्याचा जन्म शुक्ल पक्षाच्या १२ व्या तिथीला वैशाख महिन्यात होईल. तो सांगतो की, हा अंतिम अवतार संभलमध्ये विष्णुयशाच्या घरी जन्माला येईल आणि माताचे नाव सुमती असेल. (कल्कि २/४/५). संभलचा अर्थ होतो शांती अथवा शांतीस्थळ वास्तविक ही उपाधी आहे. मक्का शहराची पवित्र कुरआन मध्ये मक्का शहराला शांतीमय भू-भाग म्हटले जाते. अंतिम अवताराविषयी हेसुद्धा सांगितले की युद्धात देवतांद्वारे सहायता करण्यात येईल. पवित्र कुरआनने हे सिद्ध होते की, युद्धात फरिश्तांद्वारे मदत करण्यात आली.[१]

कल्की अवतारची जी जन्मतिथि दर्शविण्यात आली ती पैगंबर मुहम्मद (स.) यांच्या जन्मतिथीच्या अनुकूल आहे.

## बायबलची भविष्यवाणी

वर्तमान बायबलमध्ये बरेच बदल झाले आहेत, तरीही पैगंबर मुहम्मद (स.) आगमनाची भविष्यवाणी आजही बघता येते.

१) बायबलमध्ये आहे की, आदरणीय मूसा (अ.) यांनी आपल्या लोकसमुदायास संबोधित करीत सांगितले,

"तुझा प्रभु परमेश्वर तुझ्यामधूनच अर्थात तुझ्या भावांमधून माझ्यासारखा एक पैगंबर उत्पन्न करेल. तू त्याचीच गोष्ट ऐकावी. हे तुझ्या त्या विनंती अनुसार होईल जी तू होरेब पहाडाजवळ सभेच्या दिवशी आपल्या प्रभु परमेश्वराशी केली होती, की मला आपल्या प्रभु परमेश्वराचा शब्द पुन्हा ऐकावयास आणि ती मोठी आगही पुन्हा बघायला मिळु नये. कदाचित असे होईल की मी मरून जाईन. तेव्हा प्रभुने मला सांगितले ते जे काही सांगतात ते योग्यच आहे. मी त्यांच्यासाठी त्यांच्या भावंडामधूनच तुझ्याचप्रमाणे एक पैगंबर नियुक्त करेन, आणि माझे आदेश त्याच्या मुखाद्वारे प्रस्तुत करेन. मी त्याला ज्या ज्या आज्ञा देईल त्याच तो त्यांना ऐकवेल. जो मनुष्य माझे ते आदेश जे तो माझ्या

१) 'कल्कि अवतार और मुहम्मद साहब' - लेखक-वेदप्रकाश उपाध्याय.

नावाने सांगेल ते स्वीकार करणार नाही, मी त्याचा हिशेब घेईन.''

(व्यवस्था विवरण १८/१५-१९)

बायबलची ही स्पष्ट भविष्यवाणी आहे जी पैगंबर मुहम्मद (स.) यांच्याशिवाय अजून कोणावरही तंतोतत खरी ठरत नाही. आदरणीय मूसा (अ.) आपल्या लोकांना हा संदेश ऐकवित होते की, तुझ्या भावंडामधूनच एक पैगंबर नियुक्त करेल. स्पष्ट आहे की, भांवडापैकी म्हणजे अशी दुसरी जातीसुद्धा असू शकते ज्याचे नाते भावाचे आहे. स्पष्ट आहे की बनीइस्त्राईलचे भाऊ बनीइस्माईलच होऊ शकतात आणि पैगंबर मुहम्मद (स.) हे बनीइस्माईलमधून आहेत. जर येणारा पैगंबर बनीइस्त्राईलमधीलच असता तर भविष्यवाणी या शब्दांत झाली असती की, मी तुमच्यासाठी तुमच्यामधूनच एक पैगंबर निर्माण करेन.

या भविष्यवाणीतील दुसरी गोष्ट ही आहे की येणारा हा पैगंबर तुझ्यासारखा असेल, म्हणजे आदरणीय मूसा (अ.) प्रमाणे स्थायी धर्मविधान (शरीयत) दिले जाईल. ही विशेषता पैगंबर मुहम्मद (स.) यांच्याशिवाय कोणालाही प्राप्त नाही. कारण त्यांच्यापूर्वी जे नबी (पैगंबर) बनीइस्त्राईल शाखेत आलेत ते सर्व आदरणीय मूसा (अ.) यांच्याच धर्मविधान (शरीयत)चे पालन करीत असत.

२) इंजिल युहन्नामध्ये आहे,

''युहन्ना (आदरणीय याहया (अ.)) ची साक्ष आहे की जेव्हा ज्यू (यहुदी) लोकांनी यरूशेलम येथून याजको आणि लेवियो यांना युहन्नाला हे विचारण्यास पाठविले की, तू कोण आहेस? तेव्हा युहन्नाने हे मान्य केले आणि नकार दिला नाही. परंतु मान्य केले की मी मसीह नाही. तेव्हा त्यांनी विचारले, मग तू कोण आहेस? काय तू एलियाह (इलियाम) आहे? यूहन्नाने सांगितले, नाही. तर मग काय तू 'तो नबी (पैगंबर) आहे'? युहन्नाने सांगितले नाही. तेव्हा त्यांनी यूहन्नाला विचारले मग तू कोण आहेस? आम्हाला पाठविणाऱ्यांना उत्तर द्यायचे आहे? तुझ्याविषयी आम्ही काय सांगावे? यूहन्नाने सांगितले, 'मी याहया नबीच्या म्हणण्याप्रमाणे निर्जन प्रदेशात हाक मारणाऱ्याचा आवाज आहे. तुम्ही प्रभुचा मार्ग सरळ करा.' त्यांनी युहन्नाला विचारले तू मसीह आणि एलियाह नाही, तसेच तू 'तो नबीही नाही' तर मग तू ख्रिस्ती धर्माची दीक्षा (बापतिस्मा) का देतो? त्याने उत्तर दिले की, मी तर जलापासून बापतिस्मा देतो आहे. परंतु तुमच्यात एक असा व्यक्ती उभा आहे ज्याला तुम्ही जाणत नाही. अर्थात तो

जो माझ्यानंतर येणार आहे, ज्याच्या जोड्याचे बंधन सोडण्यायोग्यही मी नाही.''

(युहन्ना १ : १९-२८)

इंजिलच्या या स्पष्टीकरणाने ज्ञात होते की, इसा मसीह यांच्या आगमनाप्रसंगी बनीइस्राईल (इस्राईलचे वंशज) तीन लोकांच्या आगमनाची प्रतीक्षा करीत होते. १) आदरणीय मसीह (अ.), २) एलियाह आणि ३) 'तो नबी'. इंजीलचे हे शब्द स्पष्ट संकेत देत आहेत की इसा मसीह आणि एलियाह (आदरणीय इलियाह (अ.)) यांच्या व्यतिरिक्त एक अजून पैगंबरांची प्रतीक्षा ते करीत होते. त्या नबीच्या आगमनाची कल्पना (विचार) इस्राईली लोकांमध्ये अतिशय चर्चित होती, की मात्र 'तो नबी' म्हणणे त्याच्या संकेतासाठी पर्याप्त होते. 'तो नबी' याबाबत-सोबत तो पैगंबर जो तौरातमध्ये सांगितला गेला आहे, अशा स्पष्टीकरणाचीही गरज नव्हती. यावरून हे स्पष्ट होते की ज्या पैगंबरांकडे ते संकेत करत आहेत त्याचे आगमन अगदी सुनिश्चित आहे. यासाठीच याहृया पैगंबरांशी येणाऱ्या पैगंबरांविषयी प्रश्न केला गेला तेव्हा त्यांनी हे नाही म्हटले की आता कोणताही नबी येणार नाही. तुम्ही कोणत्या पैगंबराविषयी विचारत आहात?

इंजिलमध्ये स्वत: आदरणीय इसा मसीह (अ.) यांनी पैगंबर मुहम्मद (स.) यांच्या आगमनाची सूचना दिली आहे,

''(मसीहने सांगितले) मी तुमच्यासोबत अजून बोलणार नाही, कारण या जगाचा शासक येत आहे. त्याचा माझ्यावर काही अधिकार नाही.'' (यूह. १४/३०)

एका दुसऱ्या जागी आहे,

''मला तुमच्याशी (बरेच) खूप काही बोलायचे आहे. परंतु सध्या तुम्ही त्याला सहन करू शकत नाही. परंतु जेव्हा तो, अर्थात सत्याचा आत्मा येईल तेव्हा तुम्हाला सत्याचा पूर्ण मार्ग दाखविल. तो आपल्या मर्जीने काहीही सांगणार नाही, परंतु जे काही तो ऐकेल तेच सांगेल आणि येणाऱ्या गोष्टी तुम्हाला सांगेल. तो माझी महीमा करेल कारण माझ्याबाबतीत तो सर्व त्याला सांगेल.'' (यूह. १६/१२-१४)

बायबलमध्ये पुष्कळ फेरबदल झाला आहे, तरीसुद्धा त्यात अल्लाहच्या अंतिम पैगंबरांच्या आगमनाविषयी शुभसूचना आणि भाकीत स्पष्टपणे आढळून येते. उपरोक्त

उताऱ्यामध्ये स्पष्टपणे आदरणीय मसीह (अ.) आपल्यानंतर येणाऱ्या व्यक्तीत्वाची सूचना देत आहेत. त्याला ते जग नेता (विश्वनायक) घोषित करीत आहेत. इतकेच नव्हे की तो सत्याचा सन्मार्ग दाखवेल, तर स्वत: त्यांची (अर्थात इसा मसीह (अ.)) साक्षही देईल. युहन्नाच्या उताऱ्यात 'सत्याचा आत्मा' या शब्दाचा प्रयोग करून भ्रम निर्माण करण्याचा प्रयत्न अवश्य करण्यात आला. परंतु सूक्ष्म चिंतन केल्यास हे स्पष्ट होते की तो विशेष व्यक्ती (ज्याच्या आगमनाची सूचना देण्यात आली आहे.) तो मनुष्य आहे केवळ आत्मा नव्हे; ज्याची शिकवण व्यापक रूपात प्रचलित होईल.

युहन्ना (१४/१६) मध्ये येणाऱ्यासाठी 'मदतगार'चा शब्द प्रयोग झाला आहे. युहन्नाच्या मुळ इंजीलमध्ये युनानी भाषेचा शब्द Paracletas (फाश्कलीत) होता. या शब्दाचा अर्थ होतो ज्याची प्रशंसा केली गेली आहे आणि हा शब्द 'मुहम्मद'चा समानार्थी आहे. इसाई लोकांचा आग्रह आहे की हा शब्द Paracletas आहे, परंतु याच्या अर्थाविषयी त्यांना पेच पडला. यूनानी भाषेतचा अर्थ होतो, मदतीस हाक मारणे. कोणत्याही स्थानासाठी बोलावणे इत्यादी. स्पैनी भाषेत याचा अर्थ होतो 'सांत्वना देणे, शांती देणे, हिंमत वाढविणे.' बायबलमध्ये हा शब्द ज्या ज्या जागी प्रयोग करण्यात आला आहे त्यापैकी कोठेही यापैकी कोणताही अर्थ योग्य वाटत नाही. यासाठीच अनुवादकांमध्ये मतभेद आढळून येतो. युहन्नाद्वारे लिखित प्रारंभिक यूनानी इंजील आता कोठेही उपलब्ध नसल्यामुळे हा निर्णय करणे शक्य नाही की यापैकी कोणता शब्द (दोन शब्दांपैकी) युहन्नामध्ये प्रयोग करण्यात आला आहे. परंतु वास्तविकमध्ये आदरणीय इसा मसीह (अ.) यांची भाषा युनानी नसून सूर्यानी होती. अर्थात यूनानी भाषेत आलेला शब्द अनुवादित आहे. मसीहने या शुभ सूचनेत जो शब्द वापरला असेल अर्थातच तो 'सूर्यानी' भाषेचा असणार. सौभाग्याने हा मूळ सूर्यानी शब्द 'सीरत इब्ने हिश्शाम' या मान्यता प्राप्त पुस्तकात मिळतो. या पुस्तकाद्वारे हेसुद्धा कळते की याचा समानार्थ यूनानी शब्द कोणता आहे. इब्ने हिश्शामने इंजील युहन्ना अध्याय १५, आयत २३-२७ आणि अध्याय १६च्या आयातीचा अनुवाद दिला आहे. यामध्ये यूनानी शब्दाच्या जागी सूर्यानी शब्द 'मुनहमन्ना' प्रयुक्त झाला आहे. येथे हे पण स्पष्ट करण्यात आले की 'मुनहमन्ना' या शब्दाचा सूर्यानीमध्ये 'मुहम्मद' असा अर्थ होतो तर यूनानीमध्ये 'बरकलीक्स' असा होतो.

इतिहासाच्या अध्ययनानुसार फिलस्तीनच्या सामान्य इसाई जनतेची भाषा नवव्या शताब्दी इसवीपर्यंत सूर्यानी होती. हे क्षेत्र ७ व्या शताब्दीच्या पूर्वार्धापासून इस्लामी अधिपत्यात होता. 'सीरतचे लेखक इब्ने इसहाकचा मृत्यू सन ७६८ इसवी मध्ये झाला आणि इब्ने हिश्शाम'चा मृत्यू ८२८ इसवी मध्ये तात्पर्य, या दोघांच्या काळात फिलस्तीनचे इसाई सूर्यानी भाषा बोलत होते. त्या काळी यूनानी भाषा बोलणारे इसाई लाखोच्या संख्येने इस्लामी अधिकाराअधीन क्षेत्रात राहत होते. त्यांना सूर्यानी शब्दाचा यूनानी अनुवाद काय होतो हे समजणे काही कठीण नव्हते. इब्ने इसहाकने सूर्यानी शब्द 'मुनहमन्ना' लिहले आहे की आणि इब्ने इसहाक आणि इब्ने हिश्शाम दोघांनीही हे स्पष्ट केले की, अरबी भाषेत याचा अर्थ मुहम्मद आणि यूनानीमध्ये 'बरकलीतस' असा आहे. या वास्तविक सत्यानंतर यामध्ये कोणताही संदेह राहत नाही की, आदरणीय मसीह (अ.) यांनी पैगंबर मुहम्मद (स.) या पैगंबरांच्या आगमनाचं शुभसूचना दिली होती.

पवित्र कुरआनची स्पष्टोक्ती -

"आणि आठवा मरयमपुत्र इसाची ती गोष्ट जी त्याने सांगितली होती, "हे बनीइस्राईल, मी तुमच्याकडे पाठविलेला अल्लाहचा पैगंबर आहे, सत्यता प्रमाणित करणारा आहे त्या तौरातची जी माझ्यापूर्वी आलेली हजर आहे आणि खुशखबर देणारा आहे एका पैगंबराची जो माझ्यानंतर येईल, ज्याचे नाव अहमद असेल."

(दिव्य कुरआन, ६१ : ६)

# अध्याय १३

# पैगंबर मुहम्मद (स.) विषयी मुस्लिमेतरांचे उद्‌गार (विचार)

आपल्या पैगंबरीच्या अवघ्या २३ वर्षांच्या अल्पावधीत पैगंबर मुहम्मद (स.) यांच्या प्रयत्नाने एक असा संघटित समुदाय अस्तित्वात आला ज्याचे दुसरे उदाहरण मिळत नाही. पैगंबर (स.) यांनी अशा सत्य धर्माची स्थापना केली जो आत्मा विकसित करून त्याला प्रगतिशील (उर्ध्वगामी) बनवितो. त्यांनी निर्माण केलेल्या समाजात सर्वांना समानता प्राप्त होती. समान रूपाने सर्वांना प्रगतिचे अधिकार प्राप्त होते. त्यांनी सत्याची स्थापना न्यायशिलेवर केली आणि मानवी जगासमक्ष असा आदर्श प्रस्तुत केला, ज्यापेक्षा श्रेष्ठ आदर्शाची कल्पनाही केली जाऊ शकत नाही. त्यांनी लोकांना प्रत्येक प्रकारच्या अनुचित बंधनातून मुक्त केले. मग ती उच्च-नीचची अमानवी भावनात्मक साखळी असो की पुरोहितवादाचे अंधविश्वासू संकुचित विधानाचा विळखा असो! आपल्या येथे सर्व शक्ती आणि अधिकार एकमेव ईश्वरसमक्ष समर्पित होतात. आपण जीवनाच्या आध्यात्मिक आणि नश्वर भौतिक क्षेत्रात एकात्मता निर्माण केली. त्यांनी जाहीर घोषणा केली की समस्त मानव समान आहेत. पैगंबर (स.) यांनी राजनैतिक, आर्थिक, सामाजिक व्यवस्थेला प्रत्येक प्रकारच्या शोषण आणि कुटनीतीच्या अधिपत्यातून मुक्त केले आणि एक केवळ ईशभययुक्त प्रबळ लोकतंत्र स्थापन केले. या ईशलोकतंत्रात वास्तविक मूल्य केवळ नैतिकतेला होते. नैतिक-चेतनासमोर वंश, रंग आणि संपत्ती ऐश्वर्य, शक्ती सर्व महत्त्वहीन होते. अशा समाजात एक मुस्लिम (अर्थात ईशआज्ञापालक) अशा नातलगापेक्षा जास्त जवळ समजला जात असे. जो नातलग तर आहे परंतु अल्लाहशी विमुख आहे. येथे प्रत्येकाला ही संधी देण्यात आली की नैतिकता आणि अध्यात्माच्या उच्च शिखरावर अगदी त्याला वाटेल तितक्या उंचावर जाता यावे.

पैगंबर मुहम्मद (स.) यांच्या अशा महानतम मानवीय लोक कल्याणकारी कार्याची अपेक्षा अथवा तिरस्कार कोणताही न्यायप्रिय व्यक्ती करू शकत नाही, उलट तो याच्या ज्ञानानंतर त्यांच्या व्यक्तीत्वाने प्रभावित होतो.

१) थॉमस कार्लायल (Thomas Canlyle) ने आपले प्रसिद्ध पुस्तक 'Heroes

and Hero Worship' मध्ये लिहले की, पैगंबर मुहम्मद (स.) शांतीचा मूर्तीमंत अशा महान आत्मा होता, ज्याने संपूर्ण जगाला प्रकाशितच केले नाही तर एक प्रकाशमान जगाची निर्मिती केली.

२) डॉ. लीवॉन लिहतात - "पैगंबर मुहम्मद (स.) अत्यंत गंभीर, अल्पभाषी आणि दृढ संकल्पाचे स्वामी होते. आपण जितके कार्यशील होते तितकेच धैर्यवान आणि क्षमा व शांतीचे प्रतीक होते. (इस्लामी संस्कृती)

३) डॉ. मायकल एच हार्ट (Micheal H. Hart) आपल्या जगप्रसिद्ध 'The Hundred' या संशोधनात्मक ग्रंथात लिहतात,

"He was the only man in the history, who was supremely successful on both the religious and secular levels."

अर्थात - आपण इतिहासाचे एकमेव असे व्यक्ती आहात ज्यांनी धार्मिक आणि लौकिक दोन्ही क्षेत्रात अंतिम सीमेपर्यंत सफलता अर्चित केली.

(Dr. Michael H. Hart. The Loo, New York 1978)

४) आर. डब्लू. स्टूअर्ट लिहतात -

"मुहम्मद (स.) यांच्या कार्याचे प्रतिबिंब जगात प्रत्येक जागी बघायला मिळते. दिवसातून ५ वेळा दिल्ली, हिजाज, इराण, काबुल, मिस्त्र आणि शाम मध्ये! जगाच्या प्रत्येक भागात मुस्लिमांना नमाज पढत असताना जेव्हा बघतो तेव्हा हे सत्य स्वीकार करावेच लागते की, पैगंबर मुहम्मद (स.) यांचा धर्म सत्य, जिवंत व सदा जिवंत राहील." (Islam and its Founder)

५) इसाई डॉक्टर स्पिरिंगरचे विचार -

"तो ज्याच्या विचारात कल्पनेत सदैव ईशधारणा चलायमान होती आणि ज्याला उगवता सूर्य, आकाशातून होणारी वर्षा आणि धरतीच्या गाभाऱ्यातून उगवणारी हिरवळ या सर्वात केवळ अल्लाहचाच हात दिसत होता; मेघांच्या गर्जनेत, खळखळणाऱ्या पाण्याच्या ध्वनीत, ईश्वर स्तुतीमध्ये गायिले जाणारे पक्षीगाण यामध्ये ईशवाणी ऐकायला येते आणि निर्जन जंगले, प्राचीन शहरांचे अवशेष यामध्ये ईशप्रकोपांची चिन्हे दिसतात. (असे होते पैगंबर मुहम्मद (स.))"

(Life of Mohammad)

६) सर बर्नाड शॉ (Sir Bernaud Shaw) म्हणतो -

"If any religion had the chance of ruling over England New Europe with in the next hundred years it could be Islam."

अर्थात - 'आगामी १०० वर्षात केवळ इंग्लंडच नव्हे तर संपूर्ण यूरोपवर विजयप्राप्तीची संभावना कोणत्याही धर्माची असू शकते तर तो केवळ इस्लामच होय.'

पैगंबर मुहम्मद (स.) विषयी आपले प्रामाणिक विचार करीत बर्नाड शॉ म्हणतो, "If a man like a Holy Prophet was to assume the dictatorship of the Modern World, he would succeed in solving it's problems in a way that would lening it much needed peace and happiness."

अर्थात - माझा विश्वास आहे की जर पैगंबर मुहम्मद (स.) सारख्या व्यक्तीला वर्तमान जगावर पूर्ण सत्याधिकार प्राप्त असता तर समस्त जगतच्या समस्यांचे निवारण करण्यात पूर्ण सफलता प्राप्त केली असती आणि याच्या फळप्राप्तीस्वरूप पूर्णपणे अपेक्षित शांती आणि सुख समृद्धी प्राप्त झाली असती.

७) दिवंगत महात्मा गांधीचे सुपूत्र देवदास गांधी आपल्या एका निबंधात लिहतात -

"एका महान शक्तिशाली सूर्याप्रमाणे ईश्वरदूत पैगंबर मुहम्मद (स.) यांनी अरबच्या नरूस्थलाला त्या वेळी प्रकाशमान केले जेव्हा मानवी जगत अंधकारात पूर्णपणे सामावलेले (लीन) होते. पैगंबरांनी जेव्हा आपली इहलोक यात्रा संपवून जगाचा निरोप घेतला तेव्हा त्यांनी आपले सर्व कार्य पूर्ण केले होते, ते पवित्र कार्य ज्यामुळे जगाला स्थायी (कायमस्वरूपी) लाभ पोहचणार होता. जगात सच्चे (प्रामाणिक) मार्गदर्शन अतिशय कमी झालेत आणि त्यांच्या युगात एक दुसऱ्याशी बरेच अंतर होते आणि ते लोक ज्यांनी पैगंबर मुहम्मद (स.) यांचे जीवनचरित्रचे अध्ययन त्याप्रमाणे केले ज्याचे ते अधिकारी आहेत तर मग ते हे स्वीकारण्यास बाध्य होतात की नि:संशय पैगंबर मुहम्मद (स.) महान उपदेशकांपैकी एक होते. त्यांची महानता व मोठेपणामध्ये त्या वेळी अजून वृद्धी होते जेव्हा त्यांचे जीवन, चरित्र व कार्याचे चित्रीकरण करत असताना त्या वेळच्या आध्यात्मिक आणि नैतिक दृष्टीने पूर्णत: क्षतिग्रस्त पृष्ठभूमीकडे दुर्लक्ष करणार नाही जी आपल्या जन्मासमयी होती.

पैगंबर मुहम्मद (स.) यांच्या समयी सभ्य आणि प्रगतिशील वातावरण नव्हते की ते एक सभ्य माणुस घडवू शकेल. त्यासमयी एकही मनुष्य असा नव्हता जो अद्वैतवादची शिक्षा देऊ शकेल. हा तो काळ होता की ईशधर्माला अरबमध्ये जागाच नव्हती, तो देश आपल्या अंधकारमय युगात विचरण करीत होता. जेव्हा दुष्कृत्य पाप आणि नैतिक पतन अंतिम सीमेपर्यंत पोहचले तेव्हा ईशकृपा पैगंबर मुहम्मद (स.) यांच्या जन्माच्या रूपात झाली. अशा परिस्थितीत जर त्यांना 'रहमतुल्लील आलमीन' (संपूर्ण जगासाठी दयानिधी)ची पदवी दिली जाते तर त्यात आश्चर्य काय आहे?

पैगंबरांच्या आदर्श जीवनचरित्राने हे ज्ञात होते की त्यांच्या प्रचार आणि उपदेशाचा शेवटपर्यंत हाच नियम होता की ते जो आदेश किंवा जी शिकवण आपल्या अनुयायांना द्यायचे, त्यावर आधी स्वत: आचरण करायचे आणि अशा कार्याची शिकवण दिली नाही ज्याचे प्रात्यक्षिक त्यांनी प्रस्तुत केले नाही.

पैगंबर मुहम्मद (स.) यांचे संपूर्ण जीवन अगदी साधे आणि सरळ होते आपल्या या साध्या जीवनात त्या वेळीही कोणतेही अंतर आले नाही जेव्हा ते पैगंबरीच्या पदावर आरूढ झाले. जगाचे सुख आणि जीवनाचा भोगविलास त्यांना आपल्याकडे त्या वेळीही आकर्षित करू शकले नाही जेव्हा एकापेक्षा जास्त साम्राज्याची संपत्ती त्यांचा चरणावर अर्पित होत होती. पैगंबरांचे भोजन अगदी साधे आणि थोडे होते, केवळ जिवंत राहण्यास ते जेवण करायचे. चटई आणि तरट आपले बिस्तर होते. त्यांचे कपडे अगदी साधारण असायचे, त्यांनी कधीही कोणाशीही कटू वचन केले नाही. युद्धप्रसंगीही शत्रूंशी त्यांची वर्तणूक मृदू व सौम्य होती. तात्पर्य, त्यांचा आपल्या इच्छा, वासना आणि मनोभावावर पूर्णपणे ताबा होता, संयम होता. गीतामध्ये कर्मयोगीचे जे गुण दर्शविण्यात आले आहे ते सर्व पैगंबरांवर उपलब्ध होते. ते अप्रिय कर्तव्यालाही प्रामाणिकपणे, शौर्याने व धैर्याने पूर्ण करीत असत. त्यांची इच्छाशक्ती अथवा गर्वाने त्यांच्या कर्तव्याप्रति कधीही आपल्या पायात कंपन निर्माण होऊ दिले नाही. कर्मयोगी त्याच व्यक्तीला म्हणतात जो आपल्या श्रेष्ठ आणि आदर्श विचारांना कार्यरूपात परिवर्तीत करतो आणि पैगंबर मुहम्मद (स.) असेच महान व्यक्ती होते. एक नश्वर मनुष्य असूनही ते अलौकिक गुणांचे धनी होते. आमच्यासमान साधारण मनुष्याचे जीवन दु:ख-सुख, हर्ष, शोक यांच्या प्रभावांतर्गत व्यतीत होते जे आमच्या जीवनात क्रांती आणतात, परंतु हा महान आत्मा यापासून कधीही प्रभावित होत नाही.

जे लोक समाजाची वर्तमान परिस्थिती आणि प्रणाली परिवर्तीत करून एक उत्कृष्ट आणि आदर्श समाजाचा जन्म घडवू इच्छितात, त्यांच्या हृदयावर पैगंबर मुहम्मद (स.) यांच्या उच्च आदर्शाचा अमिट प्रभाव पडेल, ज्याला त्यांनी मजुरीसंबंधी कायम केले आहे. लोक त्याला विसरले. त्यापैकी एक हे आहे की, आपल्या वस्त्रांची दुरुस्ती ते स्वत: करायचे इतकेच नव्हे तर आपले जोडेसुद्धा शिवायचे. ते घरातील कामातही मदत करायचे, मशीदीच्या निर्माणकार्यात मजुरांसोबत बरोबरीने त्यांनी काम केले. मजुरांसोबत काम करत असतांना ते त्यांच्यासोबत असे राहत असत की आपणास ओळखणेही कठीण व्हायचे.

बालकांशी पैगंबरांनी विशिष्ट प्रेम होते. त्यांच्या सहवासात ते अतिशय प्रसन्न राहायचे. ती भाग्यशाली बालके ज्यांना त्यांचा सहवास लाभला आणि त्यांचे प्रेम मिळाले ती आपल्या घरात तितकी प्रसन्न कधीही नसायची जितकी पैगंबरांच्या सान्निध्यात असायची. बालकांचा सहवास, त्यांच्यासोबत उठणे-बसणे हे काही अचानक घडणारी घटना नव्हती, तर पैगंबरांचा दैनंदिन नियम व कार्यक्रम होता. बालकांना शोधून त्यांच्यासोबत व्हायचे आणि आपले श्रेष्ठ विचार त्यांच्या मनमस्तिष्कावर बिंबीत करायचे. काय शिकवण आणि उपदेशाचा यापेक्षा जास्त सरळ आणि अगदी स्वाभाविक मार्ग दुसरा कोणता असू शकतो?

# काही मुस्लिमेतरांचे विचार पवित्र कुरआनविषयी

## रोडवेल

"यूरोपने हे विसरता कामा नये की तो पवित्र कुरआनचा आभारी आहे. कारण पवित्र कुरआनच तो ग्रंथ आहे ज्याच्यामुळे यूरोपमध्ये ज्ञान-विज्ञानचा सूर्य उदय पावला."

## जर्मन कवी - गोयटे (Goethe)

"अगदी पहिल्या दृष्टीतच पवित्र कुरआन त्याचे अध्ययन (वाचन) करणाऱ्यांना आश्चर्यचकित करतो. परंतु दुसऱ्याच क्षणी तो आपल्या अद्भूत आकर्षणशक्तीने (क्षमतेने) अध्ययनकर्त्याला आपल्याकडे मोहित करून घेतो. सरतेशेवटी वाचक त्याच्या सौंदर्याच्या मोहकतेत आनंदविभोर होऊन गर्क होतो. फार पूर्वीपासून मुस्लिमेतर विद्वान पवित्र कुरआन आणि ते घेऊन येणाऱ्याला (मुहम्मद स.) यांना शंका-कुशंका आणि वाद-विवादाच्या काटेरी कुंपणाने जखडण्याचा प्रयत्न करीत आहेत. परंतु जसे जसे ज्ञान-विज्ञानाने प्रगती केली आणि अज्ञान व पक्षपाताची आवरणे दूर होत गेली. पवित्र कुरआनने त्याच्या महानतेने आम्हाला आश्चयात टाकले. ही वेळ आता जास्त दूर नाही, जेव्हा हा ग्रंथ समस्त विश्वाचे लक्ष आपल्याकडे आकर्षित करून ज्ञान-विज्ञान आणि तत्त्वदर्शितावर अत्यंत दृढ आणि व्यापक प्रभाव अंकित केल्यावाचून राहणार नाही आणि या ग्रंथाला मार्गदर्शनाच्या विश्वकोषाच्या रूपात स्वीकारण्यात कोणताही संकोच राहणार नाही."

## जॉर्ज सेल

"पवित्र कुरआन अरबी भाषेत जगातील सर्वात उत्कृष्ट, श्रेष्ठ आणि प्रामाणिक (सत्य) ग्रंथ आहे. कोणत्याही मनुष्याची लेखणी असा चमत्कारिक ग्रंथ कदापिही लिहू शकत नाही आणि होय, हा तर मृतकाला जिवंत करण्यापेक्षा जास्त मोठा चमत्कार आहे."

## डॉ. गिबन (Dr. Gibbon )

"पवित्र कुरआन एकेश्वरत्वाचा सर्वात मोठा साक्षी आहे. एक एकेश्वरवादी तत्त्वेत्ता (दार्शनिक) इस्लामशिवाय दुसरा कोणताही धर्म स्वीकारूच शकत नाही. सारांश हाच की समस्त जगात पवित्र कुरआन अप्रतिम आहे."

## प्रो. कार्लयर

"माझ्या नजरेत पवित्र कुरआनमध्ये प्रत्येक पैलूने विशुद्धता (पवित्रता) आणि

सचोटीचे गुण पूर्णतया विद्यमान आहेत आणि सत्य हे आहे की कोणताही चांगुलपणा आणि श्रेष्ठत्वाची गुणवैशिष्ट्ये जर निर्माण होऊ शकतात तर केवळ यामुळेच.''

## मॅकस्वेयल किंग

''पवित्र कुरआन दिव्य प्रकटनांचा संग्रह आहे. यामध्ये इस्लामचे सिद्धांत कायदे- कानू, नैतिक शिकवण आणि दैनंदिन व्यवहारातील प्रत्येक क्षेत्रासंबंधी मार्गदर्शन व आदेश विद्यमान आहेत. इस्लामला इसाईयतवर वर्चस्व प्राप्त आहे. त्याची धार्मिक शिकवण आणि कायदा-कानू दोन पृथक वस्तू नाहीत.''

## ए. जी. आरबेरी

''साहित्यिक गुणवैशिष्ट्ये आणि सौंदर्य याव्यतिरिक्त पवित्र कुरआनच्या चमत्कारिक प्रभावाचे एक कारण त्याची संकलनशक्ती (संग्राहकता) गुण होय. जगात जितके म्हणून ईशग्रंथ वर्तमान समयी कोणत्या न कोणत्या स्वरूपात उपलब्ध आहेत. त्यापैकी पवित्र कुरआन वगळता सर्व ग्रंथ संकलनक्षमतेच्या अप्रतिम गुणांपासून वंचित आहे. तौरात जगाच्या लोकसमुहाचा इतिहास आणि कायदा व आदेश यांचा संग्रह आहे. जबूर प्रार्थनांचा संग्रह आहे. बायबलचे पुस्तक अय्युबमध्ये केवळ आस्था आणि समर्पणाची शिकवण मिळते. आदरणीय सुलेमान (अ.) पैगंबरांचे नीतिवचन केवळ उपदेशावर आधारित आहेत, तर इंजील (Gospel) मसीहचे वृत्तांत आणि नैतिक शिकवणींचा संग्रह आहे. परंतु पवित्र कुरआन सर्वांचा संग्राहक आहे. (अर्थात रक्षकही आहे) तात्पर्य, पवित्र कुरआन तौरातही आहे, इंजिलसुद्धा आहे. तो लोकसमुहाचा इतिहासही आहे आणि नैतिक उपदेश व प्रार्थनासंग्रहही आहे. परिपूर्ण धर्माची धारणा आणि उपासनेच्या पद्धतीही त्यात विद्यमान आहेत. व्यावहारिक जीवनासंबंधी (व्यापार, परस्पर व्यवहार, देणे-घेणे इत्यादी) आदेश व कायदेकानून त्यात विद्यमान आहेत. तात्पर्य, एका मुस्लिम (ईशआज्ञापालक) च्या जीवनाचा प्रत्येक कालखंड आणि प्रत्येक क्षेत्रासाठी त्यात अगदी परिपूर्ण असे आदेश आणि सुस्पष्ट शिकवण विद्यमान आहे.''

## आचार्य रजनीश (ओशो)

''जी व्यवस्था (संरचनाशैली) पवित्र कुरआनची आहे त्या प्रकारची व्यवस्था बायबल, उपनिषद आणि गीता यापैकी कशातही नाही. पवित्र कुरआन एका अर्थाने सर्वांगीण आहे. तो केवळ धर्मच नव्हे तर समाजशास्त्रही आहे. तो केवळ समाजशास्त्रच नव्हे तर राजनीतिही आहे. जीवनाच्या क्षुद्रतेपासून ब्रह्माच्या विराटतेपर्यंत सर्वांना पवित्र कुरआनने सामावून घेतले आहे.'' (ध्यान और प्रेम, पृ. ७६)

# काही हितगुज - वाचकांशी

सरतेशेवटी आम्ही आपल्या वाचक वर्गाशी एक निवेदन करू इच्छितो. आपण या पुस्तकाचे अध्ययन केले. वास्तविक हे अध्ययन कोणतेही स्वास्थसंबंधी पुस्तकाचे नसून आपल्या स्वत:च्या स्वास्थ्याविषयीचे अध्ययन आहे. याच्या अध्ययनाने आमचे स्वत:चे स्वास्थ कसे आहे आणि स्वस्थ राहण्यास काय करावे लागते, याचे ज्ञान प्राप्त करण्याइतकी योग्यता निर्माण होते. स्वास्थ्य बिघाडाची मूळ कारणे काय असतात? स्वस्थ राहण्यास कोणते नियम पालन करणे आवश्यक आहे? मनुष्याचे हे कर्तव्य असते की, स्वत:ला स्वस्थ आणि निरोगी ठेवावे. त्याला शरीर यासाठी प्राप्त झाले नाही की त्याचा तिरस्कार करावा आणि आपल्या स्वास्थ्यसंबंधी गफलतीत पडावे.

पैगंबरत्व अथवा पैगंबरीची सत्यता आणि पैगंबरांचे मार्गदर्शन व त्यांचे प्रयास इत्यादींच्या अध्ययनाने हे विदित होते की, मानव केवळ एक शरीरच नव्हे तर त्याचे एक नैतिक आणि आत्मिक व्यक्तीत्वसुद्धा आहे. सफलतेसाठी केवळ शारीरिक ज्ञानच पर्याप्त नसून त्यासाठी आवश्यक आहे की मनुष्याने आपल्या आत्म्याप्रतिही दक्ष असावे. या संबंधीत आपल्या कर्तव्यपालनाची उपेक्षा करू नये. आमची व्यक्तीत्वनिर्मिती याच्याशिवाय संभव नाही. आणि यासंबंधी पैगंबरांच्या व्यतिरिक्त दुसरे कोणीही आमचे मार्गदर्शन करूच शकत नाही. आमच्या याच आवश्यकतेच्या पूर्तीसाठी अल्लाहने जगात पैगंबरीक्रमाचा आरंभ केला आणि हा क्रम व त्याची परंपरा कित्येक शतकांपर्यंत चालत राहिली. हा क्रम अल्लाहचे अंतिम दूत पैगंबर मुहम्मद (स.) यांच्या आगमनावर समाप्त होतो. पैगंबर मुहम्मद (स.) यांनी आपल्या पूर्वी आलेल्या सर्वच पैगंबरांचे प्रतिनिधित्व केले. याचा अर्थ हा आहे की त्यांनी जगाला त्याच सत्याकडे आमंत्रित केले ज्या सत्याकडे त्यांच्या पूर्वीचे सर्व पैगंबरांनी आपापल्या जाती-समुदायाला आमंत्रित केले होते.

प्रिय वाचकगण! आता हा निर्णय सर्वस्वी आपल्याला करायचा आहे की आपणास सफलता हवी आहे किंवा असफलता! सफलता प्राप्त करण्यास हे अनिवार्य आहे की अल्लाहने जो मार्ग यासाठी उपस्थित अथवा प्रशस्त केला आहे तोच मार्ग आपण स्वीकारावा. याचप्रमाणे आपण इहलोक व परलोक दोन्ही जागी आपल्या निर्मिक प्रभुची प्रसन्नता प्राप्त करून सफलता प्राप्त करू शकतो. (आमच्या ज्ञानानुसार याशिवाय दुसरा पर्याय नाही.) आमच्या शुभेच्छा आपल्यासोबत आहेत.

**- ० - समाप्त - ० -**